# पुनर्जन्म

लेखक

सोने गुरुजी, एम. ए

१९३९

किंमत २ रुपये

## लेखकाचे दोन शब्द

३३ साली नाशिक तुरुगात ही गोष्ट मी लिहिली होती. जेलमधील राजकीय व इतर कैदी नाना प्रकारचे चित्रविचित्र अनुभव सागत त्यातूनच ही गोष्ट जन्मली. श्री. देशमुख यानी गळ घातली "तुमचें एखादें पुस्तक द्या." मीं त्यांना या गोष्टीचा थोडक्यात तोडी साराश सागितला व विचारलें, "आवडली का तुम्हाला? आवडली असेल तर मी पुन्हा लिहून तुम्हाला देईन." ते म्हणाले, "द्या. लौकर द्या लिहून." सहा वर्षांनी ही गोष्ट ट्रकेंतून बाहेर येत आहे. थोडेंफार रगरूप बदलून बाहेर येत आहे. तिचे काही जुने कपडे फाटले होते. तिला यथाशक्ति नवीन करून घातले. गमत आहे चला. कला मला कळत नाही. पांखरें किलबिल करतात तेथें का कलेचे नियम असतात? झरा झुळझुळ वाहतो व गुणगुणतो काही तरी. तेथें का तत्र असतें? पांखराची जशी किलबिल, तसें माझें लिहिणें. किलबिल केल्याशिवाय त्याना राहवत नाहीं. मला कांही तरी लिहिल्याशिवाय राहवत नाहीं. पाखरांची किलबिल कोणाला कटकटीची वाटते, कोणाला कौतुकाची वाटते. परंतु पांखरें त्याची थोडीच पर्वा करतात?

१।६।३९. —पां. स. साने

## आमचें प्रकाशन

मानवेंद्रनाथ रॉय-चरित्र    रु. १॥
  भाई बेके

फुलें आणि दगड    रु. १॥
  वि. स. खांडेकर

पुनर्जन्म
  साने गुरुजी, एम्. ए.    रु. २

## पुढील प्रकाशन

सायंकाल (लघुनिबंधसंग्रह)    रु. १॥
  वि. स. खांडेकर

छाया (कादंबरी)    रु. १॥
  वि. स. खांडेकर

नंदिनी (कादंबरी)    रु. १॥
  भ. व्यं. देशमुख, बी. ए.

# अनुक्रमणिका

# मित्रलाभ

१

भाऊराव मनाचे मोठे मोकळे होते. त्याचें तें निर्मळ व अकपट हास्य आजूबाजूस आनद निर्मावयाचें नेहमीं त्याचें मडळींत उठणें-बसणें. ते वकील होते, परतु वकिलीत त्याचें लक्ष नसे. वकिलीसाठीं ते जन्मलेले नव्हते. पक्षकार आले तर भाऊराव म्हणावयाचे, "नको तुमची कटकट! जा बाबानो. माझ नाही आज लक्ष." वास्तविक वकील पक्षकारासाठीं तहानलेला असतो. पक्षकार म्हणजे वकिलाचें दैवत, वकिलाचा प्राण, परतु भाऊसाहेबाचें सारें निराळेंच. ते म्हणावयाचे, "प्रतिष्ठित मडळींत मिरवता याव म्हणून मी वकील झालों. वकील व प्रतिष्ठा याचा सबध सुटताच माझ्या घरावरची पाटी मी चुलीत घालीन." पक्षकाराच्या कागदाच्या राशीखाली गुदमरून जाण्यासाठीं ते वकील झाले नव्हते. शिवाय त्याना वकिली चालविण्याची फारशी जरूरीहि नव्हती. त्याची पिढीजात सावकारी होती. रगड शेतीवाडी होती. त्याना काहीं कमी नव्हतें.

सुदरपुरात वकील पुष्कळ होते. सुदरपुरच्या सभोंवतालच्या भागात भाडणें फार. फौजदाऱ्या, मारामाऱ्या नेहमीं चालावयाच्या. सुदरपुरभोंवतीं

असा हा कलह-मत्सराचा असुदर ससार पसरलेला होता, त्यामुळे वकिलाची पोळी पिके परतु या परिस्थितीचा फायदा घेऊन आणखी गडगज सपत्ति मिळवावी असें भाऊरावास वाटत नसे. ‘पैसा का कधी पुरेसा होतो?’ असें विनोदानें ते म्हणावयाचे. इतर वकिलाच्या घरीं सकाळी पक्षकाराची झुबड असावयाची. तेथें मुद्दे निघायचे, कायद्याचा कीस निघायचा, खोट्या साक्षी नीट पढविल्या जायच्या! परतु भाऊरावाकडे सतार ऐकू यावी, बाजाची पेटी सुरू असावी, गोड गाणें चालू असावें! भाऊराव सगीताचे वेडे होते. त्याना आवाजाची देणगी नव्हती परतु सहृदयतेची होती सुदर गीत ऐकताच त्याची जणू समाधि लागे. बाहेर पाटी वकिलीची होती, परतु आतील दिवाणखाना सगीताचा होता जीवन बेसूर करणाऱ्या कायदे-कानूस सगीतानें बाहेर हाकलून दिलें होतें

गावात कोणी चागला गाणारा, चागला वाजवणारा आला, कीं तो आधी भाऊरावाचें घर हुडकीत यावयाचा कलाप्रेमी म्हणून त्याची कीर्ति पसरली होती. भाऊराव सर्वांचें स्वागत करावयाचे कलावान् लोक म्हणजे त्याची दैवतें होती. त्याच्या घरीं आधी कार्यक्रम व्हावयाचा, मग अन्यत्र गावात भाऊरावाच्या या रसिकतेमुळें ते लोकप्रिय झाले होते त्याची सर्व वर्गात ओळख. अनेक त्याचे मित्र. कितीदा रोज चहा व्हायचा, किती पानसुपारी खपायची, परतु असें होतें तरीहि त्याना समाधान नव्हतें. त्याच्या भव्य भालप्रदेशावर क्वचित् विषण्णता दिसून येई. त्याच्या सुखात कोणती उणीव होती?

आपल्याला खरा मित्र नाही याचें त्याना वाईट वाटे. शेकडों लोकाशी त्याचा परिचय होता, परतु या परिचयात खरा जिव्हाळा कोठून असणार? बैठकींतील हा रगेल विनोदी गडी कधीं कधी एकटाच रात्री बाहेर पडावयाचा. जणू कोणी विरक्त योगीच! सुदरपुरच्या चरणाशीं वाहणाऱ्या सुदर नदीच्या काठी जाऊन ते बसावयाचे. नदीची ती गोड खळखळ त्याचें हृदय उच-बळवी. नदीला पाहून स्वतःचें जीवन त्याना दिसे. नदीजवळ हजारों प्राणी येतात, पाणी पितात, डुबतात, खेळतात. परतु कोणाला त्या नदीविषयीं खरें प्रेम वाटतें का? ते येतात व जातात, क्षणभर नदीचें कौतुक करतात,

परतु ती नदी एकटी ती एकटी! भाऊरावाच्या जीवनाची नदी अशीच होती. अनेक त्याच्याकडे येत, चहा पीत, पान खात, गप्पा मारून निघून जात. त्याच्यात जिवाचें असें कोण होतें? भाऊरावाच्या जीवनाच्या अगणात अनेक येऊन क्षणभर नाचत-बागडत परतु अतरगात कोणी आलें का? तें अतरग रिकामें होतें तेथील मित्रासाठी माडलेलें सिंहासन तसेंच होतें! यामुळे तें कधी उदासीन दिसत. परतु त्याचा आनदी स्वभाव लगेच प्रकट होऊन उदासीनता पार उडून जाई

भाऊरावाचें वय तिशीच्या आसपास होतें. त्याचें लग्न झालेलें होतें. त्याच्या पत्नीचें नाव आनदी. तें अन्वर्थक नाव होते. आनदीच्या कपाळावर कधीं कोणी आठी पाहिली नाही ती गडी-माणसावर रागवायची नाही, आदळ-आपट करावयाची नाही. भाऊराव सगीतप्रिय होते आनदीहि कलाप्रिय होती तऱ्हेतऱ्हेची भरतकामें ती किती सुदर करी. फुलझाडावर बसलेले फुल-पाखरू तिनें भरलें होतें. दिवाणखान्यात जी तसबीर होती तिचें सर्वजण कौतुक करीत. आनदी घर आरशासारखें राखी. धुळीहि घाण तिला खपत नसे तिचें आरशासारखें प्रसन्न व स्वच्छ मन जणू बाहेर सर्वत्र प्रकट होई. आनदी निर्दोष व निर्मळ होती तिला कधी कोणाचा सशय यावयाचा नाहीं. देवाच्या सृष्टीत कोणाचा सशय का घ्यावा असे ती म्हणे.

एखादे वेळेस पतीची खिन्नता तिच्या ध्यानीं यई. आपल्यास अद्याप मूल-बाळ नाहीं म्हणून का पति खिन्न असतो असें तिच्या मनात येई. 'तुम्ही दुसरें लग्न करा असें सागावें का' असें तिच्या मनात येई. परतु हा विचार मनात येताच तिला स्वतःचा राग येई. आपल्या पतीचा आपण अपमान करीत आहोंत, त्याच्या प्रेमाची अवहेलना करीत आहोंत असें तिला वाटे.
— पत्नी कितीहि आवडती असली, तरी मित्राची जागा ती भरून काढू शकत नाहीं. एकच प्रेम, परतु तें नाना रगानीं रगलें आहे, नाना रूपा नटलें आहे! त्या विविध स्वरूपात प्रेमाचा अनुभव घेण्यासाठी भुकेलेला असतो. प्रेमाच्या एकाच प्रकारानें मनाला तृप्ति नसते. आन मनात ही गोष्ट आली नाहीं. पतीकडे किती तरी लोक येतात, बैठक पतीचे किती तरी मित्र! असें तिला वाटे. तिला सतरादा चहा क

परंतु ती कटाळत नसे. आपल्या पतीचें हें मित्रवैभव आहे असें मनात येऊन तिला अभिमान वाटे. पतीच्या जीवनातील हीं दाणे टिपणारीं चचल पाखरें आहेत, असें तिच्या मनात येत नसे. कारण सशय तिला माहीत नव्हता

असे दिवस चालले होते, परतु तो एक दिवस आला—जीवनात उलथा-पालथ करणारा तो दिवस आला! त्या दिवशी सकाळच्या आगगाडीतून एक सुदर पुरुष सुदरपुर स्टेशनवर उतरला उच व सडपातळ होती ती मूर्ति. गोरें-गोरें तोंड व त्यावर मुग्ध्यासारखे चचल व काळेभोर असे ते डोळे. त्याच्या ओठावरून हास्य जणू प्रकाशाचे किरण फेकीत होते. असे हे गृहस्थ भाऊ-रावाच्या घरी एकदम आले.

" भाऊराव आपणच ना?" त्यानी प्रश्न केला

" हो " चकित होऊन भाऊराव म्हणाले

" मी तुमच्याकडे आलों आहे " नवखा म्हणाला

" बसा. " हलुवार वाणीनें स्वागत करीत भाऊराव म्हणाले त्या नवख्या माणसानें पोषाक उतरला. अगात फक्त रेशमी शर्ट आता होता. त्याचें बोलणें चालणें सुरू झालें.

" मी गवई आहे. आपण गायनाचे भोक्ते आहात अस कळल, म्हणून आपणाकडे आलों आहे. कलेला सध्या दुर्दिन आले आहेत खादाळ व गाधाळ झाला आहे समाज! जाड्या-भरड्या खादीच्या पासोड्यात आज सौंदर्य येऊन राहिल आहे. कलेच आजकाल मरण आहे. आपल्यासारख्या कलापूजकाचं नाव ऐकल म्हणजे थोडा धीर येतो " पाहुणा बोलत होता.

भाऊराव म्हणाले, " गाण्याच खरोखरच मला वेड आहे, आणि तुमच्या गाण्याची तुमच्या बोलण्यावरूनच कल्पना येत आहे. किती गोड तुमच बोलण! बोलणंच इतक मधुर तर गाण किती मधुर असेल! "

त्या रात्रीं भाऊरावाकडे गायनाचा कार्यक्रम झाला. सारी मडळी प्रसन्न त्या गायनात ओढाताण नव्हती. तो सहजरम्य विलास होता. कलावताच्या कठातून बाहेर पडताना आटापीट करावी लागत नव्हती.

पाहुणे दिसत गोड, बोलत गोड, गात गोड, जणू कला त्याच्या रूपाने प्रकट झाली होती. भाऊरावाचें भान हरपलें! ते एकदम पाहुण्याच्याजवळ गेले व त्याच्या पाठीवर हात ठेवून म्हणाले, "आज कृतार्थ झाले कान, सफळ झाल जीवन!"

पाहुण्याचे गावातहि कार्यक्रम झाले त्याचा सर्वत्र बोलबाला झाला. तोच एक सर्वांच्या तोंडी विषय! पृथ्वीवर गधर्व अवतरला असे लोक म्हणत. एके दिवशी रात्री भाऊराव व पाहुणे गच्चीत आरामखुर्चीवर बसले होते. आकाशातील चद्राची कोर व ती चादणी– किती रम्य होते तें दृश्य! कोणी बोलत नव्हतें. परतु पाहुण्यानी स्तब्धतेचा भग केला. ते म्हणाले, "भाऊराव, उद्या सकाळच्या गाडीन मी जातों. मला रजा द्या."

"कुठ जाणार?" भाऊरावानीं प्रश्न केला

"मी एक स्वैर मुशाफर आहे मी कुठून तरी येतों, कुठ तरी जातों. मी चचल वारा आहे चचल मेघ आहे मला कुठ आसक्ति नाहीं—बधन नाहीं, मी फुलपाखरू आहे. तुमच्या दिवाणखान्यात तें फुलपाखरू भरलेल आहे. तें फुलपाखरू त्या फुलावरून उठणार नाही अस वाटत तें खर फुलपाखरू नाहीं. खर फुलपाखरू बसलं नाहीं तों उडू पाहत" पाहुणे कायमच बोलत होते.

"परतु ही तसबीर पाहून अनेकानीं अन्योद्गार काढले आहेत!" भाऊराव म्हणाले.

"मी त्यात दोष काढतों अस नाही. अति हळवार हातानीं तें चित्र भरलेल आहे. ते थोर कलामय हात आहेत ते हात क्षणभर हातीं घ्यावे, डोळे मिटावे व ती कला आपल्यात ओढून घ्यावी असहि मनात येत. भाऊराव, कला कोणतीहि असो, तिचा आत्मा एकच आहे तिची स्फूर्ति एकच आहे. रग भरताना चित्रकाराची जी मनोवृत्ति असते, तीच राग आळवताना गवयाची असते. भाऊराव, थोर कलामय हाताच तुम्ही पाणिग्रहण केल आहे म्हणून तुम्ही कलापूजक झालात. खर ना? बर, तें असो, मग जावं म्हणतों उद्या." पाहुणे मूळ मुद्द्यावर आले.

"तुम्ही असे वाऱ्यासारखे का राहता? एके ठिकाणीं रहा. तुमची कला दुसऱ्यास शिकवा. तुमची कला तुमच्याबरोबर मरून न जावो. ज्याप्रमाणे

मुलाबाळाच्या रूपानं आपण अमर होतों, त्याप्रमाणं ज्याना आपण आपली कला देऊ, आपले विचार देऊ, त्याच्या रूपानं आपण अमर होत असतों" भाऊराव भावनेनें बोलत होते.

क्षणभर कोणीच बोललें नाही.

"तुम्ही लग्न नाहीं का केलं?" एकदम भाऊरावानी प्रश्न केला.

"का बर? मी कलेशी लग्न लावलं आहे दुसरी लग्न लागलीं काय न लागली काय, फुकट!" पाहुणा म्हणाला

"तुम्ही लग्न केलं नसेल तर करा. तुमचं चचलत्व जाईल, कुठं तरी दृढमूल व्हाल. इथं रहा ना. सगीताची शाळा काढा. आपल्या कलेचे वारसदार निर्माण करा. खरच, इथच रहा" भाऊरावाचा स्वर कोमल होता.

"अहो, थोडी तों गोडी! उद्या तुम्ही मला कटाळाल" पाहुणे हसत बोलले.

"नाही-नाहीं, मी कटाळणार नाहीं माझं सदय ज्याला शोधीत होत तो मित्र मला मिळाला! आता काय म्हणून कटाळेन? फुलाचा कटाळा येत नाही, सतारीचा कटाळा येत नाहीं, निर्मळ पाण्याचा कटाळा येत नाही! तुम्ही माझ्या जीवनाच्या बागेतील फूल, जीवनाच्या दिवाणखान्यातील सतार, जीवनातील निर्मल निर्झर आहात! तुम्हाला काय सागू, ज्या दिवशीं तुम्हाला मी पाहिलं त्या दिवशीं जणू शतजन्मीच्या आठवणी एकदम जागृत झाल्या! जीवनात कसला तरी दिव्य-भव्य स्फोट झाला. तुम्ही पाहुणे नाही, अपरिचित नाही. आपण चिरपरिचित आहोंत. तुम्ही आल्यापासून एक प्रकारची अननु-भूत माधुरी माझ्या जीवनात भरून राहिली आहे. मी हें बोललों नाहीं कारण या बोलायच्या गोष्टी नाहीत या फार पवित्र गोष्टी आहेत. दवबिंदूस जरा धक्का लागला तरी तो घळघळतो— तो मोडतो. त्याप्रमाण या हळुवार भावनाना हळुवार भाषेचाहि स्पर्श सहन होत नाही. भावना चुरगळतात. खरच तुम्ही जाऊ नका. माझं जीवन समृद्ध करा. माझा ससार मधुर करून तुमचाहि ससार इथं माडा. हें सुदरपुर तुमचं करा. आज सुदरपुर खरं सुंदरपुर झालं. तुमच्यासारखी गुणसुदर, रूपसुदर मूर्ति इथं कधी आली नसेल. इथं रहा, तुमची दिव्य कला इथं पेरा. मग ती अकुरेल, फोफावेल; आपणाजवळ जें

चागल आहे, तें आपण पेरल पाहिजे. तें देवाच काम आहे रहा— इथचं रहा. माझे मित्र व्हा, प्रेमळ प्राण व्हा. आधीं आहातच अनेक जन्मीचे. परतु तें सुख मला अनुभवू दे, जीवनातील उणीव भरून निघाली, रिकामी जागा भरून गेली!" भाऊरावाना अधिक बोलवेना.

ते पाहुणे शेवटी सुदरपुरला राहिले त्याचें नाव गोविंदराव. प्रथम काही दिवस ते भाऊरावाकडेच होते परतु पुढें दुसरीकडे त्यानी छानशी जागा घेतली तेथें त्यानी सगीताचा वर्ग उघडला सकाळी व सायकाळी वर्ग चाले गोविंदराव कधी कधी दोन-दोन तास वर्ग घ्यावयाचे, तर कधीं मुळीच घ्यावयाचे नाहीत. मुलें घड्याळाकडे पाहू लागत घड्याळाकडे पाहणारास कला कोठून मिळणार? कलेपुढे काळ फिका पडतो. कला काळाला ओळखीत नाही. घटा वाजल्याबरोबर जो तास सपतो, तो तास काय शिकविणार! घटेचा आवाज शिकविणारा व शिकणारा यास ऐकू न येईल तरच खरें शिक्षण तेथें चाललें आहे असें समजलें पाहिजे काळाचें भान येताच कला पळून जाते.

गोविंदराव खानावळींत जेवत परतु आठवड्यातून दोनतीन दिवस ते भाऊरावाकडेच जेवावयाचे. एखादे वेळेस सायकाळचा वर्ग सुटल्यावर ते भाऊरावाचे घरी येत. गाणें-बजावणें होई मग भाऊराव म्हणावयाचे 'आता इथच जेवा' गोविंदरावहि फार आढेवेढे घेत नसत. आनदीहि कधीं असमाधान दाखवीत नसे. पतीचा आनद तो तिचा आपल्या पतीची क्वचित् दिसणारी खिन्नता दिसतनाशी झालेली पाहून तिला बरें वाटलें. पतीची खिन्नता दूर करणारे गोविंदराव तिला उपकारक वाटले.

कधी मधल्या वेळीं फराळालाहि गोविंदरावास भाऊराव घेऊन येत. एके दिवशी दोघे मित्र चिवडा खात होते आनदी चहा करीत होती.

"भाऊराव, तुमचा आग्रहच फार. मला हें खाणापिण फार आवडत नाहीं. शिवाय गाणाऱ्यान खाण्यावर सयम ठेवला पाहिजे. असले मसालेदार चिवडे खाईन तर आवाज गमावून बसेन!" गोविंदराव म्हणाले.

"सयम तर सर्वच वस्तूवर हवा. जीवनात ज्याला ज्याला पुरुषार्थ प्राप्त करून घ्यायचा आहे, त्याला इद्रियें लगामात घालूनच ठेवलीं पाहिजेत. परंतु

याचा अर्थ खाऊच नये असा नव्हे. आणि हा चिवडा काहीं तसा बाधणार नाहीं. किती छान झाला आहे!" भाऊराव म्हणाले.

"म्हणजे छान झाला नाही वाटत?" आनदीने विचारलें.

"बायकाचा सशयी स्वभाव!" भाऊराव हसत म्हणाले.

"बायकाची नालस्ती करण हाच आजपर्यंत पुरुषधर्म मानला गेला आहे बिचाऱ्या बायकाना अनुभव कसे येतात हें जर त्याना कळेल, तर मग ते अस बोलणार नाहींत." आनदी म्हणाली

"तुम्ही व्याख्यान वगैरे देता वाटत?" गोविंदरावानीं प्रश्न केला

"तिच व्याख्यान फक्त माझ्यासमोर—चुलीजवळ!" भाऊराव म्हणाले

"व्याख्यानात काय आहे? पुरुष शेंकडो व्याख्यान ऐकतात, परतु खादी वापरीत नाहीत, देशासाठी काही करीत नाहींत पुरुषाना व्याख्यानाची चटक लागली आहे, तशी बायकाना लागेल. दुसर काय?" आनदी बोलली.

"तुम्हाला खादी आवडते वाटत?" गोविंदरावानी प्रश्न केला.

"हो. खादीचीं पातळ नेसावी अस मला वाटत परतु हे आणून देत नाहींत. आम्ही काय नेसाव याचहि आम्हास स्वातत्र्य नाही." आनदी खिन्नपणें म्हणाली.

"तुलाच उचलायला जड जातील म्हणून मी आणीत नाहीं!" भाऊराव म्हणाले.

"हलकीं व तलमहि खादीचीं पातळ मिळतात." ती म्हणाली.

"त्याना किंमत फार असते." गोविंदराव म्हणाले.

"इतर वेळेस कधी पैशाचा करता का विचार? रोज सतरादा चहा होतो, नेहमीं गाण्याच्या बैठका, याचा खर्च कोण पाहतो? माझ्या पातळाच्या वेळेस मात्र खर्च दिसतो—" आनदी म्हणाली.

"तुला चहा करायला लागतो म्हणून वाटत? उद्यापासून तुला त्रास देणार नाहीं. आम्ही हॉटेलात जाऊ—" भाऊराव म्हणाले.

"हें काय काहीं तरीच. अस का मी म्हटल? मेल मोकळेपण बोलायची सुद्धा चोरी. तुमच्या मित्रासाठीं चहा करण्यात, चिवडा करण्यात माझ

समाधान असत तो माझा आनद आहे खर्चाच्या सबबी काढता म्हणून मी म्हटल आधी मी कधीं बोलत नाही, बोललें तर असा विपर्यास करायचा. बायकाचा जन्म कठीण!" आनदी जरा सद्गदित झाली.

"बरं तो चहा दे निवून जाईल." भाऊराव म्हणाले

"भाऊराव, तुम्हाला दुसऱ्याच मन कळत नाहीं." गोविंदराव म्हणाले.

"अहो! जरा गमत केली ही नेहमी आनदी असते निर्मळ व निरभ्र आकाशात एखादे वेळेस तरी ढग यावेत मजा दिसते." भाऊराव हसत म्हणाले.

"दुसऱ्याच्या डोळयातील पाणी म्हणजे तुमची मजा चागली आहे हो ही मजा!" आनदी म्हणाली

"डोळयातून पाणी कधी नाहीं आल तर ते पुसायला सापडत नाहींत. आणखी थोडे तुझे डोळे ओले होऊ देत, म्हणजे मग मी ते पुसून टाकीन हें काय, डोळयातून पाणी यायच्याऐवजी ओठातून हसू येऊ लागल. खरे अश्रु असते तर एकदम हसू येत का हो? सागा गोविंदराव? बायकाना नाटक एकदरींत चागल करता येत" भाऊराव थट्टा करू लागले.

"भाऊराव, आता पुरे. अशान खरोखरच मग डोळयाना गळती लागेल. माझ वाक्य लक्षात ठेवा. 'थोडी तों गोडी'." गोविंदराव म्हणाले.

"डोळयातून कधी कधीं पाणी याव म्हणजे डोळे निर्मळ होतात. बाहेरच पाणी लावून डोळे धुण्याऐवजी, आतील पाण्यानेंच जर डोळे धुतले गेले, तर ते अधिक पाणीदार, अधिक पवित्र होतात!" भाऊराव अश्रूचें तत्त्वज्ञान सागू लागले

"परतु म्हणून मुद्दाम रडवूं नये पश्चात्तापाच पाणी असेल तरच डोळे निर्मळ होतील. त्या दिवशीच्या त्या प्रवचनात नाही का ऐकलंत?" आनदीनें आठवण दिली.

"काय, तुम्ही प्रवचनाला जाता? भाऊराव, तुम्हीहि गेले होतेत? मी तुम्हाला कलापूजक समजत होतों. प्रवचन ऐकणारे ते पाषाण अशी मी व्याख्या केली आहे." गोविंदरावानीं मत दिलें.

"अहो, मी जात नव्हतो, परतु हिचा हट्ट पातळाचा हट्ट पुरवताना पैसे लागतात, तसा प्रश्न प्रवचनाच्या हट्ट पुरवताना नव्हता. गेलों झाल. गोविंदराव, तें प्रवचन मात्र खरोखर सुदर होत ते एक दिव्य गानच वाटल." भाऊराव म्हणाले

"माझे आभार माना अस सुदर प्रवचन माझ्या हट्टामुळच तुमच्या कानावर पडल—" आनदी हसत म्हणाली

"कानावर पडल, कानात नाही ना गेल?"—गोविंदरावांनीं कोटी केली

"कानात गेल असत व कानातून हृदयात जाऊन तिथ मुरल असत तर याच्या अगावर खादी आली असती!" आनदी म्हणाली

"म्हणजे खादीप्रवचन होत एकूण? आणि तें प्रवचन दिव्य सगीताप्रमाण वाटल तुम्हाला? खादीतहि जर तुम्हाला सगीताचा आत्मा दिसू लागला असेल तर तुम्हाला मुक्त तरी म्हटल पाहिजे, नाही तर!–" गोविदराव थाबले.

"पशु! कच्चरता का? स्वतःच्च मत स्पष्ट माडाव." भाऊराव म्हणाले.

"आता पुरे हा वाद वरती दिवाणखान्यात जा इथ मला काम आहे. सैंपाकघरात फार वाद करू नये." आनदी म्हणाली

"इथं तुमच राज्य आज्ञा प्रमाण!" असें बोलून भाऊराव उठले व गोविंदरावहि उठले.

या अशा बोलण्यातून त्याचे स्वभाव थोडथोडे प्रकट होत. आनदीसुद्धा अलीकडे मोकळेपणें बोले, चर्चा करी. तिच्याजवळ विचारपुजी असेल असें भाऊरावाना वाटत नसे. परतु आपल्या पत्नीची योग्यता त्याना अधिक वाटू लागली. गोविंदरावाच्या येण्यामुळें आनदीचें जीवनहि अधिक प्रकट होऊ लागलें. ती सुदर स्वयंपाक करी, घर आरशासारखें राखी, सुंदर कलाकुसरीचीं कामें करी. परतु तिला वादविवादहि करता येतो हें भाऊरावास नवीनच दर्शन झालें. मनुष्याच्या जीवनाचें सपूर्ण दर्शन आपणास होत नसतें. जीवनाचे अनत पैलू आहेत. आपल्या जीवनाचे सारे पैलू आपणासहि माहीत नसतात. एकदम एखादा प्रसग येतो, एखादा शब्द कानी पडतो, एखाद्या वस्तूचें वा व्यक्तीचें दर्शन होतें, आणि जीवनाचा एखादा अज्ञात, अदृष्ट पैलू डोळ्यासमोर येतो. अजिंक्याच्या डेऱ्यात आपण गेलों म्हणजे काही भाग आपणास पटकन्

दिसतात परतु सहानुभूतीने हातीं दिवा घेऊन पाहू लागलो, म्हणजे निरनिराळी दर्शनें होतात 'अरे! हें पहा कसें चित्र आहे इकडे अरे, तें पहा दुसरें!' असें आपण आश्चर्यानें एकमेकास सागतों लेणीं पटकन् पाहून येणाऱ्यास हीं अनतदर्शनें होणार नाहीत आजकाल आपलें जीवन घाईघाईचें झालें आहे. जीवनाचा जसा बाजार झाला आहे! हातात घड्याळ ठेवून वागणारे आपण झालों आहोंत सहानुभूतीचा दिवा हाती घेत एकमेकाच्या जीवनात शिरण्यास वेळच नाही. परतु एका दृष्टीनें हें बरें नाहीं का? जीवनात फार डोकावू नये. समुद्रात फार खोल जाऊ नये. जगलात फार आत शिरू नये. तेथें नवीन सौंदर्य, नवीन रत्नें असतील, परतु मगराची व वाघाचीहि तेथें भेट व्हावयाची! अमोल माणिक-मोत्याची भेट घणाऱ्यास मगरानाहि मिठी मारण्याचें धैर्य हवें. जगलाच्या अगदीं मध्यभागाचें गभीर सौद्र्य पाहावयाचें असेल तर वाघाच्या डोळ्यातीलहि सौंदर्य पाहण्याचें धैर्य अगीं असावें लगेल. जीवनाचे धाडसी प्रवासी या गोष्टी करतात. जग त्याचें कौतुक करतें.

त्या दिवशी रात्रीं दोघे मित्र जेवत होते. गमतीची बोलणीं चाललीं होतीं.

"भाऊराव, वैनीच्या हातच मीठहि साखरेपेक्षा गोड वाटत. खानावळींतील दुधतुप वैनींना वाढलेल्या कोरड्या तुकड्यापुढ फिकीं पडतील!" गोविंदराव म्हणाले.

"सर्टिफिकिट फ्रेम करून ठेव ग" भाऊराव म्हणाले.

"सैपाकीणबाईची नोकरी थोडीच कुठ करावयाची आहे मला!" आनदी म्हणाली.

"बायकाच आपल बर. पुरुषानी नोकऱ्या कराव्या व यानीं आपल आयतं खाव. बायका म्हणजे बोजे!" भाऊराव म्हणाले.

"आम्ही का मिळवीत नाही? उद्या घरात सैपाकाला बाई ठेवा, झाडलोट करायला गडी ठेवा, आजारी पडलेंन तर शुश्रूषा करायला घरीं नर्स ठेवा, म्हणजे मग कळेल बायका किती मिळवतात तें. आम्ही घरात जें काम करतों, त्याचा पगारच द्यायचा झाला तर किती द्यावा लागेल? मुलाबाळाची घरीं काळजी घेणारी माता, नऊ महिने बाळाला वाढवणारी ती माता, प्रेमानें सैपाक करणारी ती माता. घरातील शेंकडों बारीक सारीक कामं करणारी,

अनत खस्ता खाणारी ती माता—तिच्या श्रमाचा मोबदला देता येणार नाहीं! ती केवळ श्रमच करते असें नसून त्यात पुन्हा तिच हृदय असत. कधीं रविवार येईल व सुटी मिळेल अस तिच्या मनातहि येत नाही.” आनदीच्या जिभेवर जणू सरस्वती येऊन बोलत होती

“ तुमच्या कामात हृदय असतें म्हणून तर मी मघा म्हटलें, की तुमच्या हातच मीठहि अमृताप्रमाण वाटेल. वैनी, किती गोड असतो तुमचा स्वयपाक! फुलपाखराच चित्र भरणाऱ्या कोमल व प्रेमळ हातचा असतो तो स्वयपाक!” गोविंदराव म्हणाले.

“ मग रोज इथच येत जा जेवायला. कितीदा तुम्हाला सागितल, की खानावळ बद करा म्हणून. सकोच कसला? प्रेमाला का सकोच असतो? आता तुम्ही निराळे थोडेच आहात? तुम्ही आलेत तर मलाहि जेवण दोन घास अधिक जाईल.” भाऊराव म्हणाले

“ मग पोट दुखेल हो!” गोविंदराव म्हणाले वैनींना हसू आलें.

“ वैनींना हसवल म्हणजे मला कृतार्थ वाटत!” गोविंदराव म्हणाले.

“ कळीला फुलवण साध काम नाहीं. मारून-मुटकून तें होत नाहीं.” भाऊराव म्हणाले

“ मारून-मुटकून जें हसू आणलेल असत, तें भेसूर असत हसू खुदकन् आलं पाहिजे. खर ना हो वैनी? त्या पहा पुन्हा हसल्या. का लपवता तें हसू? डोळ्यातील असू छपवावे, परतु ओठावरच गोड हसू लपवू नये. तें तिथ फुलू द्याव, सर्व तोंडावर पसरू द्याव, जवळच्या मडळींच्या जीवनातहि ओताव. नाहीं का भाऊराव?” गोविंदरावानी प्रश्न केला.

“ फार बोलता तुम्ही. जेवा आता तुमच होईल काव्य, परतु तुमच्या वैनींना लागलीसेल भूक. वादविवाद दिवाणखान्यात!” भाऊराव पत्नीकडे पाहत म्हणाले.

“ वैनी, तुम्हीहि बसा ना. आता आम्हाला काहीं नको.” गोविंदराव म्हणाले.

“ अजून ती जुन्या काळची आहे. माझ उष्ट ताटच तिला पाहिजे जेवायला—” भाऊराव म्हणाले.

"तुमचीहि त्याला संमति असते. कारण मागूनच्या भातातील थोडा दहीभात तुम्ही मुद्दाम वगळता, हें मी पाहिलं आहे." गोविंदराव म्हणाले.

"अहो जास्त वाढते ती. नवऱ्याच पोट दुखेल याची कुठं पर्वा!" भाऊराव म्हणाले.

"ते दोन घास पोटात गेले, तर का पोट दुखेल? काहीं तरी! मला सारं समजतं. ते दहिभाताचे दोन घास म्हणजे थोर काव्य आहे. तें संगीत आहे. हें संगीत ज्यांना जीवनात अनुभवता येत ते धन्य होत!" गोविंदराव म्हणाले.

"मग लग्न करा ना?" वैनी म्हणाल्या.

"लग्न करणारे सारेच, वैनी, हा आनंद अनुभवू शकत नाहीत. जाऊं दे! थोडं ताक वाढा वाटींत." गोविंदराव म्हणाले.

भाऊरावाचे दिवस असे आता आनंदात चालले होते. जीवनात प्रेमळ प्रकाश पसरला होता. दुःखाची इवलीहि छाया कोठें नव्हती. मित्राचा लाभ ही एक अपूर्व वस्तु आहे!

---

## मनोहर

## २

राष्ट्रीय सप्ताहाचे ते दिवस होते जालियनवाला बागेतील शेंकडों लोकांच्या कत्तलीच्या स्मरणाचे ते दिवस होते हिंदु-मुस्लीम ऐक्याच्या स्मरणाचे ते दिवस होते. असहकार, सत्याग्रह, कायदेभंग याची भारतात पुण्यप्रभा फाकण्यापूर्वीच्या उप:कालाच्या स्मरणाचे ते दिवस होते. ते पवित्र दिवस होते हिंदुस्थानभर त्या सप्ताहात राष्ट्रीय कार्यास खूप चालना मिळे ज्या सप्ताहात महात्माजीहि एक दिवस उपवास करतात, त्या सप्ताहाचें माहात्म्य काय वर्णावें ? महात्माजीचा उपवास म्हणजे उपनिषद् ध्येयदेवाजवळ जिवेंभावें एकरूप होऊन जाण्याचे ते दिवस होते. कोणी कॉंग्रेसचे सभासद नोंदवीत होते, कोणी हरिजनवस्तींत स्वच्छता निर्मित होते, कोणी हिंदुमुस्लीम ऐक्याचे समारंभ साजरे करीत होते, कोणी गाणी गात झेंड्याची मिरवणूक काढीत होते, कोणी दरिद्र-नारायणास आधार देणारी निर्मळ खादी खपवीत होते. ज्याला जें करता येईल, तें तो करीत होता

रोज शंभर रुपयाची खादी खपविल्याशिवाय जेवावयाचें नाहीं असा मनोहरानें संकल्प केला होता. दिवसभर तो खादी खांद्यावर घेऊन, गाणीं गात

सर्वत्र हिंडे. घरोघर जाई. कोठे त्याचें स्वागत होई, कोठें त्याला कुत्र्याप्रमाणें हाकलून देत ! सूर्य अस्तास जात असावा, शभर रुपयाची खादी खपून गेली असावी, आनदी मनोहर मग आपल्या खोलीत जाई. पोटभर जेवे दुसऱ्या दिवसासाठी तयार होई.

एके दिवशी तो असाच खादी घेऊन निघाला सकाळची ९ वाजण्याची वेळ होती. एका घराजवळ तो थाबला कोणाचें होतें तें घर ? वर दिवाणखान्यात गाणें चाललें होतें पेटी वाजत होती दु.खी व आनदी लोकाचें तें घर होते मनोहरच्या मनात आले कलावान् लोक सहृदय असतात. कलावानाला दुसऱ्याचे दु.खी ससार बघवणार नाहीत. येथें खात्रीनें माझी खादी खपेल तो जिना चढून वर गेला. दिवाणखान्यात जाऊन उभा राहिला. पेटी बद झाली गाणें थाबलें

" राष्ट्रीय सप्ताह आहे खादी घेता का ? " मनोहरनें विचारलें.

" इथ खादीवाल्यास मज्जाव आहे आधीं बाहेर व्हा." गोविंदराव म्हणाले

" जिथ खादीला मज्जाव तिथ कलेलाहि मज्जाव. तुम्ही गाण गात आहात तुम्ही रसिक आहात. तुम्हाला भावना आहेत माझ्या खाद्यावरील खादींत अपरपार भावना भरलेल्या आहेत. घ्या, थोडी घ्या गरिबाचीं हृदय स्वतःच्या हृदयाशीं जोडा. कला म्हणजे सर्वांचीं हृदय एकत्र आणण. या राष्ट्रीय सप्ताहात तरी दरिद्री राष्ट्राच स्मरण ठेवा. " मनोहर विनवीत होता

" फार महाग असते तुमची खादी " भाऊराव म्हणाले

" या दिवाणखान्याला तुम्ही रग दिला आहे, हे फोटो लावले आहेत, हे गालीचे आहेत, याना नाहीं का पैसे पडले ? " मनोहरनें विचारलें.

" अहो सौंदर्यासाठी कितीहि खर्च केला तरी तो कमीच आहे. " भाऊराव म्हणाले.

" खादीनहि देशात सौंदर्य फुलेल. दरिद्री लोकाना उद्योग मिळून त्याच्या पोटात दोन घास जातील. त्याच्या मुलाबाळास खायला मिळेल. त्याची दुःखी तोंड हसतील. दुःखान, उपासमारीन काळवडलेल्या तोंडावर आनंद फुलण म्हणजे सौंदर्य नाहीं का ? तीं जिवत चित्र—त्याच्या शरीराच्या फ्रेमी

खिळखिळ्या झाल्या आहेत ती त्याची शरीर तेजस्वी, बलवान् करण म्हणजे सौंदर्यसमृद्धि नाही का ? घ्या—थोडी खादी घ्या गरिबाच्या संसारामधें सौंदर्य न्या." मनोहरनें प्रार्थिलें

" गांधींचे लोक मोठे गप्पाडेच. किती ठिकाणी उपासमार पाहिलीत हो ? " गोविंदरावानीं विचारलें.

" मी हिंदुस्थानभर हिंडलों आहे जिथ जिथं खादी-उत्पत्ति-केंद्र आहेत, त्याच्या आसपास मी हिंडलों आहे. चिंचेचा पाला उकडून जगणारे लोक मीं पाहिले आहेत. फार लांब कशाला ? या सुंदरपुरातहि एक वेळ जेवणारे लोक मला भेटले आहेत. तुम्ही कल्पना साम्राज्यात राहता. खादी-केंद्रातून सुताच काम मिळाव म्हणून किती भाऊ-बहिणी येऊन रडतात तें जाऊन पाहा खादी खपत नाहीं. म्हणून त्याना काम न देता परत पाठवण्यात येत. तुम्ही आपापले दिवाणखाने सोडून जर खेड्यापाड्यातून हिंडाल, कान उघडे ठेवून बोलणीं ऐकाल, डोळे उघडे ठेवून लोकाचे चेहरे पाहाल, तर तुमच्या भ्रामक कल्पना उडून जातील. मग खादी वापरण तुम्हास धर्म वाटेल. तुम्ही तरी घ्या हो थोडी. तुमच्या डोळ्यावरून वाटत, की तुम्हाला घ्यायची आहे " मनोहर भाऊरावास उद्देशून म्हणाला.

" भाऊराव, खबरदार घ्याल तर. माझी मैत्री पाहिजे असेल तर खादी घेऊं नका—" गोविंदराव म्हणाले.

" खादीचा इतका द्वेष तुम्ही का करता ? " मनोहरनें विचारलें.

" तें मला माहीत नाही. खादी म्हणजे मूर्तिमत प्रेम, खरी जीवनकला, खर सहृदय सौंदर्य, अस कितीहि तुम्ही वर्णन केलंत तरी माझ हृदय हलणार नाही. खादी पाहिली, की माझ पित्त भडकत. खादी म्हणजे भिकारपणाची लक्षण. खादी म्हणजे सुतकीपणा. खादी म्हणजे घुबडासारख गंभीर तोंड करण. खादी म्हणजे आनंदाचा अस्त, सुखाची हकालपट्टी खादी म्हणजे एक प्रकारच वैराग्य. खादी अंगावर आली की मग ती मला टोचील. ती म्हणेल " विडा खाऊ नकोस, विडी ओढू नकोस, सिनेमा पाहूं नकोस, नाटकास जाऊ नकोस, श्रीखंड करूं नकोस, मेजवानी करू नकोस." खादी म्हणजे टोंचणी व बोंचणी ! खादी अंगावर घालण म्हणजे सुखाचा

जीव दुःखात घालण मी हल्लीं वाटेल तिथ जातों, वाटेल तें करतों. पटकन् हॉटेलात जातो, भजी खातो. परतु खादी अगावर आली तर लाज वाटू लागेल खादी म्हणजे मनाचा कोंडमारा, जीव गुदमरण. भाऊराव, नका— ही खादी घरात घेऊ नका. ही खादी तुम्हास देशोधडीस लावील, भिकारी बनवील. ही खादी उद्या तुम्हाला म्हणेल, 'शट सोड व खेड्यात जा. माडी सोड व तुरुगात जा' वेळीच ही खादी दूर ठेवा. जा–स्वयसेवकसाहेब, जा, इथ कोणीहि खादी घेणार नाही इथ आनदी फुलपाखर आहेत आणि त्याना तसच आनदी रहायच आहे" गोविंदराव म्हणाले.

क्रोध, मत्सर, द्वेष, उपहास यानी भरलेले ते शब्द ऐकून कोणीच काही बोललें नाहीं. परतु शेवटीं तो स्वयसेवक म्हणाला, तुम्ही खादीची दूषण म्हणून जी सागितलीत ती भूषणच आहेत. खादी दुःखी रहा अस कधीं सागत नाहीं महात्माजींचि हास्य तर जगप्रसिद्ध आहे. त्याचा विनोदी स्वभाव खादीमुळ मेला नाहीं खादी आनदाला–सुखाला स्थान देते. न कळत खादीमुळ सयमहि येईल, न कळत देशभक्ति येईल. तिच्याभोंवतीं एक तेजोवलय आहे तिच्याभोंवती पवित्र भावना गुफल्या गेल्या आहेत. महान् व्यक्तींनी तिचा प्रचार सुरू केल्यामुळ साहजिकच खादी म्हणजे पावित्र्याच, त्यागाच, स्वातत्र्याच प्रतीक बनली आहे. परतु मी या गोष्टी सागत नाहीं. केवळ गरिबास दोन घास मिळतील, बेकारास काम मिळेल या दृष्टीन तरी घ्या, एवढच मी सागतों. एवढाच अर्थ तिच्यात पहा. नसाल घेत तर मी जातों. शभर रुपयाची खादी रोज खपवण्याचा या सप्ताहापुरता मीं सकल्प केला आहे. सकल्प रोजचा पुरा झाला म्हणजेच मी जेवतों. तुम्ही नाहीं घेणार थोडी?" मनोहरनें सद्गदित होऊन विचारलें.

"असले सकल्प का करता? लोकावर हें ओझ का घालता? खपेल तेवढी खपेल. असले सकल्प म्हणजे जनतेवर जुलूम आहे. असल्या सकल्पास आम्ही सहानुभूति दाखवता कामा नये. तुम्हास धडा शिकवला पाहिजे. दोन-चार दिवस उपवास पडले म्हणजे असला आततायीपणा पुनः तुम्ही करणार नाहीं. असल्या दभापासून दूर रहाल. आपण मोठे सत अस तुम्ही भासवीत असता म्हणून तर मी खादीचा तिरस्कार करतों. अगावर खादी घातली, कीं आपण

महापुरुष झालों अस प्रत्येकास वाटू लागत. जा आता, पुढ पुष्कळ घर आहेत." गोविंदराव तिरस्कारानें म्हणाले.

तो स्वयसेवक निघाला. भाऊरावानें मन द्विधा झालें होतें. परतु मित्राचा पाश त्याना तोडवेना.

"भाऊराव, मीं तुम्हाला वाचविल. आज खादी घरात येऊ देऊ नका. मोठे शब्दवेल्हाळ असतात हे लोक." गोविंदराव म्हणाले.

पुन्हा पेटी सुरू झाली गोविंदराव राग आळवू लागले. भाऊराव डोलू लागले.

माडीवरील सवाद आनदी ऐकत होती. तिला वाईट वाटलें. स्वयसेवकाचा खिन्न चेहरा तिनें पाहिला. त्या स्वयसेवकाला तसेंच पाठविणें तिला पाप वाटले. तिनें त्याला हाक मारली. तो परत आला. तिनें त्याच्याजवळून बरीच खादी खरेदी केली. "मला एक पातळहि आणून द्या, मी विकत घेईन" ती म्हणाली. स्वयसेवकाचा चेहरा फुलला. जीवनात एकदम प्रकाश आला असे त्याला वाटलें.

"स्त्रियाच्या हृदयात अधिक दया असते हें म्हणण खोट नाही." मनोहर म्हणाला.

"परंतु स्त्रिया तरी कितीशा खादी घेतात? त्याच्या हृदयातीलहि दया मेली आहे. प्रत्येकाची दया स्वतःपुरती. दया वाढत नाही. प्रेमाचं वर्तुळ मोठ होत नाहीं. भगिनीमडळात एक दिवस तुम्ही व्याख्यान द्याल का? तिथ एकदम काही खपेल खादी. काही परिणाम होईल." आनदीनें सूचना केली.

"परतु कोण ठरवणार व्याख्यान? व्याख्यान देणाहि मला तस फार आवडत नाहीं." मनोहर म्हणाला.

"व्याख्यानाचा काहीं तरी परिणाम होतोच. कटाळा करू नये व्याख्यान देण्याचा. तुम्ही स्वतः गाठोडीं घेऊन हिडता. तुमच्या व्याख्यानाचा परिणाम नाहीं का होणार? बोलघेवड्याचीं व्याख्यान मलाहि नाही आवडत. मी भगिनीमडळात जाऊन ठरवीन. उद्या तुम्हाला कळवीन. सकाळीं भेटा. दुपारीं दोन ते तीन ठेवावें?" आनदीनें विचारलें.

" काही हरकत नाही. जातों मी. वंदे मातरम् " मनोहर म्हणाला.

मनोहर निघून गेला. दहा वाजावयाची वेळ होत आली गोविंदरावहि निघाले. भाऊराव व ते दोघे खाली आले. त्याना ती खादी दिसली.

" हे काय, वैनी, खादी घेतलीत की काय ? तुम्हाला शेवटी फसवलंच त्यान. रडला असेल तुमच्याजवळ, होय ना ? " गोविंदरावानी विचारलें.

" अग थोडी घ्यायची, एवढी कशाला ? " भाऊरावानी विचारलें.

" मीं मला पातळहि आणखी आणायला सागितल आहे. या कापडाचे तुम्हाला शर्ट देईन शिवून " आनदी हसून म्हणाली.

" आपण नाहीं घालणार तुरुगातला कैदी दिसेन मी—लोक सारे हसतील ! " भाऊराव म्हणाले.

" आपला देश सारा तुरुगच आहे. तोंपर्यंत कैदीच आहोंत सारे. लोक हसू देत. परतु मी हसणार नाही. माग एकदा एक पातळ घेताना तुम्ही म्हणाले होतेत 'हेंच घे. हें पातळ तुला शोभेल' कोणत पातळ नेसल्यावर मी चागली दिसेन हें तुम्ही ठरविल आज आता तुम्ही कोणता शर्ट घातला तर चागले दिसाल हें मला ठरवू दे. आपल्या पत्नीन कोणत पातळ नेसाव, त्याचा कोणता रग असावा, हें ठरवण्याचा तुम्हाला हक्क आहे, तसाच पतीन कोणता पोषाक करावा, कोणत्या रगाचा असावा, हें आम्हाला नाहीं का ठरवण्याचा हक्क ? तुमच्या प्रेमासाठी तें पातळ मी नेसलें. माझ्या प्रेमासाठी तुम्ही खादी घाला." आनदीनें व्याख्यान दिलें.

" वैनी, आपण तुमच घर वर्ज्य करू." गोविंदराव म्हणाले.

" माझ्या हातच मीठहि तुम्हाला गोड लागत. तुम्ही इथ आल्याशिवाय राहणार नाहीं. तुम्हालाहि दोन शर्ट शिवून देईन. ज्या हातच मीठ साखरेप्रमाण वाटत, त्या हातचे खादीचे शर्टहि रेशमासारखे वाटतील, नाहीं ? " आनदीनें हसून विचारलें.

" वैनी, तुमच्या लक्षात सार कस राहत. " गोविदरावानीं विचारलें.

" अहो, स्वतःची स्तुति कुणाच्या लक्षात राहत नाहीं ! त्यातून बायकाना तर स्तुति फारच आवडते भाड चागल घासल आहे, सदरा चागला धुतला

आहे, भाजी चांगली झाली आहे, असं नेहमी म्हटलेलं ऐकावं, असं त्यांना वाटत असतं." भाऊराव म्हणाले.

"व्याख्यान चांगलं झालं, लेख चांगला आहे, गाणं चांगलं झालं, असं ऐकण्याचं आमच्या वाट्यास थोडंच आहे? जें आम्ही करतों, त्याला कोणी चांगलं म्हटलं तर आम्हाला आनंद होतो. पुरुषांना स्तुति नाहीं आवडत हें नवीनच ऐकलं. मुक्त पुरुषच आहेत जणू सारे. मग घालाल ना खादीचा शर्ट?" आनंदीनें पुन्हा विचारलें.

"तुमच्या हातचें कोण घालणार नाहीं!" गोविंदराव म्हणाले.

---

# पावसामुळें परिचय ३

राष्ट्रीय सप्ताह समाप्त झाला होता मनोहर अद्याप सुंदरपुरातच होता. तो कोठें व्याख्यान देई, कोठें प्रवचन देई, कधी भगिनीमंडळात जाई, कधीं विद्यार्थिसंघात जाई पहाटे उठून तो गोड प्रभातफेरीची गाणीं गात हिंडे. दुपारीं नदींत जाऊन डुबे नदीकाठीच एखाद्या झाडाखालीं टकलीवर सूत कातीत बसे गाई चारणारे गुराखी आजूबाजूस कौतुकानें उभे राहात. काठी-वर हनुवटी टेकून मनोहरकडे ते बघत. गाईच्या कासेंतून दुधाच्या धारा निघाव्या, त्याप्रमाणें तें स्वच्छ झटकन् निघणारें सूत बघून त्याना आश्चर्य वाटे. एखादा धीट मुलगा पुढें येऊन म्हणे "मला पाहू द्या हो." मनोहर त्याच्या हातात टकली देई व त्याला शिकवी.

"इथ तुम्ही रोज या व आम्हाला शिकवा." एखादा म्हणे.

"गाई चरत राहतील, सूत निघत राहील" मनोहर म्हणे.

"कृष्ण बासरी वाजवी, आम्ही टकली चालवू." दुसरा कोणी बोले.

"ही गांधींची टकली आहे, होय ना हो?" कोणी प्रश्न करी.

"होय. ही अमर टकली आहे. हिने आपण स्वराज्य मिळवू मनोहर सांगे.

"स्वराज्य म्हणजे काय?" ते विचारीत.

"स्वराज्य म्हणजे आपल्या हातात कारभार" मनोहर उत्तर देई.

"आमच्या गाईंना मोफत चरू देतील? कोंडवाड्यात नाहीं घालणार? जंगलचे शिपाई फार त्रास देतात" ते गुराखी सांगत.

"होय स्वराज्यात गाईंना चरायला रान मोफत राहील" मनोहर म्हणे.

"मग तर मजा!" ते आनंदानें म्हणत. अशीं बोलणी होत व मग मनोहर त्या गुराख्याकडे हसत बघत निघून जाई. तीं पोरें टाळ्या वाजवीत, 'गांधी बाप्पा की जय' अशी गर्जना करीत, आनंदानें गाईच्या पाठीवर जाऊन बसत.

उन्हाळा संपून पावसाळा सुरू झाला होता. नदीचें पाणी वाढलें, लालसर दिसू लागलें. शेतातून हिरवे हिरवे अंकुर दिसू लागले. डोंगर-पहाड शुचिर्भूत होऊन हिरव्या शालजोड्या पांघरू लागले व चातुर्मास्याचें व्रत आचरू लागले.

जेव्हा पाऊस थांबे तेव्हा सृष्टि सौम्य व सुंदर दिसे. त्या दिवशीं तिसरे प्रहरीं मनोहर वनांत फिरत होता. हळुवार पावलांनीं चालत होता. हिरव्या गवतावर मधून मधून ते अत्यन्त कोमल व सुकुमार मृगाचे किडे दिसत होते. हिरव्या गालिच्यावरचीं जणू लहान लहान लाल-माणकेंच! मनोहर त्यांना बोट लावावयास जाई, परंतु बोट मागें येई. ते नयनमनोहर किडे अकस्मात् येतात, क्षणांत पुन्हा मातींत मिळतात, काय त्याचें सृष्टींत कार्य, कोणता त्याच्या जीवनाचा हेतु? परंतु हेतुविरहित या विश्वांत कांहींहि नाहीं. प्रत्येक कण, प्रत्येक बिंदु, प्रत्येक जीव आपलें जीवनकार्य करून पुन्हा अदृश्य होतो. मनोहर डोळ्यांनीं सृष्टिसौंदर्य पाहत होता, मनांत विचार करीत होता. पण एकाएकीं पाऊस सुरू झाला. मनोहर पळू लागला. पायाखालीं मृगाचा किडा चिरडेल म्हणून पुन्हा हळू चालू लागला. तो शहरांत शिरला. तसाच भिजत जात होता. त्याच्यामागून कोणी तरी धावत येत होतें. एवढ्या लगबगीनें कोण येत होतें? अंगांत ओव्हरकोट आहे, डोक्यावर छत्रीहि आहे. त्या माणसानें एकदम मनोहरला गांठून त्याच्या डोक्यावर छत्री धरली. मनोहरनें पाहिलें तों भाऊराव!

"छत्री कशाला? तुमच्याबरोबर मग हळूहळू चालावं लागेल. माझे कपडे तर भिजले आहेत. मी अधिकच गारठेन." मनोहर संकोचानें म्हणाला.

"आमच्याकडे चला आता. दुसरे कपडे घाला. खादीचे कपडे देऊ." भाऊराव म्हणाले.

"ते माझ्यासाठी ठेवले आहेत वाटत ?" मनोहरने विचारलें.

"माझ्याहि अगात आहेत." भाऊराव हसत बोलले.

"धोतर तर निराळ आहे" मनोहर म्हणाला

"सध्या हृदयाशी खादी धरली आहे" भाऊरावानी सागितलें.

"हृदयात भरपूर रक्त असेल तर सर्वत्र जाईल. पायात जाईल, डोक्यात जाईल, खालीवर सर्वत्र जाईल नाहीं का ?" मनोहरनें विचारलें

"खादीचें बोलणें काढताच तुमची हुडहुडी थाबली कशी युक्ति केली ?" भाऊराव म्हणाले.

"खादी ऊबदार आहे. दरिद्री भावाबहिणीस ती ऊब देते. उपासमारीच्या थडीत गारठू देत नाही थडगार झालेल्या राष्ट्राला ऊब देऊन वाचवू पाहणारी खादी ही सजीवनी आहे जातों आता मी. पळतपळत जाईन." मनोहर म्हणाला.

"माझ्या छत्रींत का तुम्हाला सकोच वाटतो ? अहो, सेवकानीं सकोच सोडला पाहिजे प्रकाशान सर्वत्र जाव, पावसान सर्वत्र वर्षाव. तें पहा आलच आमच घर चला आज आमच्याकडे जेवा." भाऊरावानी मनोहरचा हात धरून म्हटलें.

आनदी माडीवरच होती. तों दोघे आले

"याना नेसायला तें खादीच धोतर दे ग, आणि शर्टहि आण." भाऊराव म्हणाले.

आनदीनें आधी टॉवेल आणून दिला मनोहरनें अग पुसून टाकलें. नतर तो कोरडे कपडे ल्यायला.

"हें इथंच जेवणार आहेत बर का ग." भाऊरावानी सागितलें.

"शेगडीत निखारे आणून देऊ का ?" आनदीनें विचारलें.

"नको, या खादीन खूप ऊब आली आहे." मनोहर म्हणाला.

"आता आधीं सैपाक कर. आम्हाला भूक लागली आहे." भाऊराव म्हणाले.

"मग काहीं खायला आणून देऊ?" आनदीनें विचारलें.

"आता खाऊ? मग जेवणार काय?" मनोहरने प्रश्न केला.

'गाधींचे लोक म्हणजे सयमी. सार मोजून-मापून काम. तुम्ही दोनच वेळा खात असाल होय ना?" भाऊरावानीं हसत विचारलें

"तस माझ व्रत अस नाही." मनोहरनें सरळ उत्तर दिलें.

आनदी खाली गेली व स्वयपाकात रगली. पाऊस थाबला होता. आकाशात पुन्हा तारे हसू लागले. ढगाचे काळे पडदे दूर करून ते आपली तोंडें दाखवीत होते. बाहेरच्या गच्चीत मनोहर उभा राहिला व गुणगुणू लागला. भाऊराव खालीं गेले होते. दिवाणखान्यातील एक आरामखुर्ची मनोहरनें बाहेर नेली व तीत पडून तो वरची आकाशाची मौज पाहत होता. भाऊराव केव्हा आले तें त्याला कळलेंहि नाहीं. मग त्याच्या लक्षात आल्यावर तो लाजला व खुर्चीतून उठला

"अहो बसा. उठता का? मी दुसरी खुर्ची बाहेर आणतों" असें म्हणत त्यानीं दुसरी खुर्ची आणली. दोघे खुर्चीत बसले. ते एकमेकाकडे पाहत व हसत.

"भाऊराव, तुमच मन वकिलाच नाहीं. एका स्वयसेवकाच्या डोक्यावर छत्री धरणारे गृहस्थ का वकील असू शकतील? मनोहरन बोलण्यास आरभ केला.

"वकील का वाईट असतात? सारे देशभक्त वकील होते." भाऊराव म्हणाले.

"परतु सारे वकील देशभक्त नसतात. खरा वकील तो जो अन्यायाविरुद्ध भाडावयास उभा राहील. सरकारच्या कायद्याप्रमाणें कसरत करणारा वकील, हा खरा वकील नव्हे. सत्याची तरफदारी करील तो वकील—मनोहर म्हणाला?

"सत्य कायद्यान ठरत." भाऊराव म्हणाले.

"इग्रजी कायदा म्हणजे का सत्य? ३५ कोटि लोकाची ज्या कायद्यान कायमची पिळणूक होते, तो कायदा केवळ असत्य व अन्याय यावरच

उभारलेला असणार. तुम्ही सर्व वकिलानी ते कायदे आधीं मोडले पाहिजेत. तुम्ही बडखोर व्हाल तरच खरे वकील ठराल." मनोहर भावनावश होऊन बोलू लागला.

" बडाची भाषा नका बोलू इथ या दिवाणखान्यात गोड सगीतच शोभत " भाऊराव म्हणाले.

" तुम्हाला सगीताच खर प्रेम असेल तर तें झोपडीझोपडींत जाव अस तुम्हाला वाटेल, परतु झोपड्यातून तर मरण जाऊन बसल आहे तें मरण दूर करून तिथ सुखमय जीवन न्याल, तेव्हाच सर्वत्र सगीत येईल. त्यासाठीं आधी बड करा " मनोहर म्हणाला

" भुका ना तुम्हाला लागल्या आहेत ? मग आधीं जेवायला चला आता." हळूच येऊन आनदीनें सागितलें.

भाऊराव व मनोहर पाटावर बसले.

"तिखटाची भाजी मला नको मी आधी सागितल नाहीं." मनोहर सकोचानें म्हणाला.

" परतु तुमच्यासाठीं मीं फिकी ठेवली आहे " आनदी म्हणाली.

" तुला ग काय माहीत ? " भाऊरावानी विचारलें.

" त्या दिवशी भगिनीमडळात हे म्हणाले होते, कीं बायकाचा किती तरी वेळ मसाले, तिखट यात जातो. त्याचा प्रकृतीस उपयोगहि नाही." आनदीनें सागितले

" तुला तर फोडणीची मिरची आधीं हवी " भाऊराव म्हणाले.

" परतु स्वभाव तर त्याचा प्रेमळ दिसतो " मनोहर म्हणाला.

" पाहुण्यासमोर प्रेमळ, मला तर खायला येते." भाऊराव मोठ्यानें हसून म्हणाले.

" दुसऱ्यासमोर तरी अस बोलू नका ! " आनदी म्हणाली.

" म्हणजे माझ म्हणण खर आहे ना ? " भाऊरावानीं विचारलें.

" जेवा आधीं; बोलणच फार मेल." रागाचा आविर्भाव आणून आनदी म्हणाली.

" तुमचं नाव काय हो ? " भाऊरावानीं विचारलें.

"मनोहर." मनोहरनें सांगितलें

"छान आहे नाव." आनंदी म्हणाली

"माझं नाव वाईट आहे वाटतं? लग्नांत बदललंस कां नाही?" भाऊ रावांनीं विचारलें

"आम्हांला हक्क कुठं आहे? मुलींची नांवं बदलतात जणूं त्यांना संन्यासच देत असतात!" आनंदी म्हणाली

"संन्यास देतांना नांव बदलून ब्रह्मानंद, सेवानंद असीं नवीं नांवं घेतात. तुझं मी तसंच 'आनंदी' असें नांव ठेवलं. गृहस्थाश्रमातील संन्यास!" भाऊराव हसून म्हणाले

"रडवण्यासाठीं वाटतं आनंदी नांव ठेवलंत?" आनंदीने विचारलें.

"बायका मनांत रडतात." मनोहर म्हणाला.

"नवऱ्याला बळजबरीनं खादीच्या पासोड्या नेसायला लावूं पाहणारी बायको कां कधीं रडेल? ती नवऱ्याला रडवील—" भाऊराव म्हणाले.

"बरं पुरे आतां." आनंदी म्हणाली

"रडणारी बायको असा हुकूम फर्मावील कां हो?" भाऊरावांनी विचारलें.

"अश्रूंची सत्ता फार मोठी असते!" मनोहर म्हणाले.

"मग ३५ कोटि लोकांस रडायला शिकवा म्हणजे इंग्रज पळेल" भाऊराव म्हणाले.

"एकमेकांचं दुःख पाहून रडाल तेव्हांच स्वराज्य येईल. दुसऱ्याबद्दल सहानुभूति वाटूं दे. म्हणजे संघटना होईल—म्हणजे सामर्थ्य येईल. अश्रूंतून शेवटीं बळ उत्पन्न होतं" मनोहर म्हणाला.

जेवणें झालीं भाऊराव व मनोहर वर आले.

"मनोहर, तुम्ही इथं एकटेच आहांत?" भाऊरावांनीं विचारलें.

"हो." मनोहर म्हणाला.

"तुमचं घर कुठं?" भाऊरावांनी पुन्हां प्रश्न केला.

"मी जाईन तिथं माझं घर मी एकटाच आहे. मानमोडीच्या साथींत

माझे आईबाप मरण पावले. माझी भावंड सारी मरण पावली. मीच एकटा दुर्दैवी या जगात उरलो " मनोहर सांगू लागला

" तुमचा कुणी सांभाळ केला ? कुणी आधार दिला ?" भाऊरावांनी विचारलें.

" मी त्या वेळेस १२ वर्षांचा होतों. आज माझं २५ वर्षांच वय आहे. कांहीं दिवस मी आजोळी होतों मराठी सातवीची परीक्षा देऊन मी कुठं तरी नोकरी करावी असं आजोबाचं म्हणणं होतं परंतु मी त्याला तयार नव्हतों आजोबा अधिक शिकवावयास तयार नव्हते शेवटीं मीं आजोळ सोडलं दुनियेंत गेलों मुंबईस एका खानावळींत वाढपी म्हणून राहिलों मी वाढप्याचं काम फार चांगलं करीत असें एके दिवशीं काय झालं वाढताना मला सारखं रडू येत होतं मला आईबापाची आठवण येत होती. आपणास जगांत कोणी नाहीं याचं वाईट वाटत होतं वाढण्यात माझं लक्ष नव्हतं. आमटी वाटींत ओतण्याऐवजी मी ताटांतच ओतली. जेवणारा ओरडला. मालक आला व त्यानं माझ्या थोबाडींत मारली. माझं हृदय दुभंगलं. मी तिथून बाहेर पडलों त्या खानावळींतून सुटलों. त्या खानावळींत एक फायदा मात्र झाला. तिथं अनेक वर्तमानपत्रं वेण्यात येत असत तीं मी दुपारीं वाचीत असें तसंच जेवणारे लोक ज्या गप्पा मारीत त्या ऐकत असें. महात्मा गांधींची असहकाराची चळवळ सुरू झाली होती वर्तमानपत्रांतील तीं वर्णनं वाचून माझं हृदय उचंबळे " मनोहर थांबला

" तुम्ही मग तुरुंगांत वगैरे गेले असाल ?" भाऊरावांनीं विचारलें.

" तुरुंग म्हणजे आमचं माहेरघर ! मी एका राष्ट्रीय शाळेंत शिकत होतों. मुळशीच्या सत्याग्रहांतहि मी होतों—नागपूरला मी होतों. नागपूरच्या झेंडा-सत्याग्रहांतहि मी होतों. नागपूरला मी पायीं गेलों होतों वाटेंत अनेक गांवं पाहिलीं. लोकांचं दुःख व दारिद्र्य पाहिलं. परंतु भारताची उदारताहि पाहिली. या चळवळींतून मी पुष्कळ शिकलों. निरनिराळ्या चर्चा ऐकावयास मिळत. अनेक सत्याग्रहींपासून अनेक प्रकारचं ज्ञान मिळे. मी श्रवणभक्ति करीत असें. मी वादविवाद करीत नसें." मनोहर म्हणाला.

" वादविवादानं प्रश्नाचं सांगोपांग ज्ञान होतं. सर्व बाजू कळतात, वाद-विवाद उपेक्षू नये." भाऊराव म्हणाले.

“ मी वादविवादास कमी समजत नाही, परतु माझी ती वृत्ति नाहीं. मी जगाच्या शाळेंत शिकत होतों. किती तरी शिक्षक मला मिळाले, आणि ते विविध प्रकारचे ! शाळेंतील तेंच तें शिकवणारे रडके शिक्षक माझ्या नशिबीं नव्हते. मी काही दिवस गुजराथ विद्यापीठातहि होतों. ध्येयवादी आचार्यांपासून अमोल विचार मला मिळाले. हल्लीं मी भटकतच असतों. खादी खपविण हें माझ काम खादी डोक्यावर घेण म्हणजे माझ्या दरिद्री बधुभगिनीस डोक्यावर घेण. ज्या ज्या वेळेस मी एकटा आहे अस मला वाटत त्या त्या वेळेस मी खादी हृदयाशी धरतों ती खादी मला म्हणते, ‘ तू एकटा नाहीस. ही खादी हृदयाशी धरणारा कोट्यवधि भुकेल्ल्या बधुभगिनीचा सखा आहे ती सारी भावड तुझी आहेत. तू त्याच्या ससारात सुख ओतीत आहेस. तू भाग्यवान् आहेस ! केवढ मोठ तुझ घर ! किती तुझीं बहीण-भावड !’ हे विचार मनात येऊन मी गहिवरतों. माझ दुःख मी विसरतों. भारताच दुःख डोळ्यासमोर येत भाऊराव, या खादीत मला सारीं उपनिषद दिसतात, वेद दिसतात या खादीत सताचे आत्मे मला भेटतात. ही खादी खाद्यावर घेऊन फिरताना मला मोक्षसुख मिळतं. खादीची गाणीं म्हणावीं, खादीवर व्याख्यान द्याव, लोकाचे यथामति सशय दूर करावे, खादी खपवावी, हा माझा जीवनधर्म आहे ! ” मनोहर थाबला.

“ परतु हा आमचा जीवनधर्म कधी होईल ? ” भाऊरावानीं विचारलें.

“ होईल. माझी तर श्रद्धा आहे, कीं एक दिवस असा उजाडेल, की सर्व विचारवताच्या अगावर खादी दिसेल. ज्याला ज्याला हृदय आहे व थोडीफार उदार बुद्धि आहे, त्याला खादी वापरल्यावाचून राहवणार नाहीं.” मनोहर म्हणाला.

“ मनोहर, मनात अनेक विचार येतात. परतु त्यातील फारच थोडे जीवनात उतरतात. कधी कधीं माझ्या हृदयातहि तुफान उठत. माझी सावकारी आहे. गरीब शेतकऱ्याचे हाल पाहिले म्हणजे वाटत, कीं हे सारे कागद टरकवून टाकावे. आम्हीं कुठून आणले पैसे ? आम्हीं माड्या-महालात राहणारीं मोकाट माकड. नाहीं श्रम, नाही कष्ट, आम्ही केवळ लुटारू आहोंत. परंतु हे विचार राहत नाहींत. आकाशात वीज लवून जावी तसे हे विचार चमकतात व जातात. कुठल्या तरी अज्ञात बागेंतील फुलाचा

वास बरोबर घेऊन एखादी वाऱ्याची झुळूक यावी तसा हा क्षणभर सद्विचारा-चा वारा येतो. क्षणभर जीवनात सुगध ओततो व जातो. काय आमच जीवन ! रोज चहा, पानसुपारी, तो तबला, तबोरा, पेटी, दिलरुबा तेंच तें जीवन ! लोक मला कलापूजक म्हणतात, परतु मनोहर माझ मन आत सुखी नाही. माझ्या मनाला कसली तरी अज्ञात भूक आहे. ती कशाची आहे मला कळत नाही. परतु मधूनमधून जीवनातील त्या अज्ञात भागाच अनत दर्शन होत. मी डोळे मिटतों. मनोहर, तुम्ही मधूनमधून येत जा." भाऊराव म्हणाले

"कशाला येत जा ? खादीचा तर तुम्हाला विटाळ सहन होत नाहीं." आनदी म्हणाली.

"तू केव्हा येऊन बसली होतीस चोरासारखी ?" भाऊरावानीं विचारलें.

"मी पटकन जेवलें. विचाराची मुखशुद्धि मिळावी म्हणून वर आलें." आनदी म्हणाली.

"बायकाना विचाराची भूक असते, ही गोष्ट भारतीय पुरुषाना अद्याप कळायची आहे. पातळ पोलक्यापलीकडे बायकाना आत्मा म्हणून काहीं आहे, याची जाणीव त्याना व्हायची आहे." मनोहर म्हणाला.

"अहो ती जाणीव झाली तर त्याचे परिणाम वाईट होतील. आम्हाला मग भाकऱ्या कराव्या लागतील !" भाऊराव हसत म्हणाले.

"भाकरी भाजण कमी समजू नका. ती तपश्चर्या आहे." मनोहर म्हणाला.

"बाहेर तो पहा चद्र वर आला. न्हाऊनमाखून स्वच्छ होऊन आल्या-सारखा दिसत आहे." भाऊराव म्हणाले.

"चद्र कधीं रुप्यासारखा दिसतो, तर कधीं सोन्यासारखा दिसतो." मनोहर म्हणाला.

"नुकताच उगवत असतो तेव्हा सोन्या असतो. काहीं वेळ झाला म्हणजे तो रुप्या बनतो." आनदी म्हणाली.

"तुम्हाला आहे वाटत चद्र पाहण्याची हौस ?" मनोहरनें प्रश्न केला.

"'चादोबा-चादोबा भागलास का' हें गाण ती कुणाला शिकवणार ?

घरात मूलबाळ नाही मग स्वत:लाच चांदोबा दाखवून ही गाणं गाते." भाऊराव म्हणाले.

"आमच्या माहेरीं आम्हाला सवय आहे चंद्र पाहण्याची. चतुर्थीच्या दिवशीं आम्ही चंद्र केव्हा उगवतो त्याची वाट पाहत बसायची जशी आग लागावी तसा हा शीतळ चंद्र उगवताना दिसे, परंतु आमच्या बायकांच्या ओव्यात तर निराळच चंद्रवर्णन आहे—

मोरया देवाला आज वाहव्या दूरवा
चंद्र दीसतो हिरवा संकष्टीचा

हिरवा चंद्र असं म्हटलं आहे." आनंदी म्हणाली

"होय, कधीं कधीं चंद्राची प्रभा हिरवट वाटते परंतु मी सांगू का, यात मोठं काव्य आहे. गणपतीला भालचंद्र असं नाव आहे त्याच्या कपाळावर चंद्र आहे. संकष्टीचतुर्थीच्या दिवशी डोक्यावर हिरव्या हिरव्या दूर्वांच्या जुड्या वाहिल्या गेल्यामुळं त्याची हिरवी छाया चंद्रावर पडून चंद्र हिरवा दिसू लागला अशीहि कल्पना असेल! भाऊराव, बायकांच्या ओव्यातून कधीं कधीं फारच गोड कल्पना असतात—

पति विष घेई घाबरली उमा
मस्तकी चंद्रमा काळवंडे

या ओवींत किती अर्थ आहे! शंकरानीं विष घेतलं म्हणून पार्वती घाबरली, परंतु डोक्यावरचा चंद्र तर काळाच पडला! शंकर नीलकंठ झाले, चंद्रालाहि विषबाधा झाली, चंद्र काळवंडला. परंतु पार्वतीचा मुखचंद्र काळवंडला का? पति विष घेताच तिलाहि विष घेतल्याप्रमाणं झालं का? पार्वतीजवळ भांडण वगैरे झाल्यामुळं तर शंकरानीं विष नाहीं ना घेतलं? या लहानशा ओवीत किती कल्पना भरलेल्या आहेत!" मनोहर म्हणाला.

"लहानशा पोटात बाळ वाढवायची कला ज्यांना देवानं दिली, त्यांना लहानशा शब्दात पुष्कळ अर्थ का भरता येणार नाहीं?" भाऊराव म्हणाले.

"पुरणाचा मोठा गोळा त्या लहानशा पारींत त्या कसा भरतात देव जाणे!" मनोहर म्हणाला.

बायकाच्या एका शब्दात, एका दृष्टिक्षेपात, एका मद स्मितात, एका अश्रूत अनत-कोटि-ब्रह्माड साठवलेली असतात. स्त्री म्हणजे गूढ !" भाऊराव म्हणाले

" पुरुष म्हणजे सूड ! " आनदी म्हणाली

" पुरुष म्हणजे आसूड फटकारे मारणं त्याना माहीत भावना कळण्याची त्याना शक्तिच नसते मग करतात अकाडताडव !" मनोहर म्हणाला.

" हिन तुमची खादी घेतली म्हणून तिची बाजू घेता वाटत ? " भाऊरावानी विचारलें

" वकिलाना सर्वत्र लाचलुचपतच दिसायची." आनदी म्हणाली.

" नवऱ्याची अशी बदनामी नको करू." भाऊराव म्हणाले.

" मला आता झोप येणार अस दिसत. मी इथच बाहेर झोपतों " मनोहर म्हणाला.

" पाऊस वगैरे यायचा, आतच झोपा." भाऊराव म्हणाले.

" पाऊस आला तर आत येईन, परतु मला बाहेर उघड्यावरच झोपण्याची सवय आहे, वाऱ्याबरोबर देवाची आकाशगाणीं ऐकायला येतात. तीं ऐकत ऐकत कशी छान् झोप येते ! गाढ, गोड झोप !" मनोहर म्हणाला.

" तुम्हाला गादी चालेल ना ? " भाऊरावानीं विचारलें.

" गादी व खादी याच वाकड आहे " मनोहर म्हणाला.

" घोंगडी तर नाही आमच्याकडे. गादी घाला व तिच्यावर खादी घाला. आपद्धर्म आहेच ! " भाऊरावानी सुचवलें.

नाहीं तर मी माझ्या खोलीकडेच जातों. पहाटे प्रार्थना म्हणायची, सूत कातायच. खरच भाऊराव, मी जातों पाऊस थाबला आहे." मनोहर म्हणाला.

" आता इतक्या रात्री कुठ जाता ? " आनदीनें विचारलें.

" फार नाही झाली रात्र आणि भयभीति थोडीच आहे ?" मनोहर म्हणाला.

" खऱ्या खादीवाल्यास कसलीहि भीति नाहीं." भाऊराव म्हणाले.

" जातों. भाऊराव, आज आपण एकमेकाच्या जवळ आलों. देवाची इच्छा असेल तर आणखी जवळ येऊ ! " मनोहर म्हणाला.

" येत जा." आनंदीनें सांगितलें.

मनोहरला दरवाजापर्यंत भाऊरावांनीं पोंचविलें आनंदी वरच उभी होती. भाऊराव परत वर आले.

" किती निर्मळ माणूस !" भाऊराव म्हणाले.

" अशाच्या संगतीन मातीचीं मोतीं होतील." आनंदी म्हणाली.

" पतित उद्धरतील, बुद्ध मुक्त होतील !" भाऊराव म्हणाले.

# चिखलांतील कमळें ४

गोविंदरावानी भाऊरावास मोहनी घातली होती गोविंदरावाचें सारें त्याना चागलेंच दिसे भाऊराव अलीकडे सपूर्ण खादीधारी बनले होते. परतु गोविंदरावाचें व खादीचें कायमचें वाकडें.

“खादीन मी जळतों. रामनामान भुत पळतात त्याप्रमाण खादीपासून मी पळतों” असें गोविंदराव म्हणावयाचे. मित्राच्या समाधानासाठीं म्हणून भाऊराव त्या वेळेपुरती खादी दूर ठेवीत गोविंदराव आले कीं, निराळा सदरा ते घालीत. फिरावयास जाताना धोतरहि दुसरें नेसत.

एके दिवशीं भाऊराव व गोविंदराव फिरावयास गेले होते. सुदरपुराबाहेर नदीकाठीं एका शिलाखडावर दोघे मित्र बसले होत.

“भाऊराव, तुम्हाला प्रशात नदी आवडते की बेफाम नदी? पावसाळ्यात पूर आलेला असावा, लाल फेसाळ पाणी जोरान जात असाव, किती भव्य असतो तो देखावा! मला तरी नदीचा तो अवतार आवडतो. जीवनात बेफाम असण मला आवडत.” गोविंदराव म्हणाले.

बेफामपणा म्हणजे बेसूरपणा. तुम्ही कलावान आहात, कलेत प्रमाणबद्धता असते. सयमाशिवाय कलेचा जन्म नाही जीव आईच्या उदरबधनात न राहील तर त्याला विकास नाहीं, तुम्ही कितीहि म्हणालेत कीं बेफामपणा मला आवडतो, तरी जर खरे कलावत तुम्ही असाल, तर तुमच्या जीवनातहि तुम्हाला सयमच सार्वभौम आहे असें एक दिवस दिसून येईल." भाऊरावानी सागितलें.

"भाऊराव, वादविवादात अर्थ नाही. असे किती गाणारे आहेत, की ज्यानीं आपल्या जीवनात सगीत आणल आहे? सुदर गाणारे आपल्या मुलाना मारून रडवतात, आपल्या बायकाना छळतात, शेजाऱ्याजवळ भाडतात. गाणारा म्हणजे स्वच्छदी अशीच व्याख्या झाली आहे. मी असे पुष्कळ कलावत पाहिले आहेत, की त्याचा ससार केवळ विकल असा आहे. ते आपल्या घरात आनद निर्मू शकत नाहीं. गाताना गोड आवाज काढतील, परतु घरात सदैव कर्कशच बोलतील. नदीला समुद्रास मिळण्यासाठी बेफामच झाल पाहिजे. कलेंतील खरा आनद लुटण्यासाठीं कलावतास बेफाम झाल पाहिजे. कला सयमातून सभवत असेल, परतु कलावतान संयमी असून भागणार नाही. कलेची गाठ त्याला घ्यायची असेल तर त्यान स्वच्छदी झाल पाहिजे." गोविंदराव म्हणाले.

"चला आपण फिरत फिरत जाऊ. आपण फिरायला आलों आहोंत. बसायला नाहीं." भाऊराव म्हणाले.

दोघे मित्र नदीतीरानें फिरत फिरत जाऊ लागले.

"भाऊराव, तुमच्या या नदींत कमळ वगैरे नाहींत!" गोविंदरावानीं विचारलें

"नदींत का कमळ होतात? कमळ सरोवरात किंवा तलावात होतात." भाऊराव म्हणाले.

"आमच्या गावच्या नदींतहि कमळ असत." गोविंदराव म्हणाले.

"कोणत तुमच गाव." भाऊरावानी प्रश्न विचारला.

"मी आता नावहि विसरलों बरेच दिवस झाले गाव सोडून..." गोविंदरावानी टाळाटाळीचें उत्तर दिलें.

"आपल्या गावाचं नांव कोण विसरेल? मायभूमीला कोण विसरेल? तें आईबापास विसरण्यासारखं आहे!" भाऊराव म्हणाले.

"हल्लीं हिंदुस्थानांत तरी मायभूमीला विसरणं हा धर्म झाला आहे. कोण स्मरतो मायभूमीला? त्या साऱ्या भ्रामक कल्पना आहेत. कसली जन्मभूमि नि कसलं काय! सारीं स्वार्थी थोतांड भाऊराव! अहो, तीं पहा कमळ, कमळं." एकदम गोविंदराव म्हणाले.

"खरंच, त्या डबक्यांत उगवलीं आहेत किती छान आहेत!" भाऊराव म्हणाले.

"या निर्मळ नदींत कमळं नाहींत, आणि या डबक्यांत कमळं!" गोविंदरावांनीं आश्चर्य व्यक्त केलें

"निर्मळ गंगेनं डबक्यासहि तुच्छ लेखूं नये हा त्याचा अर्थ आहे. गंभीर गंगेंत मगर असतील तर चिखलांत कमळं फुलतील. जगांत कुणी कुणास हसूं नये, कमी मानूं नये. गंगेच्या पवित्र प्रवाहांतहि मगर दडलेले आहेत. घाणेरड्या चिखलांतहि सुगंधी व सुंदर कमळ प्रसवण्याची दिव्यता आहे!—" भाऊराव गंभीरपणें म्हणाले.

अत्यन्त पाप्याच्या जीवनांतहि पुण्यता असूं शकेल व थोर संतांच्या जीवनांतहि दुर्गंधि लपलेली असेल!" गोविंदराव म्हणाले.

"निर्दोष एक परमेश्वर आहे. सूर्यावरहि डाग आहेत. चंद्रावरहि डाग आहेत." भाऊराव म्हणाले.

"चला, आपण कमळं तोडूं. भुंगे कमळाचा उपभोग घेतात, माणसांनीं कां घेऊं नये?" गोविंदराव म्हणाले.

दोघे मित्र त्या डबक्याजवळ आले, परंतु कमळें हातीं येण्यासारखीं नव्हतीं चिखलांतून गेल्याशिवाय कमळें मिळालीं नसतीं. त्यांनीं आपली काठी लांबविली तरी उपयोग झाला नाहीं.

"भाऊराव, सुख हें असं असतं, जवळ असून मिळत नाहीं!" गोविंदराव म्हणाले.

"म्हणून तर सुखाची किंमत. सहज मिळालेल्या सुखाला मोलहि नाहीं. कष्टानं मिळवलेलं मोलवान वाटतं. मी शिरतों डबक्यांत व आणतों कमळं." भाऊराव म्हणाले.

" कशाला शिरता त्या घाणींत ? आपण इथूनच पाहू ती." गोविंदराव म्हणाले.

" तुम्हाला दुरून बघून समाधान आहे का ? " भाऊरावानीं प्रश्न केला.

" दुरून बघून कुणाला समाधान होईल ? सुंदर वस्तु हृदयाशी धरण्यातच आनंद आहे." गोविंदराव म्हणाले

" तुम्हाला जर कमळ इतकीं आवडत असतील, तर देतोंच मी आणून. मित्रासाठीं नरकात जाव, मग का मी एवढ्याशा चिखलात शिरायला भ्याव ?" भाऊराव हसत म्हणाले.

भाऊरावानी कपडे काढले. धोतर वर नीट खोवलें. ते शिरले त्या चिखलात. थोडे पुढें गेले. अद्याप हात पुरत नव्हता कमळाना. आणखी एक पाऊल पुढें गेले तों एकदम खोल चिखल. त्यात भाऊराव फसले, पाय निघेना. ते जसजसा पाय काढण्याचा प्रयत्न करीत, तसतसा पाय अधिक खाली जाई. आता ? " गोविंदराव, ती काठी पुढ करा. मी तिला धरतों. तुम्ही मला ओढा. तुम्ही पुढ येऊ नका तुम्ही आणखी फसाल." भाऊराव म्हणाले.

" कशाला शिरलेत चिखलात ? मी म्हणत होतों नको म्हणून. मित्राच ऐकल नाहीत. " गोविंदराव म्हणाले

" मित्रासाठीं तर इथ उभा आहे या चिखलात रुतून बसण्यातहि एक प्रकारचा आनद आहे. ह. ओढा " ते म्हणाले.

गोविंदराव ओढीत होते ते चिखलात थोडे पुढें जाते, तर भाऊरावाच्या हातात अधिक काठी राहती परतु गोविंदराव पाय चिखलात न बुडवता काठी पुढें करीत होते काही उपयोग होईना.

" आधीं कमळ तर तोडू दे. द्या काठी, " असें म्हणून गोविंदरावाच्या हातातील काठी भाऊरावानी घेतली. ती काठी आता कमळास पोंचत होती. परतु काठीनें कमळ थोडेंच तुटणार होतें काठीनेंहि कमळ मिळेना- शेवटी भाऊरावाचे पाय चिखलात रुतले होते, तरीहि सर्व जोर करून काठीचा एक तडाखा एका कमळाच्या कोमल देठावर त्यानी मारला. तें कमळ उडून बाहेर जाऊन पडलें ! गोविंदरावानी टाळ्या वाजवल्या.

" भाऊराव, कमळ, हें पहा कमळ ! प्रयत्नास यश आल. निर्मळ कमळ

मिळवण्याच्या प्रयत्नात तुम्ही मात्र मळलेत आता बाहेर कसे येणार? कुणी आसपास दिसतहि नाही. कुणाला हाक मारू?" गोविंदराव म्हणाले.

शेवटीं दोघे मित्र हाका मारू लागले कोणी तरी ती हाक ऐकली गजेन्द्राची हाक भगवान् विष्णूनी ऐकली भाऊरावाची कोणी ऐकली?

तो पहा एक तरुण धावत येत आहे कोण आहे तो? अकस्मात् कोठून आला? हा तर खादीवाला मनोहर मनोहरला पाहताच गोविंदरावानीं कपाळाला आठ्या घातल्या सर्व परिस्थिति मनोहरच्या लक्षात आली त्यानें आपले कपडे दूर ठेवले त्याच्या नेसू आत लंगोट होता धोतर सोडून तो मोकळा झाला मनोहरनें चिखलात पाय टाकला भाऊरावास हात देण्यासाठीं पुढें जाणें जरूर होतें त्यानें आपल्या बळकट हातानी भाऊरावाचा हात धरला. तो त्याना ओढू लागला भाऊराव खेचले गेले थोडे इकडे आले. मनोहरनें पुन्हा सर्व शक्ति लावली भाऊराव आणखी थोडे पुढे आले. हळूहळू मनोहरनें भाऊरावास बाहेर आणले भाऊरावानी चिखलात शिरून कमळ बाहेर आणलें! मनोहरनें चिखलात शिरून माणूस बाहेर आणला.

"मनोहर, तुम्ही अचानक कसे आलात?" भाऊरावानी विचारलें.

"त्या दिवशी पावसात छत्री धरण्यासाठी तुम्ही माझ्यासाठीं कसे अकस्मात् आलेत?" मनोहरनें आठवण दिली.

"माझ्यासाठी तुम्हाला चिखलात शिरावं लागल" भाऊराव म्हणाले.

"भगवान् बुद्ध म्हणत, 'एकाहि जीवाच थोड दु:ख दूर करता येत असेल तर मी ५०० वेळा गर्भवास पत्करीन. पुन: पुन्हा जन्म घेईन.' आम्हाला का चिखलात थोड शिरण कठिण वाटाव?" मनोहरनें प्रश्न केला.

"गोविंदरावाना मीच सांगितल, की पुढ येऊ नका. ते येत होते." भाऊराव म्हणाले

"ते कलावान् आहेत, ते चिखलात कसे शिरतील?" मनोहर म्हणाला.

"भाऊराव, आता घरी कसे जाणार? धोतर तर तुमच सार भरल आहे." गोविंदराव म्हणाले.

"माझं हें धोतर नेसा. मी आज या बाजूस नदींत पोहण्यासाठीं म्हणून आलों होतों. कपडे वगैरे काढणार, तोंच तुमच्या हाका कानीं आल्या. माझं

पहिलच धोतर मी नेसेन. लगोट लावलाच आहे. मी आता नदींत भरपूर पोहीन. नतर हेच सोडलेल धोतर नेसेन. माझी अडचण नाही. तुमची थोडी आहे कारण हें खादीच धोतर आहे. भाऊराव, खादीच धोतर तुम्ही तर नेसता मग आज का बर ते नेसू नाही? खादी सोडलीत म्हणून फसलेत. खादीची खरी भक्ति जोडा म्हणजे पुन्हा फसणार नाहीं खादी कमरेला असती, तर सर्व भारताची शक्ति आपल्या अगात आहे अस तुम्हाला वाटल असत" मनोहर खादीचा अनत महिमा गाऊ लागला

"मनोहर, आम्ही पुन.पुन्हा चुकणारी व फसणारीं माणस मी पुन्हा फसलों तर पुन्हा तुम्ही वाचवायला उभे राहाल?" भाऊराव म्हणाले

मनोहरचें स्वच्छ खादीचे धोतर भाऊराव नेसले, आणि तें चिखलाचें धोतर?

"भाऊराव, तें बरबटलेल धोतर राहू दे. तुम्ही आता दमला आहात आधी घरी जा. काहीं गरम पेय घ्या तें धोतर मी नदीत धुईन व आणीन" मनोहरनें प्रेमानें सागितलें

"आमची बरबटलेली जीवन तुम्ही धूत आहात मग धोतर धुवाल यात काय नवल? ठेवतों हा धोतर तुम्हीहि दुपारीं आमच्याकडे जेवायला या मी घरीं वाट पाहतों" भाऊराव म्हणाले

गोविंदरावाचा हात हातात घेऊन भाऊराव निघून गेले. त्या खादीच्या वातावरणातून केव्हा एकदा पळू असें गोविंदरावास झालें होतें.

"भाऊराव, तुमचा हात मीं धरला आहे. परतु माझा हात जळत आहे. तुमच्या नेसू खादीच धोतर आहे विजेचा धक्का बसावा तस मला होत आहे. ही खादी मारणारी आहे, जाळणारी आहे." गोविंदराव म्हणाले.

"नाहीं. ही तारणारी आहे. सभाळणारी आहे. गोविदराव, तुम्ही कुठले, मी कुठला व हे मनोहर कुठले? परतु आपल्या तिघाची जीवन एकत्र गुफलीं जात आहेत. आपणा तिघास परस्परापासून दूर जाता येणार नाही. ही खादी दूर जाऊ देणार नाही. ही खादी आपली जीवन जोडील." भाऊराव म्हणाले.

गावात शिरल्यावर दोघे एकमेकाचा हात सोडून चालू लागले. ते घरीं गेले.

" म्हणजे का लग्न करणार ? " भाऊराव हसून म्हणाले.

" लग्न म्हणजे विघ्न, लग्न म्हणजे बंधन. लग्न म्हणजे उड्डं पाहणाऱ्या आशा-आकांक्षांच मातींत पडणं !" गोविंदराव म्हणाले.

" बरं पडा आता. विचार नका करूं. मी जातों हां " असें सांगून भाऊ-राव कपडे करून खालीं गेले.

" याच्याकडे पहा ग " असें आनंदीस सांगून ते कोटींत गेले.

आनंदीचें काम आटोपलें. ती चरखा घेऊन गोविंदरावाच्या तेथें कातीत बसली.

" तुम्हाला त्रास नाहीं ना होणार ? नाहींच होणार—चरख्याचं गुंऽऽगुं म्हणजे मंगल संगीत असं मनोहर म्हणत— " आनंदी म्हणाली.

" तुम्ही माझ्यासाठी सूत कातणार आहात ना ? जाड नका कातूं. नाहीं तर रुततील धोतर " गोविंदराव म्हणाले.

" त्याच्या धोतरासाठीं कातलं आहे, त्याच्याहून बारीक कातीन म्हणजे झालं ना ?" आनंदीनें हसून विचारलें

" तुमच्या हातचं जाडभरडहि मऊ वाटेल. प्रेमळ माणसाच्या हातचं सारं सुंदर वाटतं." गोविंदराव म्हणाले.

" माझा हात कांहीं मऊ नाहीं. नेहमीं म्हणतात कीं तुझे हात राठ आहेत." आनंदी म्हणाली.

" हात कसे का असेनात. हृदयावर सारं आहे. शेतकऱ्याचे, काबाडकष्ट करणाऱ्यांचे हात टणक असतात, म्हणून का त्यांची हृदयं शुष्क असतात ? उलट आम्हां मऊ हाताच्या पांढरपेशांपेक्षा ते अधिक सरळ, प्रेमळ व उदार असतात." गोविंदराव म्हणाले.

" तुम्ही फार बोलूं नका. थकवा येईल." आनंदी म्हणाली.

" कुणाजवळ रोज बोलायला मिळत नाहीं, म्हणून मन थकलं आहे. तुमच्याजवळ बोलण्यानं थकवा पळेल, मनाला हुशारी वाटेल. प्रेमळ माणसा-चा सहवास लुटता येईल तितका लुटावा. अमृताचं का कधीं अजीर्ण होतं ? " गोविंदरावांनीं विचारलें.

" तुम्हाला कांहीं फळबिळ हवं ? सत्र देऊं सोलून ? " आनंदीनें विचारलें.

" या फळाचा का कधी वीट येतो ? " गोविंदराव बोलले.

आनदी खाली गेली. सत्री सोलून बशीत फोडी घालून ती वर घेऊन आली. फोडींची सालें काढून ती त्याना देत होती गोविंदराव तिच्या हाताकडे पाहत होते

" काय पाहता ?" तिनें विचारिले

" तुमच्या हातावरच्या रेषा तुमच्या रेषात काही विशेष आहे ?" गोविंदराव म्हणाले.

" तुम्हाला का हात पाहता येतो ? " आनदीनें आश्चर्यानें विचारलें.

" एकट्या माणसाला वेळ जाण्याला काही साधन लागतात हस्तसामुद्रिकाचे ग्रथ बसतों वाचीत ! " ते म्हणाले.

" माझा पहाल हात ? थाबा. मी हात धुऊन येत हा " ती म्हणाली.

बशी ठेवून आनदी वर आली. हात स्वच्छ पुसून तिनें पुढें केला. गोविंदरावानी आनदीचा हात हातात घेतला. ते तो हात दाबून बघत, हाताची मूठ मिटून बघत, दोन्ही हाताची तुलना करीत.

" काहीं राठ नाहींत हो तुमचे हात. रेशमासारखे आहेत. आणि ही हृदयाची रेषा कशी खोल व सरळ आहे ! तुमच्या मनात कुणाचाहि सशय येत नाहीं. खर ना ? " गोविदरावानी विचारलें.

" आपल मन निर्मळ असल म्हणजे का घ्यावा कुणाचा सशय ? " आनदी म्हणाली.

इतक्यात भाऊराव आले. जिना चढून ते केव्हा आले कळलेंहि नाहीं.

" हात पाहता वाटत ? " ते येऊन म्हणाले

" आपली करमणूक— " गोविंदराव म्हणाले

आनदीनें आपला हात मागें घेतला.

" अग, त्याना नीट पाहू दे कीं—हिला मूलबाळ होईल का हो ? सागा ! " भाऊराव हसत म्हणाले.

" इश्श ! काहीं तरीच तुमच ! " आनदी म्हणाली.

" मी तुझ्या मनातील बोललों. तुला विचारायला धीर नसता झाला. मी कसा वेळेवर आलों. आपणास मूल व्हाव, याहून दुसरा थोर आनद बायकाना

नाही पहा हो. गोविंदराव निदान हातात तरी मूल आहे की नाही पहा. भाऊराव थट्टेच्या स्वरात म्हणाले

आनंदी हात पुढें करीना शेवटी भाऊरावानी तिचा हात बळेंच धरून गोविंदरावांच्या पुढें तो केला

" उगीच आढेवेढे " ते म्हणाले.

गोविंदराव सूक्ष्म रीतीनें पाहू लागले

" मूल आहे आणि नाही." ते म्हणाले.

" म्हणजे काय ?" भाऊरावानी विचारलें

" कदाचित् दत्तक—" गोविंदरावानी खुलासा केला

" दत्तकबित्तक नको " आनंदी म्हणाली

" तुम्हाला हात पाहता येतो हें मला नव्हत माहीत. माझाहि पाहता का ?" भाऊरावानीं विचारलें.

" तसा फार अभ्यास नाही माझा." गोविंदराव म्हणाले

" पण पहा ना " भाऊरावानीं आग्रहानें म्हटलें. गोविंदरावानीं मित्राचा हात हातात घेतला.

" तुमचा स्वभाव कधी कधी संशयी असतो. तुमच्या मनात काहीं तरी असमाधान आहे. तुम्हाला तुरुगवास आहे भाऊराव." गोविंदराव म्हणाले.

" चोरी करून की खून करून ? " भाऊरावानीं विचारलें.

" काहीं तरी मेल विचारणं. ही खादी घालून हो " आनंदी म्हणाली

" आम्हाला तुरुगात घालण्यासाठी खादीची धोतर नेसवतेस वाटत." भाऊरावानीं विचारलें.

" माझ्या हातावर तर मोठा तुरुगवास आहे ! " गोविंदराव म्हणाले.

" मोठे देशभक्त व्हाल." आनंदी म्हणाली.

" मी खादीचा खरा भक्त थोडाच आहे ? तुमच्या हातची मिळाली तर वापरणार. खादीचा भक्त नसून मी तुमचा भक्त आहे. तुमच्या सर्वांच्या प्रेमाचा ऋणी आहे. भाऊराव, वैनींनीं तुमच्यासाठीं सूत कातल आहे, त्याच्याहून अधिक बारीक माझ्यासाठीं त्या कातणार आहेत." गोविंदराव म्हणाले.

" मी घरचाच आहे. दुसऱ्यासाठीं अधिक चागल करावं." भाऊराव म्हणाले.

" म्हणजे! मी घरचा नाही वाटत? मग कशाला इथ आणलत." गोविंद-राव म्हणाले.

" तसा नाहीं अर्थ. प्रत्येक शब्दातून श्लेष नसतो काढायचा." भाऊरावानीं सागितलें.

" मी चहा आणू का करून? त्याना स्वस्थ पडू दे. डॉक्टर म्हणतात त्याना फार विचार नका करू देऊ. तुमचे तर वाद चालतात!" आनदी म्हणाली.

" रोग्याची शुश्रूषा बायकानीच करावी " भाऊराव म्हणाले.

" बायका जितके कष्ट सहन करतात त्याच्या शताशहि पुरुषाना सहन होणार नाहींत " गोविंदराव म्हणाले.

" तरी आम्ही अबलाच " आनदी म्हणाली

" डोळ्यातील एका अश्रून, ओठावरील एका स्मितान तुम्ही विजय मिळविता." भाऊराव म्हणाले.

" स्त्रिया म्हणजे शक्ति." गोविदराव म्हणाले.

" पुरुष म्हणजे शिव." आनदी म्हणाली.

" आता शक्ति एकदाची खाली जाऊ दे स्टोव्ह पेटवायला. नाहीं तर शिवाचा रुद्र होईल हो!" भाऊराव म्हणाले.

" शिवाचा रुद्रावतार झाला तर शक्ति चडिका होईल." गोविंदराव म्हणाले.

" मला साधी-भोळी आनदीच राहू दे." असें म्हणून आनदी खाली गेली. तिनें चहा केला. चहापान झाले.

" आपण पाच तीन दोन खेळू या." भाऊराव म्हणाले.

" येना का वैनी ? " गोविंदरावानी विचारलें.

" कोणी आल तर हसेल." आनंदी म्हणाली.

" पत्ते खेळण का पाप आहे ? ये लवकर कप विसळून, मी पान वाटतों." भाऊरावानीं सागितलें.

गोविंदराव खाटेवर होते. भाऊराव व आनदी खुर्च्यांवर होती. खेळ सुरू झाला. आनदीकडे डाव नेहमीं चागला यायचा. ती नेहमीं पानें ओढावयाची

परतु भाऊरावाच्या पानातून हलकी पानेंच मिळत. गोविंदरावाचे मात्र एक्के राजे जावयाचे.

" तुमच्याकडून फऱ्याच मिळायच्या " आनदी थट्टेनें भाऊरावास म्हणाली

" माझ्याजवळ उरल आहे काय तुला द्यायला ? सार देऊन झाल. आता फऱ्या उरल्या आहेत, त्याहि देतों, घे " भाऊराव म्हणाले.

" माझहि सार लुटून मलाहि भिकारी बनविणार का ? " गोविंदरावानीं विचारलें

" तुम्हा दोघाना लुटून मी श्रीमत होणार. परतु माझी श्रीमंती तुमच्या-साठींच आहे. बायकाच्या पेटीतील त्याच थोडच असत ? म्हटल तर बायकाच सार आहे, म्हटल तर काही नाहीं. त्या श्रीमत असून गरीब असतात " आनदी म्हणाली

" बरच काव्यमय बोलतेस तू " भाऊराव म्हणाले

" स्त्रियाचे अनुभवाचे बोल असतात " गोविदराव म्हणाले.

" आधी हुकूम काय तो साागा " आनदी म्हणाली

" सातव्या पानी " भाऊराव म्हणाले

" ओऽहो, एक्का फुटला ! " आनदी म्हणाली

" तू टिकू देशील तेंव्हा ना." भाऊराव म्हणाले.

" मी या वेळेस पान मागतच नाहीं. सर्वांना माफ." आनदी म्हणाली.

" राणीसाहेबाच्या उदार जाहीरनाम्याबद्दल आम्ही आभारी आहोंत " भाऊराव म्हणाले.

कोणाची तरी जिन्यात पावले वाजलीं.

" मी जाते खाली " असें म्हणून आनदी निघून गेली.

गुलाबचद शेठ आले होते. गोविंदरावाच्या समाचारास ते आले होते. हळूहळू आणखीहि रसिक मित्रमडळी जमली. पानसुपारी फस्त होऊ लागली. पिकदाणीचें नशीब रगलें कोणी तबला ठोकू लागले. कोणी पेटीचा सूर काढू लागले.

" गोविंदराव, म्हणवेल का एखाद गाण ? " काळूअण्णानीं विचारलें.

" आज नका हो त्रास देऊ." गुलाबचद म्हणाले.

कोकिळेस कूऊ करण्याचा का त्रास होतो? झऱ्याला गुणगुण करण्याचा का श्रम होतो? लाटाना नाचताना व हसताना का तकलीफ पडते?" एकजण म्हणाले.

" बसवत नसेल तर नको " गुलाबचद म्हणाले.

" मघा पत्ते खेळत होते " कोणी तरी म्हटलें

" म्हणतों एक गाण. एक म्हणजे एकच." असें म्हणून गोविंदरावानी एक चीज म्हटली. भाऊराव तबला वाजवीत होते काळूअण्णा पेटी वाजवू लागले. गोविंदरावाचा फारच उत्कृष्ट आवाज त्या वेळेस लागला होता. मडळी केवळ चकित झाली. त्या दिवशीच्या त्या गाण्यात काही तरी अपूर्वता होती. उत्कटता होती, उत्सुकता होती—एक चीज झाली—गोविंदरावानी दुसरी सुरू केली. गोविंदराव आज मस्त बनले होते शेवटीं दिवे लागले. गाण्याला अधिकच गभीर रग चढला गोविंदरावाचे डोळे चमकले शेजारची मुलें जिन्यात येऊन ऐकत होती. खाली आनदी ऐकत होती. गाता गाता गोविंदराव एकदम गादीवरून खाली पडले. त्यानी तान घेताना हात पुढें केला व ते एकदम पडले.

'उगीच का काता' हें तें गाणें होतें

'व्यापुनिया सारी धरणी, मूर्ति अपुली या नयनीं, खेळते पहा दिन रजनी' हे चरण किती आळवून आळवून त्यानीं म्हटले. जणु ते भावोन्मत्त झाले होते.

'खेळते, खेळते' करता करता ते खाली पडले.

" पाणी आणा आधी " मडळी घाबरून बोलू लागली. त्याना उचलून नीट ठेवण्यात आलें. कोणी वारा घालू लागले एक मुलगा बर्फ आणावयास गेला. डोक्यावर थडगार पाणी ओतण्यात आलें. गोविंदराव शुद्धीवर आले. त्यानीं डोळे उघडून पुन्हा मिटून घेतले. आणलेला बर्फ डोक्यावर धरण्यात आला. चागली आली शुद्धि.

" पडून रहा आता आमच्या हट्टाचा हा परिणाम! तुम्ही गाऊ लागलेत, आम्हींहि पुरें म्हटल नाही. तुम्हाला पूर्ण विश्रातीच पाहिजे." काळूअण्णा म्हणाले.

" आजच गाण सदैव कानात गुणगुणत राहील." गुलाबचंद बोलले.

"आजचा प्रसग कोण विसरेल? अनततेंत आपण डुबत होतो अनिर्वचनीय आनदात पोहत होतो" कोणी तरी बोलले

"बर जातो आम्ही" असे म्हणून मडळी गेली आता आनदी वर आली

"बर वाटत ना आता?" तिनें विचारलें

"हो" गोविंदराव म्हणाले

"गोविदराव, आज तुमच्या गाण्यान काही तरी अतिमानुष होत यात सशय नाही!" भाऊराव म्हणाले

"वैनीचा हात मी आज हातात घेतला होता मी म्हटल नव्हत का एकदा माग, की ते थोर कलामय हात आहेत म्हणून! तुम्ही म्हणता की ते हात राठ आहेत भाऊराव, त्या हातात स्फूर्ति आहे, विद्युत् आहे. त्या हातात काय आहे तें स्पष्ट सागता येत नाही, परतु त्या हाताचाच आजचाच हा प्रभाव!" गोविंदराव म्हणाले.

"तुम्हाला मूर्च्छा आणणारा हात! पापी आहे हा हात, करटा आहे हा हात." आनदी म्हणाली

"आता थोड जेवा व विश्राति घ्या. तुम्हाला झोपहि पटकन् येईल." भाऊराव म्हणाले

"झाला आहे स्वयपाक. मी ताट वाढून आणू का?" आनदीनें विचारलें.

"आण." भाऊरावानी सागितलें

गोविदरावाचें जेवण झाले. त्याना झोपहि लौकर लागली. सबध रात्रींत त्याना जाग आली नाही.

* * *

काहीं दिवस गेले. गोविदरावाना आता बरे वाटत होते. परतु एके दिवशीं एक अनुचित व उन्मत्त प्रकार घडला. भाऊराव कोर्टातून लौकर आले नाहींत म्हणून आनदीने गोविंदरावापुरता चहा केला व त्याना देण्यासाठी म्हणून ती गेली. गोविंदराव म्हणाले, "मी खालून चूळ भरून येतों.' परतु चूळ भरून वर येताना त्यानी दार आतून लावून घेतलें.

"दारस लावता?" आनदीनें विचारलें

"माझ्या चहा पिण्यावर दृष्ट पडेल." ते म्हणाले

" वेडे आहात तिन्हीसाजा दृष्ट पडते–दुपारी नाही " ती म्हणाली.

" आनदी, आज निराळ अमृत मला दे. माझी भूक तू ओळख, माझी तहान तू ओळख, देवान मला तुझ्यासाठीं व तुला माझ्यासाठी निर्मिल आहे. आनदी " असें म्हणून गोविंदराव आनदीचा हात धरू लागले

" झाल काय तुम्हाला ? वातात तर नाहीं ना ? व्हा दूर " आनदी रागानें म्हणाली

" मी वातात नसून पूर्ण शुद्धीत आहे मी तुला बघतों, तुझ्याजवळ बोलतों, तेव्हाच खरा जिवत असतो ये–नको म्हणू नकोस " गोविदराव अधिकपणा करू लागले.

" असे का साप आहात तुम्ही ? " आनदी क्रोधानें थरथरत होती

" सुगधी चदनाची वेल सापाला विळखा घालू देते. केतकी नागाला बिलगते." गोविंदराव म्हणाले

" खबरदार हात धराल तर ! जाऊ दे मला." आनदी रागानें म्हणाली.

इतक्यात जिन्यात पावलें वाजली. ती भाऊरावाची पावलें होती.

" वैनी, मी का मित्राला फसवू ? नको हे पाप, वैनी नको ! " असें म्हणत गोविंदरावानीं दार उघडलें भाऊराव आत आले.

" कसल पाप ? " त्यानीं विचारिलें

" सौंदर्याचा मोह कुणाला पडत नाही ? माझ हें सौदर्य देवान कशाला दिल कोणास ठाऊक ? मी जिथ जातों तिथ अस काही होत. भाऊराव, मी म्हणत होतों, कीं मला घरीं नका नेऊ–मला भीति वाटते." गोविदराव म्हणाले.

" काय बोलता ? लाज नाही वाटत ? " आनदी म्हणाली.

" मित्राजवळ खर सागण्याची कोणती लाज ? तस विशेष झाल नाही कांहीं. असे क्षणिक मोह सर्वांच्या जीवनात येतात. भाऊराव, तुम्ही वैनींचा तिरस्कार नका करू. क्षणभर त्या बावरल्या–साहजिक आहे." गोविदराव म्हणाले.

" सापा ! त्याच्या कानात कशाला ओततोस विष ? " आनदी म्हणाली.

" रागावू नकोस, तुझ याच्यावर प्रेम आहे ही गोष्ट मी पाहिली आहे. माझ्यापेक्षा, याच्यासाठी अधिक बारीक सूत. हे येतील तेव्हा अधिक चागला चहा होतो. त्याना इथ राहण्याचा आग्रह करीत होतीस. माझ्या मनात संशय येई. परंतु माझाच मला राग येई. तू देवता आहेस अस मी समजत होतों.

परतु माणसापेक्षा देवदेवताचा अधिक पटकन् अध:पात होतो हें मी विसरलों. जा– खाली जा, मी रागावत नाही, लोभावत नाही, आपण सारे चिखलातील किडे." भाऊराव म्हणाले.

भाऊरावाचे शब्द म्हणजे विषाचा वर्षाव होता, आगीचा पाऊस होता! तापलेल्या शिशाचा रस कानात ओतावा तसे ते शब्द होते आनदीला बोलवेना ती थरथरत, रडत खाली गेली, किती तरी वेळ ती रडत होती. काय करावें तिला कळेना. बाणविद्ध हरिणीप्रमाणें ती बावरली. तो कठोर प्रहार होता ज्याच्या आनदासाठी ती जगत होती, त्यानें तो प्रहार केला होता. निष्ठुरपणाची, कृतघ्नपणाची ती सीमा होती असें कसें देवाचें हें जग असें तिच्या मनात आलें. आनदीला सर्वत आता निराशा दिसू लागली. आता अधार, चिर अधार, सत्त्व गेलें, जीवनात आता राम उरला नाहीं. लुगड्याला काडी लावावी, विहिरीत कुडी फेकावी असें तिच्या मनात आलें. मनात काय काय चाललें होतें तें कोण सागणार? शेकडों विचाराविकाराचें तेथें थैमान चाललें होतें. पुन:पुन्हा तिचे डोळे भरून येत. पुनः पुन्हा हृदयास भरती येई. पतीला सशय होता तर मागच त्यानी का विचारल नाही असें तिला वाटलें. 'निर्मळ मनानें विश्वासानें वागण्याचें हे का फळ मिळावें? छे: एकदर फुकट आहे सारें! गोविंदराव असे कसे कसाब? मनाला त्याच्या सत्याची तिळभर कशी नाही चाड? हसत हसत मान कापवते तरी कशी त्याना? साप–जहरी साप! दिसायला सुदर, परतु विषान अतरग भरलेल! परतु आता काय? कोण आता आधार, कोण विसावा? कोण धीर देईल–डोळे पुशील? सार जग का मला कुलटा मानणार? जगात तोंड दाखवण्याची चोरी. अरेरे! मनोहर सुद्धा इथं नाहीत कुठ गेले मनोहर?' मनोहरचें आनदीला स्मरण झालें. अकस्मात् कोठून तरी ते येतील असें तिला वाटलें. आपल्या अश्रूत–आपल्या विचारात ती मग्न होती. भाऊराव खाली आले, परतु कोणी बोललें नाही. आनंदीनें त्याच्याकडे पाहिलें क्षणभर डोळ्यास डोळे भेटले. शब्द तेथें फुटेना. आनदीच्या मनात एकदम एक विचार आला.

"मी माहेरी जातें. मला पाठवा." आनदी म्हणाली.

"बर, टागा आणतों. ५॥ ला गाडी आहे." भाऊराव म्हणाले.

ते वर गेले कपडे करून बाहेर पडले. टागा घेऊन आले आनदीनें बाधा-बाध केली. दोन लुगड्याची लहानशी वळकटी होती

" अगारखाद्यावरच घेऊन जा नेहमी जातेस तशी जा " भाऊराव म्हणाले

" तशी कशी जाऊ ? मला काही नको माझ सर्वांत मोठ भूषण तुम्ही मातीत मिळविलत. सोन-मोर्ती का चाटायची आहेत ? " आनदी तीव्र स्वरात म्हणाली

" झाल गेल आपणा तिघाना माहीत, जगात का डागोरा पिटावा ? " भाऊराव म्हणाले.

" बर, तुमच समाधान तें माझ तुम्ही मला काहीहि म्हणा मला तुमच्यासाठी जगू द्या. दागिने नेऊ ? नेते उशी-गादी नेऊ ? नेते ? आणा माझी वरची लहान गादी. मी वर नाही जात तो वेताळ वर आहे. आगलाव्या वर बसला आहे जहरी साप तिथ आहे माग मेला ! पण काय हे मी बोलते ? किती झाल तरी तुमचा मित्र ! तुमच्यासाठी त्या सापालाहि मी दूध पाजल पाहिजे त्याचे विषारी दश सहन केले पाहिजेत चुकलें हो पुन्हा नाही तुमच्या मित्राला नाव ठेवणार ! आपल दैव खोट दुसऱ्यास बोल का लावावा ? जा, आणा माझी गादी. थाटात जाऊ ना ? आतून हृदय रडत असल तरी वरून हसत जाऊ ना ? मग आणा ना सार ? " आनदी बोलत होती.

भाऊरावानी वरून ती छोटी गादी आणली. आनदीनें ट्रक घेतली. अगारखाद्यावरचे घेतले.

" वाटेंत बाजारात काही खाऊ घेऊन द्या काही फळ घेऊन द्या नेहमीसारखी ना जाऊ ? परतु माहेरी काय सागू ? अकस्मात् पत्र न पाठवता का आले म्हणून विचारतील काय सागू ? मुकी राहू ? " आनदी विचारू लागली.

" आयत्या वेळेस सुचेल ते साग. माहेरी जा म्हणून मी सागत नव्हतों तूच तें ठरवलस. बायकाना आम्ही शिकवायला नको. त्या पूर्ण शहाण्या असतात. पुरुषापेक्षा चतुर व हुशार असतात. टागेवाला वाट बघत आहे." भाऊराव म्हणाले.

आनंदीचे डोळे भरून आले तिला हुंदका आला आवरेना 'तू कधी रडत नाहीस, रड थोडी, म्हणजे तुझे डोळे पुसायला मापडतील,' असें भाऊराव पूर्वी म्हणत असत. परंतु आज डोळ्यातून पाट वाहत असताना ते पुसावयास गेले नाहीत आनंदीनें पुन्हा कसे तरी डोळे कोरडे केले. ती टांग्यात जाऊन बसली. भाऊरावहि बसले टांगा निघाला वाटेत फळाची करंडी, पेपरमिंटाच्या वड्याचा एक डबा त्यांनी घेऊन दिला मंडळी स्टेशनवर आली. तिकीट काढण्यात आलें आनंदी डब्यात बसली. बायकांच्या डब्यात ती बसली भाऊराव बाहेर कोठे तरी शून्य दृष्टीनें पाहत होते. गाडी निघायची वेळ झाली निघाली गाडी आनंदीने अश्रुपूर्ण नेत्रांनी पतीकडे पाहिलें. भाऊरावाचे डोळेहि ओले झाले अनंतअश्रूंना दोन अश्रुबिंदूंनीं उत्तर दिलें आनंदीला पतीच्या डोळ्यातील ओलावा पाहून बरें वाटले गाडी झरझर निघून गेली भाऊराव घरी निघून गेले—सापाशी खेळायला निघून गेले!

# कोण ती ? ६

मनोहर सुदरपूरला नव्हता. काही दिवस आश्रमात राहण्यासाठी तो निघून गेला होता. आश्रमातील आशावत व ध्येयमय हवा खाण्यासाठी तो गेला होता. रामतीर्थांची गोष्ट सागतात, की ते पुन. पुन्हा हिमालयात जात. हिमालयातील निर्मळ व निस्सग हवेशिवाय ते गुदमरू लागत. ससाराची हवा त्याना फार मानवत नसे. मनोहरचे का तसेच होतें ? आश्रमात त्याला आनद वाटला. तेथें। नवीन नवीन चाललेले प्रयोग तो पाही ग्रामीण जीवनात राम आणूं पाहणारे ते प्रयोग होते. मनोहर त्यात रस घेई. अनेक गोष्टी तेथें तो शिकला.

एके दिवशीं आश्रमातून तो पुन्हा निघाला. खाद्यावर खादी घेऊन गांवोगाव हिंडण्यासाठीं पुन्हा निघाली स्वारी. मनोहर आगगाडींत होता. फार गर्दी नव्हती. तो टकळीवर तेथेंहि सूत कातीत होता. लोक कौतुकानें पाहत होते. काहीं टिंगल करीत होते.

"हे या सुतान स्वराज्य मिळवणार !" एक म्हणाला.

"इग्रजाच्या तोफापुढ चरका ठेवणार वाटत हे ?" दुसरा बोलला.

" इंग्रजाची मुख्य शस्त्र तोफा नाहीत. व्यापार हें त्याच मुख्य शस्त्र आहे. आपण खादी घेऊन त्याचा व्यापार मुकाट्यान बद पाडला की झाल काम." तिसऱ्यानें उत्तर दिलें.

" त्याला का खादी बद करता येणार नाही ? 'चरखा चालवील त्याला गोळी घालू' अस काढतील फर्मान." कोणी शका काढली.

" पूर्वी यानी आमच्या विणकराचे अगठे नाही का कापले ? पुन्हा तेच करतील." कोणी दुजोरा दिला

असे सवाद चालले होते मनोहर वादात शिरला नाही. परतु त्याला सूत कातणें बद करावें लागले कारण त्या एका स्टेशनवर फार गर्दी होती. मनोहरच्या डब्यात लोक घुसले डब्यात खेचाखेच झाली.

" राव जरा नीट बसा की, अगदी राजावाणी नका बसू आवरा जरा." "अहो, ती ट्रक वर ठेवा मिस्टर. कोण नेतो तिला ?" " तुम्ही गादी गुडाळा जरा. झोपायच तर सेकड क्लासात जाव ? " असे शब्द सुरू झाले. धीट धटिंगण होते ते जागा करून बसले. काही उभे होते. गाडी तापली होती. दुपारची वेळ. बाहेर प्रखर ऊन होते गाडींत ऊष्मा होत होता. पखा हलवायला तेथें जागा नव्हती. रेल्वेला फर्स्ट व सेकड क्लासमधून जाणाऱ्याकडून वर्षाला फक्त दोन अडीच कोट रुपये मिळतात. तिसऱ्या वर्गाच्या उतारूकडून २५-३० कोटि रुपये मिळनात, परतु त्याच्यासाठी कोणतीहि नीट सोय नाही. तिसऱ्या डब्यात माणसें असतात। याची रेल्वेला जाणीव नसते आणि ती का असावी ? तेथें बसणारेहि आपण माणसें नाहीं हें सिद्ध करीत असतात. स्वच्छ डब्याचा दोन घटकात नरक करणारे लोक तेथें असतात. तेथेंच थुकतात, खाकरे टाकतात, शेंबूड टाकतात. विड्याचीं थोटकें, काड्या, याची तेथेंच घाण. संत्र्याच्या साली, चघळलेल्या फोडींचे चोथे, चिवड्याचे कागद, केळयाच्या साली, सारें खालीच टाकतात. कोणी शेंगा खातात, सालें तथेंच टाकतात. कोणी फराळ करतात, भाजी खाली पडते. पाणी पिऊन भाडें तेथेंच विसळतील, मुलाना तेथेंच मुतवतील, सडासात वरतीच विधि करून ठेवतील, सारी घाण ! अशा लोकाना स्वर्गात ठेवलें तरी काय होणार ? ओंगळ व अमंगळ आहोंत आम्ही. कोणी जर म्हटलें कीं येथें घाण करू नका तर त्याच्यावर सारे तुटून

पडतील, त्याची टिंगल करतील "झाडू घ्या मिस्टर हातात, मोठे गांधी आलेत " वगैरे बोलतील.

मनोहरला तें सारें पाहवेना परतु काय करणार तो तरी? सार्वजनिक स्वच्छतेचें शिक्षण आम्हास मिळावयास हवे नीटनेटकें राहावयास आम्हास शिकावयाचें आहे कुत्र्यामांजरापेक्षा आम्ही अधिक स्वच्छ राहिलें पाहिजे

उभ्या असणाऱ्या मंडळींत एक स्त्री होती कडेवर तिचा मुलगा होता दीडदोन वर्षांचा असेल. किती वेळ मुलाला घेऊन ती उभी राहणार? परतु खाली तरी कोठे ठेवणार? त्या मुलाला इतरांनी तुडवलें असतें, फुलाला कुस्करलें असते. तिच्याकडे कोणाचेंहि लक्ष नव्हते, परतु मुलगा रडू लागला तेव्हा लक्ष गेलें. त्या मुलाला तहान लागली होती कोमेजून गेला होता त्याचा चेहरा. पाणी पाणी तो म्हणे कोठून देणार त्याची आई पाणी? तिच्याजवळ पाण्याची पिशवी नव्हती, कटीचा तांब्या नव्हता कोठून देणार पाणी!

"जरा तिकडे सरा हो, बाळाला पाणी देऊ दे" ती म्हणाली

"आहे कुठं पाणी?" एकानें विचारलें

"खाली गाठोड्यात आहे" ती म्हणाली

"गाठोड्यात पाणी? बर्फाचा खडा आहे की काय?" दुसऱ्याने विचारलें

ती स्त्री कांही बोलली नाही तिनें गाठोडें सोडले एका डबड्यात एक भिजवलेलें फडकें होते तें तिनें बाहेर काढलें मुलाच्या तोंडात तिनें दोन थेंब पिळले.

"पुरे." बाळ बोलला.

आईनें फडका पुन्हा ठेवला मुलाला खांद्याशी घेऊन ती पुन्हा उभी राहिली. मनोहरला तें करुण दृश्य पाहवले नाही. त्याच्या डोळ्यात पाणी आलें. कोण ही दरिद्रता असें त्याला वाटलें.

पुढच्या स्टेशनवर तो खाली उतरला. त्याने एका कांचेच्या भांड्यात पाणी आणलें. त्या स्त्रीला तो म्हणाला "हें स्वच्छ पाणी पाजा. त्याला दूध वगैरे हवं का?" 'नको' ती म्हणाली. तिनें मुलापुढें पेला केला. मुलानें किती असोशीनें पाणी पिऊन टाकलें. त्याच्या मुखावर टवटवी आली. मनोहरनें भांडें नेऊन दिलें. त्यानें दोन संत्री आणलीं न् त्या मुलाच्या हातीं दिलीं.

"द्या त्याला सोडून" तो म्हणाला

"कशाला तीं ?" ती म्हणाली

"असू देत" मनोहर म्हणाला

मुलगा हसू लागला आईने त्याचे केस वगैरे मागें केले फाटकें आगडें अंगात होतें, परंतु किती गोड दिसत होता मुलगा. तिनें त्याला खालीं सोडलें. तो आता हिंडू लागला हसऱ्या मुलाचें कोण कौतुक करणार नाही ? मुलगा हळूहळू मनोहरजवळ आला मनोहरचें धोतर तो ओढू लागला

"काय हवं रे गुलमा ?" मनोहरनें विचारलें त्या बाळानें वर पाहिले. मनोहरनें त्याला एकदम उचलून घेतलें त्याचा त्यानें मुका घेतला. मनोहरच्या खिशातील वस्तूशीं तो खेळू लागला. मनोहर त्याला बाहेरचे देखावे दाखवू लागला मनोहरच्या डोक्यावरची खादी टोपी त्या बाळानें आपल्या डोक्यावर घातली

"तुला हवी खादीची टोपी ?" मनोहरनें विचारिलें.

"आई, आई ग" मुलगा हाका मारून टोपी दाखवू लागला.

मनोहरच्या शेजारी बसलेल्या एका गृहस्थानें त्या मुलाला बिस्किट दिलें. देव देऊ लागला म्हणजे अनंत हातानीं देऊ लागतो. मुलगा पुन्हा आईकडे गेला जगानें किती दिलें तरी आईच्या कडेवर असण्यात जें सुख आहे त्यापुढें तें सारें फिके आहे आईच्या कडेवर तो बाळराजा पुन्हा शोभू लागला. आईचा पदर ओढू लागला. "नको रे राजा, फाटेल, ओढू नको." ती म्हणत होती.

सायंकाळ झाली. आगगाडीच्या खिडकीतून दूर सायंकाळचा रम्य देखावा दिसत होता. दूरच्या डोंगरावर एक प्रकारची प्रशान्त सुंदरता पसरली होती. तो संधिप्रकाश फारच मनोहर दिसत होता. लाल प्रकाशात रात्रीचा अंधार येऊन मिसळत होता मनोहर ती रम्य शोभा पाहत होता. तें त्याचें संध्यावंदन होतें. प्रातःकाल म्हणजे उन्मीलन, सायंकाळ म्हणजे मीलन. प्रातःकालच्या प्रकाशात आपण पृथक् होत असतों, सायंकाळ आली म्हणजे एकत्र येऊ लागतों. हळूहळू दूरचे डोंगर, दूरची झाडें एकरूप दिसू लागलीं. मनोहरनें एकदम हात जोडले. तोहि क्षणभर सृष्टींत मिळून गेला. स्वतःचें व्यक्तित्व व पृथक्त्व विसरला

परतु मुलाच्या रडण्यानें तो आपल्या भावसमाधीनून जागा झाला तो मुलगा रडत होता त्याला काय भूक लागली होती ? काय हवें होतें त्याला ? त्याला का झोप येत होती ? तो लहान बाळ कटाळून गेला होता—चिरचिर करीत होता ती बाई डोळे मिटून त्याला थोपटीत होती परतु बाळाचे डोळे झोपेनें मिटत नव्हते तो रडत होता. जरा थाबे, निजल्यासारखा वाटे, परतु पुन्हा त्याचे रडें सुरू होई.

"तुम्ही इथ माझ्या जागेवर बसा त्याला निजवा. तो निजेला आला असेल." मनोहर म्हणाला

"रात्रीं तो असाच रडतो तो निजणार नाहीं तुम्हाला कशाला त्रास ?" ती माता म्हणाली.

"त्याला माडीवर थोपटा जा बाई, बसा तिथ" एक पोक्त वृद्ध गृहस्थ म्हणाले.

त्या मातेनें कबूल केलें. मनोहर उठून गेला तेथें ती माता बसली. माडी-वर मुलगा घेऊन त्याला ती थोपटू लागली हळूहळू बाळ झोपी गेला. पुढें गर्दीहि कमी होऊ लागली डब्यात जरा जागा झाली मनोहरनें आपली घोंगडी पसरली. तीवर खादीची शाल घातली

"इथ निजवा त्याला माडीवर किती वेळ घेणार ?" तो म्हणाला.

त्या मातेनें आढेवेढे घेतले नाहींत. सारखे आढेवेढे घेणें बरे नसतें. तिनें आपल्या मुलाला त्या घोंगडीवर ठेवून जरा थोपटलें बाळ शात झोपलें. माता आता खिडकींतून बाहेर पाहत होती तिचे डोळे रडत होते. मनोहरला जाभया येऊ लागल्या. तोहि जरा पाय आवरून पडला. त्या लहान बाळाचे पाय त्याच्या डोक्याला मधूनमधून लागत होते. मनोहर झोपला बरीच रात्र झाली होती त्या डब्यातील सर्व मडळी झोपली होती. फक्त ती माता जागी होती. एका स्टेशनवर गाडी आली. त्या डब्यात कोणी शिरलें नाहीं. परतु ती माता उठली. तिनें मुलाचा मुका घेतला. त्याच्या अगावरून हात फिरवला. ती डब्याच्या दाराजवळ आली. पुन्हा तिनें एकदा मुलाकडे पाहिलें. अश्रूनी पाहिलें. उतरली ती. ती उतरली नाही तों गाडी चालू लागली. ती हळूहळू स्टेशनकडे गेली. एकटी स्त्री. जवळ ना सामान ना काही. तिकीट गोळा करणाऱ्यानें विचारलें "कुठ जायच तुम्हाला ?"

"तिकीट तर दूरचें आहे" ती म्हणाली.

"इथच उतरलें"

"आता रात्री कुठ जाणार ?" त्यानें पुन्हा चौकशी केली.

"देवाकडे ! तुम्हाला का चौकशी ? तिकीट घेण तुमच काम" ती तीव्रतेनें म्हणाली.

"जाऊ द्या. उगीच भानगड नको." कोणी तरी बोल्ले.

ती माता स्टेशनमधून बाहेर पडली. बाहेर अधार होता. ती कोठें तरी जात होती वाटेंत अडखळे, पडे. रेल्वेच्या रस्त्यानें जात होती. तारात अडखळून पडली. कोठें जाणार पण ? स्टेशनवर पुन्हा घटा वाजली. कोणती येणार गाडी ? मालगाडी का मेलगाडी ! परतु या मातेची जीवनगाडी कोठें जाणार ? ती कोठें वळणार ? कोण सिग्नल करणार ? कोण दिवा दाखवणार ? रेल्वेच्या रुळा-वर ती उभी राहिली. तेथे बसली रुळावर मान ठेवून क्षणभर निजली. गाडी येतें असें वाटलें. ती पुन्हा उठली व चालू लागली. समोर अधार, मागें अधार, आत अधार ! जा—दुःखी माते, अधारातून जा. तुझ्या मागोमाग आम्ही येणें बरें नाहीं.

इकडे मनोहर जागा झाला तो उठून बसला तो लहान बाळ झोपला होता, परतु त्याची आई दिसेना सडासात गेली असेल असें मनोहरला वाटलें गाडीत अद्याप कोणी जागें नव्हते आपणहि झोपावें पुन्हा असें मनोहरला वाटलें. तो पुन्हा झोपला पाघरूण अगावर घेऊन झोपला. त्या मुलाच्या अगावरहि त्यानें पाघरूण घातलें. मनोहरला झोप लागली. पहाटेचा गारवा आज होता ती साखरझोप होती

एकाएकीं मनोहरला जाग आली तो बाळ बाकावरून खाली पडला. तो रडू लागला, परतु त्याची आई कोठे होती ? अद्याप का ती सडासातच होती ? मनोहर खाद्याशीं घेऊन त्या मुलाला शातवू लागला. लोक जागे होऊ लागले. एकजण सडासात गेला, म्हणजे सडास मोकळाच होता एकूण ! मग याची आई कोठें गेली ? कोणाला विचारणार ? कोण सागणार ? डब्यातील सारे निजलेले होते. सारे आश्चर्य करू लागले.

"आता तुम्हीच त्या मुलाची आई बना. ती बाई एकटी होती. काहीं

घोटाळा असेल. तुमच्या गळयात मूल बाधून ती मोकळी झाली असेल" कोणी म्हणाले

"घोटाळ्याची मुल जन्मताच फेकली जातात हा तर दोन अडीच वर्षांचा दिसतो आहे. थोड बोलता. पाणी पिण्यासाठी तर त्याची आई नसेल कुठ उतरली? गाडी निघाली असेल, ती खालीं राहिली असेल" दुसरा गृहस्थ बोलला.

मनोहरच्या खाद्यावर विश्वास टाकून बाळ झोपी गेला. मनोहरनें त्याला पुन्हा घोंगडीवर झोपवले. तो आता विचार करू लागला. या मुलाला घेऊन कुठें जाऊ? याच काय करू? किती सुदर आहे बाळ! मनोहरच्या मनात एक प्रकारची वात्सलता उत्पन्न झाली तें मूल बेवारशी म्हणून का डब्यात सोडायचें? मनोहरला ती कल्पना सहन होईना तो मुलाकडे मधून मधून पाही. त्याचें हृदय अधिकच द्रवे त्यानें खाली आलेली घोंगडी जरा नीट केली तों काय? तेथें त्यास एक चिठी दिसली काही तरी लिहिलेलें होतें

"अभागिनीचे अज्ञात मित्रास प्रणाम, तुम्ही सहानुभूति दाखवलीत्. माझ्या बाळाला पाणी पाजलत, दूध पाजलत, मातेला करता येत नव्हत तें तुम्ही केलत. हा बाळ अतःपर तुम्हीच बाळगा. देवाकडे जाऊन बाळाच व तुमच मी शुभ चितीन. मी काय लिहू? अभागिनीन आणखी काहीं लिहिण शक्य आहे का?"

ती चिटी मनोहरनें तेथें सर्वासमक्ष वाचली नाहीं सडासात त्यानें वाचली. ती त्यानें खिशात ठेवून दिली. एका दुःखी भगिनीनें त्याच्यावर विश्वास टाकला होता. तो विश्वास का धुळींत मिळवायचा? परतु मनोहरला ना घर ना दार! तो सर्वत्र हिंडणारा पक्षी! लहान मुलाचें सगोपन तो कसें करणार?

मनोहरच्या मनात एकदम प्रकाश आला. त्याला आनंद झाला. 'आनदी-ताईस हा बाळ नेऊन द्यावा. त्याना मूलबाळ नाहीं. देवानच ही देणगी दिली. खरच किती छान होईल! या बाळाला काहीं कमी पडणार नाहीं. माझ्याशीं या मुलाचा सबध येण्यात हेंच ईश्वरी सूत्र असेल.' पुढच्याच स्टेशन-वर उतरून सुदरपूरकडच्या गाडींत बसावें असें त्यानें ठरविलें. प्रभा फाकू

लागली. उजाडलें आता. डोंगरापलीकडून सूर्य डोकावू लागला होता घोंगडी-वरचा बाळहि उठला पांघरुणातून तो डोकें काढू लागला. मनोहरकडे पाहून तो हसला. त्याचे चिमुकले हात मनोहरने हातात घेतले.

"अरे! मुती करणार वाटत!" मनोहर म्हणाला. इतक्यात घोंगडीवर चुळचुळ मुती बाळानें केली

पुढचें मोठें स्टेशन आलें त्या चिमण्या मुलाला खांद्याशीं धरून मनोहर आपली पिशवी व वळकटी घेऊन खालीं उतरला. सुंदरपुरच्या गाडीला अद्याप अवकाश होता. तेथें बाकावर मनोहर बसला त्यानें मुलाला दूध पाजलें.

"आई आई!" बाळ मध्येंच म्हणे. चुकल्यासारखें चोहोंकडे बघे. मनोहर त्याला हिंडवी, नाना वस्तु दाखवी.

इतक्यात सुंदरपुरकडची गाडी आली गाडीतून गर्दी बाहेर पडली. परंतु त्या गर्दींत मनोहरला कोण दिसलें! भाऊराव व गोविंदराव यांची जोडी उतरली होती. मनोहर त्यांना सामोरा गेला.

"मनोहर, तुम्ही कुठं इकडे? आणि हा कुणाचा मुलगा?" भाऊरावांनीं विचारिलें.

"हा आनंदीताईंसाठीं आणला आहे" मनोहर म्हणाला.

"ती तर माहेरीं गेली आहे." भाऊरावांनीं सांगितलें.

"कधीं येणार?" मनोहरनें विचारलें.

"लवकर नाहीं." ते म्हणाले

"तुम्ही कुठं जात आहात?" मनोहरनें प्रश्न केला.

"कोर्ट बंद आहे. गोविंदरावाबरोबर जरा जिवाची मुंबई करून येऊं म्हटलं. घरातहि करमत नाहीं." भाऊराव म्हणाले

"आनंदीताई घरात नसल्यावर कुठला आनंद? कसं तुम्हाला करमेल? परंतु हें काय? पुन्हा तुम्ही खादीचा त्याग केलात वाटतं? पुन्हा चिखलात फसाल हो!" मनोहर म्हणाला.

"फसलों तर वर काढायला तुम्ही आहातच!" भाऊराव म्हणाले.

"भाऊराव, जिवाची मुंबई करणाऱ्यानं खादी वापरून कसं चालेल? त्यानं पंचरंगी पोपट बनलं पाहिजे." गोविंदराव म्हणाले.

" मग मी आनदीबाईच्या माहेरी जातों. हा बाळ त्याच्या स्वाधीन करतो " मनोहर म्हणाला

" मनोहर तुमच लग्न तर झालेल नाही मुलगा कुणाचा ? " भाऊरावानीं विचारलें

" असतील त्याच्या भानगडी ! " गोविंदराव म्हणाले.

" किती सुदर आहे मुलगा ! " भाऊराव म्हणाले

" मला मुलाचा तिटकारा, परतु मीहि त्याच्याकडे पाहत आहे. तुमच चालल होत दोघाच बोलण परतु मी त्याच्या डोळ्याकडे बघत होतों कसे आहेत डोळे नाही ? " गोविंदराव म्हणाले.

" आपल वर्णन चालल आहे हें या लबाडान ओळखल वाटत. पहा तुमच्याकडे येऊ पाहत आहे " मनोहर गोविंदरावास म्हणाला

गोविंदरावानीं त्या मुलाला जवळ घेतलें

" गोविंदराव, पहा तुम्हाला चिकटला. मनोहर, पण कुणाचा हा मुलगा ? कुठून आणलात ? तुमच्या आनदीताईसाठी हा चोरून तर नाहीं ना आणलात ? " भाऊरावानी विचारले

" ते मग सागेन " मनोहर म्हणाला

" आम्ही जातों " भाऊराव म्हणाले.

" सुदरपुरला परत कधी येणार ? " मनोहरनें विचारले.

" दोन दिवसानीं. मुबई तशी मला फारशी आवडत नाहीं " भाऊरावानी सागितलें

" आनदीताईस काहीं निरोप ? " मनोरहरनें हसत विचारलें.

" काहीं नाही." भाऊराव म्हणाले.

" तुम्ही परस्पराच्या जीवनात मिसळून गेला आहात, आपण निरोप दुसऱ्यास देतों. स्वत.ला थोडाच देतों ? " मनोहर म्हणाला.

भाऊराव व गोविदराव निघून गेले. मनोहर त्या लहान बाळाला घेऊन आनंदीताईच्या माहेरी जाण्यासाठीं निघाला. " आई आई ! " बाळ हाक मारी. " येईल हो आई." मनोहर म्हणे. पुन्हा आगगाडीचा प्रवास सुरू झाला.

पुन्हा तो बाळ मनोहरच्या घोंगडीवर ओंपला होता राहूनराहून मनोहरच्या मनात विचार येई, 'कोण ती अभागिनी? कुठं गेली असेल ती? खरच का ती देवाघरीं निघून गेली असेल? तिचा आत्मा आम्हा दोघाभोंवतीं घुटमळत असेल देवाच्या दारातून ती आम्हा दोघाकडं पाहत असेल. झाल असेल का त्या अभागिनीस धैर्य? शेंकडों स्त्रिया तें मुक धैर्य दाखवतात. कशाला मी शका घेऊ?" अशा विचारात मनोहरलाहि जरा डुलकी लागली. झोपेंतहि मन प्रश्न करी, 'कोण ती, कोण ती– अभागिनी?'

---

# आनंद ७

आनंदी माहेरीं गेल्यापासून भाऊराव अगदी चमत्कारिक वागू लागले. त्याचा सारा संयम नाहीसा झाला गोविंदराव त्याना वाटेल तसें नाचवीत. गोविंदराव म्हणजे जादूगार असें गुलाबचंदशेठ म्हणत. भाऊरावानीं चैन व विलास हें जणू आपलें ध्येय केलें. रंगेल गोविंदराव त्याना विलासमंदिरें दाखवू लागले. परंतु सुंदरपुरात तितकें स्वातंत्र्य त्याना घेता येईना. हजारों ओळखी, शेंकडों परिचय. मनाची नाही तरी निदान जनाची तेथें लाज वाटे. त्याचे काहीं मित्र त्याना धोक्याची सूचना देऊ लागले. परंतु भाऊराव आंधळे झाले होते.

गोविंदरावाचा संगीताचा वर्ग आता बंद झाला होता. त्याच्याविषयीं अनेक वार्ता ऐकू येऊ लागल्या होत्या. वर्गात शिकायला येणाऱ्या मुलींजवळ ते नीट वागत नसत असें कोणी म्हणत. एका श्रीमान् व्यापाऱ्याच्या मुलीला ते गाणें शिकवावयास त्याच्या घरीं जात. त्या मुलीला गाणें काहीं केल्या येईना खरा गवई शिकविताना कंटाळून जातो. मूळचें काही देवाचें देणें असेल तर ना त्याची वाढ करावयाची? परंतु ती मुलगी

मोठी मोहक होती. तिच्या आवाजात गोडी नव्हती, परतु डोळयात होती, तिला ताल धरता येत नसे, परतु ती गोविंदरावाचें मन बेताल करी.

" कशाला शिकवता मला गाण? उगीच त्रास. बाबाना सागा कीं हिला सात जन्मात गाण येणार नाही " ती मुलगी एके दिवशी म्हणाली.

" तुम्हाला गाण यावयास हव असेल, आवाज गोड व्हावयास पाहिजे असेल तर एक उपाय करून पाहिला पाहिजे आल यश तर आल" गोविंदराव म्हणाले

" इन्जेक्शन निघाल आहे की काय ?" तिनें हसून विचारलें.

" एक प्रकारच इजक्शनच. माझ्यातील सगीत तुमच्यात ओतायचं म्हणजे एखाद्याच रक्त काढून दुसऱ्या रक्तहीनास नाहीं का देत? तसच हें." ते सागू लागले.

" हे का शक्य आहे?" तिनें सरळपणें विचारलें

" प्रयत्न करण माझ काम!" गोविंदराव म्हणाले.

" मग करा तो प्रयोग!" मुलगी म्हणाली.

" एक दिवस करीन." त्यानीं आश्वासन दिलें.

आणि गोविंदरावानी एके दिवशी प्रयोग केला त्या मनोहर मुलीचें तोंड एकदम आपल्या हातानीं धरून ते आपले तोंड त्यावर ठेवू लागले.

" हें काय, हें काय. " मुलगी म्हणाली

" प्रयोग करू दे माझ्यातील सारा आवाज तुमच्या कठात मी ओतीत आहे. ओठावर ओठ ठेवल्याशिवाय हें कस करता येईल?" गोविंदराव त्या मुलीचे हात धरून म्हणाले.

इतक्यात "बेटा कुसुम!" अशी हाक मारीत मुलीचे वडील तेथें आले. ते चकितच झाले.

" हा काय हलकटपणा?" ते गरजले.

" मी माझ सर्वस्व तुमच्या मुलीस देत आहे सगीताच्या देणगीच इन्जेक्शन करीत आहे." गोविंदराव शातपणें म्हणाले.

" कुसुम?" बापानें कठोरपणें हाक मारली.

" मी काय करणार बाबा ! मला गाण नाही आल तरी चालेल. याना हाकलून द्या. हलकट आहेत हे." ती म्हणाली.

" करा प्रयोग अस तुम्ही नव्हता म्हणालात ? पित्यासमक्ष तरी सत्य सागा ! " गोविदराव म्हणाले.

" प्रयोग म्हणजे का असला ? लाज नाही वाटत ? " कुसुम लाल होऊन बोलली.

" मी अनासक्त आहे. तुमच्या तोंडाची कातडी मला प्रिय नाही आपल्यातील गुणधर्म दुसऱ्यामध्यें भावनेच्या उत्कटतेनें ओतता येतात अशी माझी श्रद्धा आहे मा ही गोष्ट अनुभविली आहे एका स्त्रीच्या कोमल कठातून मी कला ओढून घेतली आहे. नको असेल मी यावयास तर उद्या-पासून येणार नाही. सन्याशाला काय ? निंदास्तुति सारखीच ! " गोविदराव म्हणाले.

" कामातुराणा न भय न लज्जा ! " पिताजी म्हणाले

गोविंदराव त्या दिवसापासून तेथें येण्याचे बद झाले गावातहि ही गोष्ट पसरल्याशिवाय राहिली नाही ही गोविदलीला कानावर येऊन भाऊरावाचे मन विचार करू लागे आपली आनदी निष्पाप असून हे गोविदरावच पापी असावेत असे त्याना वाटू लागे. परतु गोविदराव जवळ असले म्हणजे पुन्हा ते सारें विसरून जात गोविदरावानी सुदर सुदर कपडे करावे, भाऊरावानीं पैसे द्यावे. गोविदरावाना एक सुदर सोन्याचें घड्याळ पाहिजे होतें. भाऊरावानी घेऊन दिलें. गोविंदरावाची इच्छा प्रकट होण्याचा अवकाश कीं भाऊरावानी ती पुरविलीच. गोविंदरावाचा शब्द म्हणजे भाऊरावाचा वेद.

उन्हाळ्याची सुट्टी होती. कोर्ट बद होतें भाऊरावास घेऊन गोविंदराव मुबईस जात असता जेव्हा वाटेंत मनोहरला भेटले त्या वेळीं त्याला काही शका आली नाही " खादी अगावर नाहीं. पुन्हा फसाल " एवढेंच तो बोलला. मुबईस ही जोडी आली व स्वैर विहार करू लागली. मुबापुरी म्हणजे सर्व मोहाचें माहेर. पैसे जवळ असले म्हणजे स्वर्गातील सारीं सुखें तेथें प्राप्त होतात. स्वर्गातील पेयें व स्वर्गातील अप्सरा भूतलावर मिळतात

भाऊरावाची पिशवी रिकामी झाली. त्यानीं गुलाबचद शेठजीना ३०० रुपये मुबईस पाठविण्याविषयी लिहिलें. शेठजींनीं ताबडतोब पाठविले. भाऊराव याप्रमाणें रुतत चालले— पकात बुडत चालले— कोण त्याना वाचविणार !

त्या दिवशी रात्रीं भाऊराव व गोविंदराव एका रस्त्यानें जात होते. आणि त्याच्या पाठोपाठ मनोहर जात होता! भाऊरावाचा हात धरून ओढून न्यावें असें मनोहरला वाटत होतें. भाऊरावाचें त्या भागात रात्री जाणे मनोहरला योग्य वाटलें नाहीं भाऊराव घसरत आहेत, अधोधो जात आहेत हे त्यानें ताडलें. त्याना वाचविण्याचा त्याने निश्चय केला होता निर्मळ व नि:स्वार्थ निश्चय म्हणजे अपार शक्ति असते.

मनोहरनें एकदम भाऊरावाचा हात धरला भाऊरावानी मागें वळून पाहिलें तों मनोहर! ते चकित झाले, शरमले. त्यानी खाली मान घातली. भाऊरावाची मान खाली झालेली पाहून मनोहरला हिंमत चढली भाऊरावात अद्याप सद्भाव आहे, सच्छीलाची चाड आहे ही गोष्ट त्याने ओळखली

"चला भाऊराव, तुम्हाला नेण्यासाठीं मी आलों आहें. तुम्ही आलच पाहिजे" मनोहर म्हणाला

"काय आहे काम?" भाऊरावानी विचारलें

"एका सतीचे अश्रु पुसण्याच-तिचे प्राण वाचविण्याच!" मनोहरनें गभीरपणे सागितले.

'कुलटेचे प्राण कशाला वाचवावे? ती रडे कीं नाही, मरे कीं नाहीं!" गोविंदराव बोलले.

"सतीची निंदा करशील तर थोबाड फोडीन" मनोहर रागानें बोलला.

"हीच का तुमची अहिंसा?" गोविंदराव हसत म्हणाले.

"होय हीच अहिंसा चला भाऊराव, या दुष्टाची सगत सोडा." मनोहर अधिकारवाणीनें म्हणाला

"भाऊराव, गाधाळाच्या नादी लागू नका. दो दिनकी दुनिया! खाव प्याव, मौज करावी, यात पुरुषार्थ आहे हे दुबळे लोक मनान भोग भोगतात व बाहेर वैराग्य दाखवतात. दुनियेंत आपण वैराग्यासाठीं जन्मलों नाहीं. सुखासाठीं जन्मलों आहोंत. जिवाचा जन्मच मुळी विलासातून! विलासातून विकास हें माझ नीतिसूत्र आहे चला—चला माझ्याबरोबर. जगातील सारी सुख तुम्हाला दाखवतों, सारी गमत दाखवतों" गोविंदराव म्हणाले.

"माणस म्हणजे पशु नव्हेत. आपण माकड असलों तरी माकडपणा टाकून माणस होण हा आपला धर्म आहे. वानराचे नर व्हा, नराचे नारायण

व्हा. भाऊराव, घुटमळता काय ? सतीचे पवित्र अश्रु तुम्हाला हाक मारीत आहेत तिचे पचप्राण तुम्हाला बोलावीत आहेत. चला–" असें म्हणून मनोहरनें त्याचा हात बळकट पकडला मनोहर त्याना नेऊ लागला. लगाम घातलेल्या घोड्याप्रमाणें, वेसण घातलेल्या बैलाप्रमाणें भाऊराव मनोहरच्या बरोबर जाऊ लागले. गोविंदराव भाऊरावाचा हात धरून ओढू लागले. मनोहरनें त्याना एक धक्का दिला "खबरदार पाठीमागून येशील तर!" तो सतापानें म्हणाला

"भाऊराव, सुख बोलावीत आहे. ती माडी बोलावीत आहे भाऊराव, सुतात गुरफटू नका. खादीत गुदमरू नका, भाऊराव–" असे बोलत गोविंदराव पाठिमागून येत होते. परतु मनोहर वेगानें निघून गेला "जा, भिकारडे बेटे!" असें बोलून गोविंदरावानी त्याचा नाद सोडला मनोहरनें एक व्हिक्टोरिया ठरविली. भाऊरावाच्या बिऱ्हाडी दोघे आले भाऊरावानीं आपलें सामान घेतलें दोघे मित्र बोरीबदरवर आले. गाडींत बसले. भाऊरावाचे हृदय भावनानीं ओथबून गेलें होतें. लज्जा, कृतज्ञता, अनुताप, पाप–किती तरी भावनाची मनात दगल झाली होती.

"मनोहर, तुम्ही पुन्हा मला वाचविण्यासाठी आलात. तुम्ही का देवदूत आहात ? पाठीराखे परमेश्वर आहात ?" भाऊराव म्हणाले.

"ही माझी पुण्याई नाहीं. ही आनदीताईची पुण्याई आहे. त्याना मी भेटलों. त्या व मी त्याच्या गावच्या देवीला गेलों होतों दाट रानात ती जगदबा आहे. त्या जगदबेच्या पायाशी बसून त्यानीं सारी हकीकत सागितली. त्या रडल्या त्याना खाणपिण रुचत नाही. झोंप येत नाहीं घरच्या मडळींस सशय येऊ नये म्हणून त्या पानावर बसतात, वरपागीं हसतात, परतु रात्रीं त्याची उशी ओली होते दिवसा ताऱ्याप्रमाणें त्याचे अश्रु लपलेले असतात. रात्रीं ते प्रकट होतात त्या आतून जळत आहेत मी तो लहान बाळ त्याच्याजवळ दिला. परतु त्या म्हणाल्या, 'मनोहर, त्याच्या मनात खरोखर सशय असेल तर मी जगू शकणार नाही. या बाळाला मी किती दिवस पुरणार ? जा, त्याच्याकडे जा त्याना खरोखर काय वाटत तें विचारा. त्या वेळेस मी ओरडलें नाहीं, कारण त्याच्या मित्राची बेअब्रू व्हायची. त्याच्या मित्राची

येअश्रू म्हणजे याचीच. शिवाय त्या पाप्यापासून आत्मरक्षण करण्याची माझी शक्ति होती मनोहर, मी निष्पाप आहें. या जगदवेसमोर का खोट सागेन ?' भाऊराव, चला आनदीताईकडेच चला. त्याना किती आनद होईल ! आनदी-ताई, तुम्ही, अन् देवान तुम्हाला दिलेला तो लहान बाळ, आपण सारे मग सुदरपूरला येऊ. नाहीं म्हणू नका !" मनोहर त्याचे हात हातात घेऊन काकुळतीनें म्हणाला.

"तुम्ही मुबईस आमच्या पाठोपाठ कसे आलात ?" भाऊरावानीं प्रश्न केला.

"लहान बाळाला आनदीबाईजवळ ठेवून मी सुदरपूरला आलों. तुमच्या दाराला कुलूप ! तुम्ही दोन दिवसानीं येणार होता. परतु तुमचा पत्ता नाहीं. मी तुमची वाट पहात होतो. परतु एके दिवशीं अकस्मात् गुलबचद शेटजीकडून मुंबईचा पत्ता कळला. मुबईस येण्याचं मी ठरवल. तुम्ही ज्या भोजनालयात उतरला होतात तिथच मी उतरलों तुमच्या पाळतीवर मी होतों. मी तुम्हास आधी कळू दिल नाहीं तुम्ही काय करता तें सर्व मला पहावयाच होत, परतु रात्री त्या रस्त्याला जाताना तुम्हास पाह्यल्यावर माझा सताप झाला. गोविंदरावाची चीड आली असो, पुन्हा तुम्हाला चिखलातून मी वाचवलं आहे." मनोहर म्हणाला.

"मनोहर, तुम्ही आम्हाला सोडून जाऊच नका आता, आमच्याचकडे रहा." भाऊराव म्हणाले.

"तुमच्याकडे राहून मी काय करू ? मी आता कुठ तरी एखाद्या खेडेगावात राहणार आहे. तेथें होईल ती सेवा करावी अस मी म्हणतों आश्रमातून नवीन नवीन गोष्टी मी शिकून आलों आहें. आता खादी घेऊन भटकण पुरे आता स्थिर व्हावस वाटत एखादी शाळा काढावी, मुलाची मन तयार करावीं, असहि मनात येत." मनोहर म्हणाला.

"मनोहर, फुलगाव म्हणून सुदरपूरपासून पाच कोसावर एक खेड आहे. तिथ आमचा मळा आहे. तिथ रहाल ? आम्हींहि सारीं तिथच राहायला येऊं. शहराचा मोह सोडू. खेड्यात सगीत फुलवू, आनद निर्मू. मलाहि तुमच्या मागोमाग येऊ द्या—" भाऊराव म्हणाले.

"तुमची तिथ सावकारी असेल ! सावकाराचा मित्र म्हणून तेथें मी काम करू लागलो तर लोकाचा मजवर विश्वास बसणार नाहीं. सावकार म्हणजे

साप अस झाल आहे काहीं सावकार असतील सज्जन. परतु ते अपवाद."
मनोहर स्पष्ट बोलला.

" मनोहर, मी खतपत्र जाळून टाकीन. सावकारी सोडून देईन. स्वतः श्रमेन, हातानी झाड लावीन, फुल फुलवीन, निर्मितीचा निर्मळ आनद उपभोगीन किती सुदर विचार मनात येत आहेत ! मनोहर, तुम्हाला पाहताच जीवनाचा दुसरा कप्पा जणू उघडतो. गोविंदरावाना पाहताच निराळा उघडे आपल्या जीवनात सत् आणि असत् हें मिश्रण आहे असत् बीजाना पाणीच न मिळू दिल तरच तीं निर्जीव होतील. हे माझे आजचे विचार कायम रहाण्यासाठी मनोहर, तुम्ही माझे चिरमित्र व्हा. मला सोडू नका नाहीतर कोणा गोविंदरावाच मोहक परतु मारक भूत मानगुटीस पुन्हा बसायचें" भाऊराव अतःकरणपूर्वक म्हणाले

" आपल्या पवित्र निश्चयाना शेवटी देवाचा आशीर्वाद हवा" मनोहर म्हणाला

" मनोहर, तुम्हाला तो मुलगा कुठ मिळाला !" भाऊरावानी विचारलें.

मनोहरनें सर्व हकीकत सागितली त्यानें त्या अभागिनीचें ते पत्रहि दाखविलें.

" ती अभागिनी सधवा होती कीं विधवा ?" भाऊरावानी प्रश्न कला.

" मला नाहीं आठवत—" मनोहर म्हणाला.

" तुम्ही तिच्या चेहऱ्याकडे नीट पाहिलहि नसेल. लक्ष्मणान सीतेच्या पायातील नुपुरच फक्त ओळखली !" भाऊराव म्हणाले.

" भाऊराव, मीहि एक साधाच मनुष्य आहे. पवित्र जीवन जगण्याची धडपड करणारा एक प्राणी आहे. आपण सारे एकाच गलबतात बसलेलों आहोंत" मनोहर नम्रपणें म्हणाला.

" तुम्ही निजा जरा आपण पाळीपाळीन झोंपू." भाऊरावानीं सुचविलें.

" तिकडे आनदीबाई झोंपल्या नसतील त्या देवाला आळवीत असतील."
मनोहर म्हणाला.

भाऊरावानीं वळकटी सोडली. मनोहरला त्यानी फार आग्रह केल्यामुळें त्याच्या त्या छोट्या गादीवर मनोहर झोंपला. भाऊरावाना विचार करण्यासाठीं, रडण्यासाठीं, पश्चात्तापानें पवित्र होण्यासाठी, मनातील पवित्र विचार दृढ

करण्यासाठी एकटेंच सोडणें बरे असे त्याला वाटलें. बी जमीनींत कांहीं काळ आपणास कोंडून घेतें. सर्व बाह्य गोष्टीपासून तें अलिप्त राहतें. म्हणूनच त्यातून दिव्य जीवनाचा अंकुर फुटतो बसू दे भाऊरावाना एकटे. मनोहर झोंपला भाऊराव एकटेच विचार करीत बसले एकदा तर त्यानीं सद्गदित होऊन हात जोडले कोणाला जोडले? देवाला की आनदीला? पवित्र पत्नीला केलेलें वंदन देवाला केल्याप्रमाणेंच आहे. पावित्र्य म्हणजेच परमेश्वर

भाऊराव व मनोहर आनदीताईच्या माहेरी गेले सकाळची वेळ होती. अंगणात बाळाला खांद्याशी धरून आनदी त्याला खेळवीत होती, फुलें, पाखरें दाखवीत होती. अशा वेळीं ते दोघे अकस्मात् आले आनदीचा आनंद गगनात मावेना ती पहातच राहिली. मुखावर अष्टभाव जणू दाटले होते

"वेड्यासारखी पहातेस काय? ओळख विसरलीस वाटत!" भाऊराव हसत बोलले.

"जन्मोजन्मीं ओळख विसरणार नाहीं." आनदी म्हणाली.

"या लबाडान पहा मला ओळखल" मनोहर मुलाला घेऊन म्हणाला.

"चला आत, इथ बाहेरच काय उभे राहता?" आनदीनें सुचविलें.

"म्हटल आत घेतेस की नाही!" भाऊराव हसून म्हणाले.

"हृदयात रात्रंदिवस आहात, आणखी घरात घेण तें काय?" आनदीनें उत्तर दिलें.

भाऊ आले म्हणून घरात सर्वांना आनद झाला. थाटाची मेजवानी झाली. तिसऱ्या प्रहरी आनदीनें 'देवीच्या दर्शनास येता का' म्हणून विचारलें. भाऊराव तयार झाले. "पोटहि हलक होईल, फिरणहि होईल." ते म्हणाले.

"पोटात बरच साठलेल आहे तें ओठातून बाहेर पडेल. निवात वनात निवात बोलाव." हसत मनोहरनें उद्गार काढले.

मंडळी निघाली. बरोबर एक गडी होता. त्यानें त्या लहान मुलाला घेतलें होतें. बरेंच लाब होतें अंबाबाईचें देऊळ. गडी चालत पुढे गेला. त्याच्या पाठोपाठ मनोहर होता. आनदी व भाऊराव मागें राहिले.

" मनोहर, थोड थाबा. नाहीं तर पुन्हा पडू हो आम्ही ! " भाऊराव हाक मारून म्हणाले.

" आता तुमच्याबरोबर आनदीताई आहेत. पडण्याची भीति नाहीं माझ्यापेक्षा त्या अधिक बलवान् आहेत. त्या तुम्हाला अधिक सभाळतील." मनोहरनें दुरून सागितले.

" हिला भरभर मुळी चालवतच नाहीं " भाऊराव हसून म्हणाले

" त्याच हृदय भरून आल असेल " मनोहर म्हणाला.

" किती वाळलीस तू ? आजारी का आहेस ? " भाऊरावानी विचारलें.

" मी जगलें हेंच आश्चर्य तुम्हाला सार माहीत असून का विचारता ? तें मागच जाऊ दे. पुढ पहा, अडखळाल हो ! " त्याचा हात धरून ती प्रमानें म्हणाली

" असा हात धरलास म्हणजे कशाला अडखळेन ?" ते म्हणाले.

" परतु माझा हात झिडकारून देता व मग पडता. पुनः माझा हात नका झिडकारू " ती म्हणाली

" तुला उचलून घेऊ का ? दमलीस तू " त्यानीं विचारलें

" इश्श, दमायला काय झाल ? आज किती तरी शक्ति आली आहे पायात." आनदी म्हणाली.

" लग्नाच्या वेळेस वर वधूला उचलतो. आपण आपल्या लग्नाच्या वेळेस अस काहीं केल नाहीं. तुला त्या वेळेस वाईट वाटल असेल. परपरागत हक्क बुडाला अस वाटल असेल, होय ना ?" भाऊरावानी जुन्या आठवणी काढल्या.

" लहान मुलामुलींच्या लग्नात ती मजा आपण का लहान होतों ? घास घायला सुद्धा तुम्ही तयार नाही झालेत." आनदी हाताला चिमटा घेऊन म्हणाली.

" पण हल्लीं रोज ताटात दहींभात ठेवतों की नाहीं ? " भाऊराव म्हणाले.

" माहेरीं आल्यापासून तो मिळाला नाहीं म्हणून तर वाळलें." आनदी हसून म्हणाली.

" तुला घेऊ दे उचलून. आपण थोडा वेळ लहान होऊ. किती जड आहेस पाहू दे !" असें म्हणून खरेंच भाऊरावानीं आनदीला उचलून घेतलें ! ते पळतच निघाले.

" पळता काय? पडाल अन् मला पाडाल." आनदी पतीच्या गळयाला मिठी मारून म्हणाली. परतु भाऊराव पळतच होते अद्भुत सचार त्याच्यात झाला होता. मनोहरच्या पुढें ते निघून गेले मनोहर टाळ्या पिटू लागला. तोहि त्याच्या पाठोपाठ पळूं लागला व म्हणाला, " भाऊराव, थाबा कीं जरा. मी एकटाच मागें राहीन."

" पुरे आता, दमलेत. घाम बघा कपाळावर." तिनें आपल्या पदरानें त्याच्या तोंडावरचा घाम पुसला.

" आणि आनदीताई, तुम्हालाहि पहा घाम आला आहे. तुम्ही कडेवर बसून दमलात वाटत." मनोहरनें विचारलें.

" मी प्रेमामुळ गुदमरून गेले. भावनाच्या आनदामुळें दमलें." आनदी म्हणाली.

" तुझा घाम मी पुसतों." असें म्हणून भाऊरावानीं रुमालानें आनदीच्या मुखावरचा घाम पुसला.

" हें काय? कुकू सुद्धा पुसलत!" आनदी म्हणाली.

" आज नवीन कुकू लाव. आज जणू पुन्हा लग्न लागल—" भाऊराव म्हणाले.

" म्हणून आनदीबाईस तुम्ही उचलून आणलत होय?" हसून मनोहरनें विचारलें.

भाऊरावानीं वाटेंतील एक काटा घेतला. त्यानीं बोटातलें थोडें रक्त काढलें. त्यानीं त्या रक्ताचें कुकू आनदीच्या कपाळी लावलें.

" लाल जिवत कुकू!" ते म्हणाले.

" हात का असा टोंचून घ्यावा?" ती सद्गदित होऊन म्हणाली.

" तुझ्या हृदयाला मी टोंचल त्या वेदनापुढ बोटाला टोंचण काहीच नाहीं." भाऊराव म्हणाले.

" मी हळदकुकू बरोबर आणल आहे. देवीला वाहून मग कपाळाला लावीन." ती म्हणाली.

देवीचें देऊळ आलें. निर्जन वनात ती जगन्माता होती. आसमतात् किर्र् झाडी होती. आनंदीनें देवीची पूजा केली. तिजपुढें नारळ ठेवला. भाऊरावानीं देवीचे पाय धरले व एकदम आनदीचेहि धरले.

" हें काय अस? मला आणखी नका रडवू!" आनंदी म्हणाली.

" देवाला नारळ वाहणं म्हणजे आपलं डोकं वाहणं डोकं देवाचं करणं, डोकं सद्विचाराच्या ताब्यात देणं " मनोहर म्हणाला

" मनोहरला आपलं कसं सुचतं ?" आनंदी म्हणाली.

त्या लहान मुलानें हळदकुंकू जमिनीवर पसरलें.

" तें पहा त्यानं सांडलं सारं " आनंदी म्हणाली

" या बाळाचं नांव काय ठेवायचं ?" भाऊरावांनी विचारलें.

" आनंद ठेवा नांव " मनोहरनें सुचविलें.

" खरंच हा बाळ आला व आपल्या जीवनांत पुन्हा आनंद झाला–" आनंदी म्हणाली.

" त्याचं नांव घेणं म्हणजे तुझं नांव घेणं. चांगली आहे युक्ति, नवऱ्याच्या ओंठावर आपलं नांव नाचवायचं !" भाऊराव हसून म्हणाले

" तुला आनंद नांव आवडतं रे बाळ ?" आनंदीनें विचारलें.

मुलानें हळदकुंकू उधळून टाळी वाजवून आपली संमत दर्शविली

सारी मंडळी परतली. दुसऱ्या दिवशीं सर्वजण सुंदरपूरला निघून गेली. नवीन आनंदी संसार सुरू झाला.

# सेविका व सूतिका ८

ती अभागिनी मरण्यासाठी म्हणून आगगाडीतून बाहेर पडली. परतु मरणाचा निश्चय होईना. आगगाडीखाली मान ठेवून मरू असें तिनें योजिलें होतें. परतु तें धैर्य तिला झालें नाहीं. अधारातून ती जात होती. वाटेत एके ठिकाणीं तिचा पाय सापावर पडला सापानें पायाला विळखा घातला. तिनें जोरानें पाय झटकला व ती पळत सुटली. साप पाठीमागून येत असेल या भावनेनें ती पळत होती. काटे, दरे-दरकुटें पाहायला सवड नव्हती. तिला मरणाची इच्छा होती. तिची इच्छा पूर्ण करण्यासाठीं मरण तिच्या पायाशीं चालून आलें होतें, परतु तिनें तें झिडकारलें मरण तिच्या पाठोपाठ मिठी मारण्यासाठीं येत होतें, परतु ती त्याला भेटू इच्छीत नव्हती. मरणें सोपें नाहीं. 'मरू-मरू' असें आपण कितीहि म्हटलें तरी प्रत्यक्ष मरण आलें तर त्याचें आपण स्वागत करणार नाही.

ती जरा थाबली. फुस्स् आवाज आला असा तिला भास झाला. भ्यायली, पुन्हा पळत सुटली. पायात काटे मोडले तरी ती पळतच होती. पुढें

एके ठिकाणीं एक खोल खळगा होता त्या खळग्यात ती पडली. तिला लागलें. ती कण्हू लागली. त्या खळग्यात ती रडू लागली. ती दमली होती. तेथें ग्लानि येऊन ती पडली. तिला झोंप लागली होती, का मूर्च्छना आली होती ?

आता उजाडलें पाखरें हिंडू-फिरू लागलीं. फुलें फुलली. त्या अभागिनी-नें डोळे उघडले. ती उठू पाहत होती. तिला उठवेना. तिचें अंग गळवा-सारखें ठणकत होतें. तिच्या डोळ्यातून पाणी आलें.

" ये रे सापा, डस मला." ती म्हणाली.

परंतु साप येता तर ती ताडकन् उभी राहिली असती.

इतक्यात तिच्या कानावर हसण्याखिदळण्याचा आवाज आला. जीवनाचा तो आवाज होता. रात्रभर ती मरणाच्या आवारात होती, मरणाच्या आसपास होती. कोणी येईल का इकडे, काढील का मला वर, असें तिच्या मनात आलें. इतक्यात कोणी तरी येऊन तेथें डोकावलें

" अरे, इकडे या. येथें पहा एक फूल फुललें आहे—" त्यानें इतरास हाक मारली. सारी मंडळी तेथें आली. 'कसलें फूल, कसलें फूल' करीत सारे धावत आले. त्या अभागिनीला त्यानीं पाहिलें. उकिरड्यावर फुललेल्या फुलाप्रमाणें, चिखलातील कमळाप्रमाणें ती दिसत होती. तिच्या म्लान मुखावरहि एक-प्रकारची मधुरता होती.

" शापभ्रष्ट देवता ! " एक म्हणाला.

" हें काय गूढ आहे ? " दुसरा उद्गारला.

' चर्चा मागून आधीं ह्या अभागिनीला बाहेर काढूया." कोणी गंभीरपणें सांगितलें.

त्याच्यामध्यें एक जण उंच होता. तो म्हणाला " मी खालीं उडी टाकतों. याना खाद्यावर घेतों. त्या हात वर करतील. तुम्ही ओढून घ्या."

" त्याना आधीं विचारा." एकानें सुचविलें.

" बाई, बसाल का माझ्या खाद्यावर ? " त्या उंच तरुणानें विचारलें.

" तुमच्याजवळ दोरी असली तर खालीं सोडा. मी दोरी चढून येईन." ती खालून म्हणाली.

" पडाल तुम्ही." पोक्त तरुण म्हणाला.

" माझ्या आयुष्याची दोरी बळकट आहे. मी पडणार नाहीं. लहानपणीं दोरीवर चढण्याचे खेळ आम्हीं खेळलों आहोंत आईचा मार त्यासाठीं खाल्ला आहे. सोडा दोरी, करा उपकार ! " ती म्हणाली

त्या मंडळींचें सामान स्टेशनवर होते. येथें कोठें असणार दोरी ? दोरी दूर राहिली. परतु त्याच्यातील एकानें स्टेशनवर पळत जाण्याचें ठरविलें तो गेला. तो दोरी घेऊन आला. दोरी खालीं सोडण्यात आली. ती खरोखरच सपूसप् चढून आली

" शाबास ! " सारे म्हणाले

" कुठ जाणार आता तुम्ही ? " त्या पोक्त तरुणानें विचारिलें.

" कुठ जाऊ तें तुम्हीच सागा मी एक अभागिनी आहे. मरायची इच्छा असून मला मरवत नाही मी एकटी आहे मला कोणी नाहीं. मी मरणाचे प्रयत्न केले, परतु मरण जवळ आल म्हणजे मी पळत असें. देव मला मारणार नाहीं मरू देणार नाही. रडण्यासाठी तो मला जिवत ठेवणार. तुम्ही कोण ? इकडे नेमके कसे आलात ? " तिनें विचारलें.

" आम्ही सुखयात्रा करीत हिंडत आहोंत. या स्टेशनाच्या जवळ एक सुदर देखावा आहे अस ऐकल म्हणून पहाटे इथ उतरलों. इथं कुठ तरी लहानसा पण मनोहर धबधबा आहे. आजूबाजूस दाट झाडी आहे. लहानस शिवालय आहे म्हणतात. तिथ जाऊन मग परत माघारे फिरणार." त्या पोक्त तरुणानें सागितलें.

" तुमचा वेळ माझ्यासाठीं मोडला. दहा वाजून गेले असतील." ती म्हणाली.

" दु:खिनाच दुःख दूर करण म्हणजेच शिवाची पूजा. तुम्ही एखाद्या स्त्रियाच्या सस्थेत का जात नाही ? " त्यानें विचारिलें.

" मला फारशी माहिती नाही. कुठ आहे अशी संस्था ? " तिनें विचारलें.

" सेवासदन आहे, कन्यांच्या सस्था आहेत, मुबईस दादरला एक सस्था आहे. तुम्हाला तिथ आधार मिळेल. काहीं शिका, समाजात तुमचा उपयोग होईल, जीवनाचा कटाळा येणार नाही." तो म्हणाला.

" तुम्हीच मला पोंचवा ना एखाद्या सस्थेंत. मी तिथ काम करीन, शिकेन." ती म्हणाली.

"ठीक! चला आमच्याबरोबर. तुम्हाला असं असाहाय्य सोडून जाणं आम्हा तरुणास शोभत नाही." तो म्हणाला

"तुम्ही देव भेटलेत आगगाडींत असाच एक भेटला होता. तुम्हाला देखावा पहायचा आहे ना? उशीर होईल" ती म्हणाली.

"तुम्हीहि चला!" एकानें सुचविलें

"माझ्या पायात काटे मोडले आहेत" ती म्हणाली

"माझ्याजवळ सुई आहे." त्या उंच तरुणानें सांगितलें.

"तुम्ही जाऊन या, मी तोंपर्यंत काटे काढीत बसतें" तिनें सुचविलें.

परंतु तिचें म्हणणें कोणी ऐकलें नाहीं. शेवटीं दोनतीन काटे तिनें काढले. नंतर सारी मंडळी त्या धबधब्याकडे जावयास निघाली. वाटेंत विचारीत विचारीत ते जात होते धबधब्याचा गंभीर आवाज कानावर आला. आता झाडी सुरू झाली. सूर्याचा किरण लागत नव्हता. शांत, शीतल, दाट छाया. सर्वांची हृदयें शांत झाली होती. ती गंभीर निःस्तब्धता भंगावी असें कोणाच्याहि मनात येईना. इतक्यात काहीं माकडें उड्या मारीत गेली. आपल्या शांत हृदयातून वासनांचीं– विकारांची माकडें अशीच मध्येंच उड्या मारू लागतात, हृदय अशान्त करतात.

"तो पहा—तो पहा! धबधबा!" सारे उद्गारले. सारे उभे राहिले—अवाक् राहिले. पाण्याची धार वरून पडत होती व खालीं फेसाची राशि दिसत होती. वरून खालीं पाणी पडत होतें. खालून फेस वर उडत होता. जीवनाचा प्रवाह संकटावर आपटला म्हणजे असेंच स्वच्छ सत्त्व बाहेर पडतें. आजूबाजूस हिरवीकाळी झाडी व मध्यें हा स्वच्छ धबधबा ते तरुण पाहत होते. परंतु ती अभागिनी कोठें आहे?

ती त्या शिवालयात जाऊन बसली होती. शंकराच्या पिंडीवर ती अश्रूंचा अभिषेक करीत होती. असा पवित्र अभिषेक देवा-महादेवावर तेथें झाला नसेल. तो जिवंत पाण्याचा अभिषेक होता. भावनामय, भक्तिमय अश्रूंचा तो अभिषेक होता.

ती बाहेर आली.

" आम्ही तुम्हाला बघत होतों. वाटल जीव द्यायला गेलात की काय ! " पोक्त तरुण म्हणाला.

" जीव देण्याच धैर्य मला नाही " ती म्हणाली

" या फराळ करायला. काहीं खा " तो म्हणाला

सर्वांचे फराळ झाले थडगार पाणी प्यायले तें पाणी किती प्यालें तरी तृप्ति होत नव्हती शेवटीं मडळी निघाली स्टेशनवर आली तो तिकिट-कलेक्टर त्या अभागिनीकडे पाहू लागला परतु काहीं बोलला नाहीं. गाडीला अवकाश होता एका झाडाखालीं ते सारे बसले होते.

" पुण्याच्या सेवासदनात वसतिगृह आहे तुम्हा तिथ काहीं काम केल तर राहता येईल श्रीमत मुलीचीं लुगडीं वगैरे धुवावीं, इतर काम कराव. तुम्हाला तिथ मी घेऊन जाईन. तुमच नाव काय ? " त्या पोक्त तरुणानें विचारिलें.

" माझ नाव—काय सागू माझ नाव ? " ती दुःखाने म्हणाली.

" जें खर असेल तें सागा." तो म्हणाला.

" तारा देशपाडे." ती म्हणाली

इतक्यात गाडी आली सर्व मडळी गाडींत बसली. पुणें आलें. त्या तरुणाची पागापाग झाली. तारा त्या पोक्त तरुणाच्या बरोबर गेली. दोघें टाग्यात बसलीं.

" मी आत्ताच तुम्हाला सेवासदनात नेतों." तो म्हणाला.

" तेंच बर." ती म्हणाली.

टागा सेवासदनाशी थाबला. तारा टाग्यातच होती. तो तरुण आत गेला. व्यवस्थापिकाबाईस भेटला. त्यानें थोडक्यात हकीकत सागितली.

" त्याना आत घेऊन या." व्यवस्थापिका म्हणाल्या. तरुण तारेला घेऊन आत गेला.

" तुम्हाला कुणी नाही ? " व्यवस्थापिकाबाईनीं विचारिलें.

" मला कोणी नाही. मला इथ ठेवा. मी वाटेल तें काम करीन. मला शिकवा. माझ्या जीवनाचा उपयोग करून घ्या." तारेच्या डोळ्यात बोलता बोलता पाणी आलें.

" करूं याची व्यवस्था." व्यवस्थापिकाबाई म्हणाल्या.

तो तरुण जाण्यास निघाला. तारेनें कृतज्ञतापूर्वक वदन केलें.

" तुमच नाव काय ? " तिनें विचारिलें.

" मी अज्ञात राहणच चागल तुमच जीवन कृतार्थ होवो." असें म्हणून तो तरुण निघून गेला.

" तुमच्याजवळ सामान वगैरे नाही ? अथरूण, ताटवाटी, लुगडीं वगैरे काहीं नाही ? " तारेला विचारण्यात आलें

" खरोखरच मी अनाथ आहे ! माझी अब्रू तुम्ही साभाळा. स्त्रीची दया स्त्रियाशिवाय कुणास येणार ? " तारेनें सागितलें.

तारेची व्यवस्था लागली व्यवस्थापिकाबाईकडेच ती राहिली. ती पुष्कळ काम करी तारा मराठी फायनल झालेली होती. ती हुशार होती. तिला विणणें टिपणें येत होतें. ती नम्र होती. सर्वाजवळ ती गोड वागे सर्वांच्या उपयोगी पडे. ती इग्रजी शिकू लागली. काही इग्रजी शिकल्यावर तिने सेविकेचा व सूतिकेचा वर्ग जोडण्याचें ठरविलें. मन लावून ती अभ्यास करी, मन लावून सारें करी.

अनेक मुलींची ती मैत्रीण झाली. किती तरी मुली आपलीं सुखदुःखें तिला सागत. तीहि आपली थोडीथोडी हकीकत सागे. एके दिवशी एका मैत्रिणी-बरोबर ती बोलपट बघावयास गेली होती एक भिकारीण पाठीशीं मूल बाधून गाणें गात भीक मागत आहे असा त्यात एक देखावा होता. ती भिकारीण सुदर होती. दारिद्र्यातहि तिची रूपसपत्ति खुलून दिसत होती. एका घर-मालकानें तिला पाच रुपये दिले व स्वत.ची थोडी करमणूक करून घेतली. ती भिकारीण पुन्हा सौंदर्याचें भाडें पुढें करून भीक मागत गेली. ती भिकारीण म्हणते, " मी सन्यासिनी आहे. माझी कुठ आसक्ति नाहीं. माझ्या मनात कुणाविषयी काम नाही. मी विरक्त आहे." तो देखावा बघता बघता तारेनें आपले डोळे पुसले. तिला बघवेना.

" तारे, काय झाल ? " मैत्रिणीनें विचारलें.

" मग सागेन." ती म्हणाली.

बोलपट पाहून परत जाताना तारा म्हणाली, " मीहि एका काळीं मूल पाठीशीं बाधून गाणीं गात भीक मागत होतें. मला सवय नव्हती. परतु करीत

होतें प्रयोग एके दिवशी एका तरुणान मला असच बोलावल. 'भिकारीण म्हणजे काय वेश्या?' अस मी त्याला म्हटलें 'भिकारी असून पुन्हा शिरजोर? भिकाऱ्याला कसली अब्रू!' अस तो म्हणाला. मी त्याला म्हटल 'माडया-महालात राहणाऱ्या श्रीमत माकडाना अब्रू असते वाटत?' त्या दिवसापासून भीक मागण मीं सोडल अब्रूवर घाला यायचा अशी भीति वाटली भारतीय स्त्रियाच्या दुर्दशेला सीमा नाही भोग्य वस्तु यापलीकडे त्याच्याकडे कोणी बघत नाही"

"तारे, किती तुझे अनुभव, किती तू कष्ट भोगलेस?" मैत्रीण म्हणाली.

तारेची सेविका व सूतिका-परीक्षा झाली. ती उत्कृष्ट तऱ्हेनें पास झाली. सेवासदनाच्या सूतिकागृहात ती काम करू लागली उत्कृष्ट सूतिका म्हणून तिची कीर्ति पसरली ताराबाईला मोठ्यामाठ्याकडून बोलावणें येई. परतु तिला गर्व झाला नाही

सेवासदनाची कीर्ति पसरत होती स्त्रियानी चालविलेल्या या सस्थेच्या शाखा अनेक ठिकाणी सुरू झाल्या होत्या. सस्थेला आणखी एका ठिकाणी शाखा काढण्याविषयी विनति करण्यात आली होती. सुंदरपुरच्या एका व्यापाऱ्यानें सेवासदनास दहा हजार रुपये तेथें शाखा निघेल तर देण्याचें कबूल केलें होतें. सेवासदनाचें व्यवस्थापकमडळ विचार करीत होतें. सुदरपुरला शाखा काढण्याचें ठरलें जेथें नवीन शाखा सुरू करावयाची, तेथें आरभीं तरी फार चागलीं माणसें हवीत. जनतेचें प्रेम ओढून घेतील, सेवेनें सर्वांस चटका लावतील अशी प्राणवान माणसें असावी लागतात. ताराबाईने सुदरपुरला जावें असें सर्वांचे मत पडलें. तिनेहि नाकारलें नाहीं. ती सस्थेशीं एकजीव झाली होती सस्थेचें वैभव तें तिचें वैभव होतें.

सुदरपुरला मुलींची सुदर शाळा सेवासदनानें सुरू केली. दुपारीं प्रौढ भगिनींसाठीं वर्ग असत. ताराबाई शाळेंतहि शिकवी. प्रौढ भगिनींसहि धडे देई ती भगिनींशीं बोले, त्याच्या सुखदुःखाची सहज विचारपूस करी. कधीं कोणाच्या घरीं मूलबाळ आजारी असलें तर जाई. स्त्रियाची प्रकृति पाही. उत्कृष्ट सूतिका म्हणून तिची कीर्ति आसमतात पसरली. वाटेल तेव्हा जाई, वाटेल त्याच्याकडे जाई. एकदा एका हरिजन भगिनीकडेहि ती गेली होती. तिला भेदभाव माहीत नव्हता. एका मुसलमान भगिनीचीहि

तिनें सुटका केली होती त्याचा परिणाम असा झाला, कीं त्या मुसलमान घरातील दोन मुली सेवासदनात शिकायला येऊ लागल्या हरिजन मुलीहि शिकायला येत. ताराबाई स्त्रियाना कधी कधी व्याख्यानें देई व हें भेदभावाचें भूत दूर करण्यास सांगे. काहीं सनातनी नावें ठेवीत. परतु एका सनातन्या-कडे ताराबाईला बोलावण्यात आले ती गेली. तिचा प्रेमळ स्वभाव पाहून तो सनातनीहि बदलून गेला !

सुदरपुरचें सेवासदन लोकप्रिय झालें निरनिराळ्या वेळी लोक सस्थेस देणग्या देत ताराबाई मेळे करी मुलींचे सुदर सवाद ती रची तिला पेटी येत होती. गाण्याची थोडी माहिती होती. मेळ्यातील सवाद मोठे मार्मिक असत. मेळ्यामुळें सस्थेचा प्रचार होई, नवविचाराचा प्रसार होई व सस्थेस आर्थिक मदतहि मिळे.

सेवासदन बालसवर्धनदिन साजरा करी. चागल्या वाढलेल्या मुलास बक्षिसे देण्यात येत. एकदा अशाच एका समारभाच्या वेळेस ताराबाईनें फारच सुदर विचार प्रकट केले होते ती म्हणाली, “ सूतिकेच सेवाकर्म करताना माझी कोणती वृत्ति असते ? त्या वेळेस अत्यत पवित्र व हळुवार भावना माझ्या मनात येतात जन्माला येणार नवीन मूल म्हणजे देवाचा नवीन सदेश, देवाची मानवासबधीची थोर आशा, मनुष्यजातीला देव अद्याप कटाळला नाहीं. अजून मनुष्यजातीला उज्ज्वल भविष्य आहे याची ती खूण. पुरुष स[illegible]र-तील, स्त्रिया सुधारतील, मानवजात सुधारेल अस ईश्वराला वाटत अ[illegible]त, म्हणून तो हीं मुल पाठवतो. ही त्याची आशापत्र. मुल म्हणजे ससाराची शोभा. जगात थोडी फार सहानुभूति, थोडी फार प्रेमवृत्ति आहे ती मुलामुळ आहे. मुलाना पाहून पाषाण पाझरतात, मारेकरीहि मृदु बनतात. मुलं नसतील तर सारा ससार भयाण होईल. म्हणून मुलाच सगोपन करा. त्याना रडवू नका. अविचारान मारूं नका. मुलाना वाढवण साध कर्म नाहीं. तें अत्यत कुशलतेचं कर्म आहे. लहानपणी मुल आईबापाचा निष्ठुरपणा अनुभव-तील तर तीहि पुढ निष्ठुर होतील. परतु आपल्या या गरीब देशात मुलाची फार आबाळ होते. देशाचें दारिद्र्यहि त्याला कारण आहे. गरिबाच्या मुलाना गटाराशेजारी वाढाव लागत. समाजातली ही विषमता गेली पाहिजे. विकासाला

अनुकूलता सर्व मुलाना मिळाली पाहिजे. स्वराज्याशिवाय—कोट्यवधि गोरगरिबाच्या स्वराज्याशिवाय—या गोष्टी होणार नाहीत.”

ताराबाई किती सुदर बोले! लोकाना वाटे, सुदर विचार तिला सुचतात कसे! परतु पुण्याला असताना तारेनें खूप वाचले होतें तिनें वेळ कधी फुकट दवडला नाही व्याख्यानाचीं ती टिपणें घेई कोणाचें व्याख्यान सेवासदनात असलें म्हणजे पेन्सिल कागद घेऊन ती तयार असे वर्तमानपत्रें, मासिकें यातील लेख व व्याख्यानें ती वाची अनुभवाच्या शाळेंत ती शिकलेली होतीच. अनुभवाच्या जोडीला वाचनहि तिनें केलें.

आपलें सेवाकर्म साभाळून सुदरपुरच्या स्त्रियात तिनें एक प्रकारची जागृति निर्माण केली सुखी व श्रीमत भगिनींकडून कधी कधी लहान मुलाचे जुने कपडे ती जमवी ते कपडे घेऊन ती गरिबाच्या वस्तीत जाई त्याच्या मुलामुलींच्या अगावर ते कपडे ती चढवी. तारेला खूप आनद होई. गरीब माता “ती माय आली’ असें तारेला पाहून आनदानें म्हणत. गरिबाचीं मुले ‘वो माय वो माय’ करून तिच्याभोंवती जमत कोणी आजारी असलें तर तिनें औषध द्यावें, त्याच्या चद्रमौळी घरात शिरून आजाऱ्याला पाहावे असें तारा करी.

तारेला आता जीवनात आनद वाटू लागला तिचा दिवस केव्हाच निघून जाई. रात्रीं अथरुणावर एखादे सुदर पुस्तक वाचीत पडे व झोपी जाई. तिच्या खोलीत तसबिरी नव्हत्या, काही नव्हते. तिनें एक स्वच्छ मेणबत्ती खोलींतील टेबलावर ठेवली होती. सकाळीं व रात्रीं त्या मेणबत्तीला ती प्रणाम करी. मेणबत्ती तिचा देव होता. जेव्हा कोणी तिला विचारलें, ‘ही मेणबत्ती येथें कशाला?’ तेव्हा ती म्हणाली, ‘हे माझे ध्येय. स्वतः वितळावें, जळावें, झिजावें व जो थोडा थोडा प्रकाश, जो आनद, जी थोडी आशा जगाला देता येईल ती द्यावी.’

---

# फुलगांव

१

आनंदीला माहेराहून घेऊन आल्यानंतर भाऊराव थोड्याच दिवसांनी सुंदरपुर सोडून फुलगावला राहावयास गेले होते मनोहरहि त्यांच्या बरोबर होता. बाळ आनंद सर्वांचें प्रीतिस्थान झाला होता. भाऊरावाचा जणू पुनर्जन्म झाला त्याच्या जीवनात क्रांति झाली त्याचे विचार बदलले, आचार बदलले, जीवनाकडे पाहण्याची त्याची दृष्टि बदलली

सुंदरपुर सोडताना त्यांच्या मित्रांनीं त्याना विरोध केला. "ध्येयवाद ध्येयवाद म्हणून शेवटीं फसाल. अपेक्षेप्रमाणें यश येणार नाही खेड्यात तुम्हास करमणार नाही. तेथें ना टेनिस, ना सिनेमा, ना व्याख्यान ना प्रवचन, ना वाचनालय, ना ग्रंथालय, ना नीट रस्ते, ना नीट आरोग्य, ना उत्साह, ना आनंद. वाटलें तर दोन महिने खेड्यात जाऊन रहावें. परंतु कायमचें राहणें बरें नव्हे. येथील सर्व संसार मोडूं नका, घरदार विकू नका." असा अनेकांनी उपदेश केला, परंतु भाऊरावाचें ठरलें तें ठरलें सुंदरपुरचें स्वतःचें राहतें घर त्यांनीं विकून टाकलें. उगीच शहरात पुन्हा येण्याचा मोह नको. काही उंची सामान त्यांनीं विकलें. साधा संसार बरोबर घेऊन ते फुलगावला आले.

फुलगाव काही फार मोठें गाव नव्हते ५०० लोकाची वस्ती असेल. त्या गावी भाऊरावाचा एक सुदर मळा होता. मळ्यात भरपूर पाण्याची विहीर होती त्या मळ्यातच एक लहानसा बगला होता भाऊराव तेथे राहू लागले. गावात राहावयास आल्यावर एक दिवशी भाऊरावानीं रात्री गावकऱ्याची सभा बोलावली जाणती मडळी सारी जमली होती. काहीं स्त्रियाहि आल्या होत्या त्या सभेंत भाऊरावानी आपल्या मनातील विचार बोलून दाखविले. ते म्हणाले, " बधुभगिनींनो, आज तुमच्यासमोर तुमचा एक मित्र म्हणून मी उभा आहें. आजपर्यंत मी सावकार होतों. मला पाहताच तुम्ही भीत असा. तुम्हाला आजपर्यंत आम्हीं छळले. परंतु तें पाप मी अत.पर करणार नाही झालेल्या पापाची होईल ती भरपाई करणार आहे. मी खत-पत सगळी घेऊन आलों आहे हे सारे कागद या मारुती-समोर मी जाळणार आहे. जनतेला छळून बाधलेली सोन्याची लका मारुति जाळून टाकतो. तुमची शेत तुमच्याजवळ राहोत तुम्ही श्रमा, शेत पिकवा व सुखी व्हा. या फुलगावात कोणीहि कर्जबाजारी असू नये निदान माझ तरी ऋण आजपासून कोणी लागत नाही. मी तुम्हा सर्वास मुक्त करीत आहे. गावाबाहेरचा तो लहान मळा, तो आम्हास पुरेसा आहे तिथ तुमच्याप्रमाणें आम्ही राबू, कष्ट करूं. फुलगावात आनद फुलावा, प्रेम फलाव, ऐक्य फुलावं, ज्ञान फुलाव एवढीच माझी इच्छा आहे "

त्या मारुतीसमोर खरोखरच भाऊरावानी त्या कागदाना काडी लाविली ! तो पवित्र होम होता. अशा होमातूनच दिव्य सगीत ससारात निर्माण होऊं शकेल. सगीत निर्माण करण्याचे महान् साधन सगीतप्रिय भाऊरावास सापडलें. त्यागानेंच सगीत येईल. दरिद्री, श्रमजीवी जनतेसाठीं माड्या-महालातील लोक अपरपार त्याग करतील तेव्हाच सगीत येईल. 'माझ्या-शेजारी मरणकाळचे हबरडे फोडले जात असता, माझ्या माडीत मला सगीताचें निर्मळ सुख अनुभवता येणार नाही. शेजारी आग भडकली असता माझ्या घरात शीतळ वारा खात मला राहता येणार नाही.' भाऊराव खऱ्या सगीताच्या प्रसारास लागले. बहुजनसमाजाच्या ससारात सुखसमाधान आणणें म्हणजेच सगीत.

भाऊराव पहाटे उठत काही गोड भक्तिपर पदें म्हणत. नतर गाईचा गोठा ते झाडीत. आजूबाजूस झाडलोट करीत कोठें खणीत, कोठें पाणी लावीत, कधी लाकडें फोडीत दहा-अकरा वाजेपर्यंत ते काम करीत. नतर स्नान करीत स्नानानतर ते देवाची पूजा करीत. नतर जेवण झाल्यावर थोडा वेळ ते झोपत. ती थोडी विश्राति घेतल्यावर एक तास नेमानें चरख्यावर सूत कातीत सूत कातणें झाल्यावर वर्तमानपत्रे वाचीत. एखादें पुस्तक वाचीत सायकाळी पुन्हा दोन तास मळ्यात काम करीत. रात्री जेवण झालें म्हणजे मारुतीच्या देवळात ते जात त्याच्याबरोबर मनोहरहि असे जागा असला तर आनदहि येई देवळात गेल्यावर गावात कोणी आजारी नाही ना, कोणाचें भाडण नाहीं ना झाले, कोणी सकटात नाही ना, ही विचारपूस करीत हें झाल्यावर ते लोकाना काही विचार सागत वा एखादें पुस्तक वाचून दाखवीत. कधीं मनोहर गोष्ट सागे वा प्रवचन देई अनेक गोष्टींवर प्रश्नोत्तररूप चर्चा होई मोठी मौज होई.

भाऊराव सृष्टीच्या सान्निध्यात आपला वेळ घालवीत, तर मनोहर लहान मुलाच्या सहवासात रमून जाई फुलगावला शाळा नव्हती भाऊरावानी एक सुदर शाळा बाधून दिली होती. त्या शाळेच्या बाधकामात मुलानीहि भाग घेतला होता. कोणी विटा नेत, कोणी माती नेत, कोणी काहीं करी. त्या शाळेच्या इमारतीत त्या मुलाचा घाम साडलेला होता. मुलाना त्याचा अभिमान वाटे. 'ही आमची शाळा' असें त्याना म्हणता येई.

मनोहरसारखा गोड शिक्षक त्याना मिळाला होता. त्या मुलाचे भाग्य की मनोहरचें भाग्य ? मुलाची एक तासभर सात्त्विक करमणूक करणें म्हणजे देवाशीं सहकार्य करणें होय असें तो म्हणे. शाळेच्याभोवतीं फुलझाडें लावलेलीं होतीं. ज्या शाळेभोवती फुलबाग नाही ती शाळाच नव्हे. मुलाची मने जेथें फुलवायची असतात, तेथे पवित्र फुलाची सगत हवी, पवित्र फुलाची सृष्टि हवी. मनोहर व शाळेंतील मुलें सकाळी शाळेंत आल्याबरोबर बागेला पाणी घालीत. काहीं मुलें शाळा व शाळेचें आवार झाडून स्वच्छ करीत. बागेला पाणी घालताना मनोहर सुदर सुदर गाणी सागे व मुलें म्हणत. मुलाना काम करताना आनद वाटे. त्याचा उत्साह वाढे. तो त्याना इतिहासातील गोष्टी सागे. देशातील थोर थोर लोकाची चित्रें दाखवून त्याच्या चरित्रकथा सागे.

त्याना लिहावाचावयास शिकवी. उजळणी सागे. मनोहरला सारी मुले 'मन्यादादा' म्हणत. मन्यादादाचा मुलाना कधी कटाळा येत नसे

रविवारीं मन्यादादा व मुले सारे फुलगाव स्वच्छ करीत. मोऱ्यातून साडलेले पाणी गाडींतून भरून नेत व शेतात नेऊन टाकीत. फार घाण असेल तेथे फिनेल टाकण्यात येई. ते साप्ताहिक सफाईचें काम झालें म्हणजे मळयात येऊन सारे आघोळी करीत. तेथे पाण्याचा हौद भरलेला असे. एकमेकाच्या पाठी एकमेक घासून स्वच्छ करीत.

भाऊरावाच्या मळयात केळींचें लोंगर जर पिकले तर मन्यादादा ते शाळेंत घेऊन येई शाळेंतील मुलास तो केळी वाटून देई. आबे पिकले तर शाळेंतील मुलास ते मिळत भाऊराव म्हणत, जसा आनद तशीच तीं मुलें कधीं कधीं मुलें वनभोजनास जात कधी एखादा किल्ला पाहावयास जात, एखादी नदी पाहावयास जात आनदी फराळाचें करून देई. शाळेंतील मुलेंहि घरचें काहा घेत मन्यादादा काला करी व सारी मुलें खात.

मुलाबरोबर नानाप्रकारचे खेळ मन्यादादा खेळे चादणें फुललें असलें म्हणजे मुलें रात्रीं खेळ खेळत मन्यादादा कधी त्याची कवाईत घेई, कधीं लेझीम शिकवी. मुलें खेळून दमली म्हणजे एखादी गमतीची गोष्ट सागून तो त्याना हसवी.

भाऊरावानी पुढें मॅजिक लॅटर्नहि आणला. अनेक प्रकारच्या विषयावर गोष्टीरूप ज्ञान मनोहर तद्द्वारा देई. गावात एक प्रकारचें नवजीवन आलें मुलाबाळाचीं, थोरामोठ्याची मनें फुलू लागली. नवीन दृष्टि येऊ लागली फुलगावच्या लोकाना फुलगावचा अभिमान वाटू लागला. फुलगावचा पुनर्जन्म झाला.

मनोहरच्या ओळखी पुष्कळ होत्या. कधी कधी तो बाहेरचे कार्यकर्ते बोलवी, त्याची व्याख्यानें करवी. आजूबाजूच्या गावच्या लोकानाहि वर्दी देण्यात येत असे. मनोहर मुलें बरोबर घेऊन राष्ट्रीय गाणी गात गात शेजारच्या गावाना दवडी देऊन येत असे. फुलगावची सभा टोलेजग व्हावयाची. मायबहिणीहि सभेला यावयाच्या.

शाळेवर एके दिवशी एका पुढाऱ्याच्या हस्तें तिरंगी झेंडा फडकवण्यात आला. तो पुढारी म्हणाला—

" हा तिरगी झेंडा म्हणजे राष्ट्राची अब्रू या तीन रगात अनत अर्थ आहेत. हा हिरवा रग शेतकऱ्याचा हिरवी गार शेतें, हिरव्या गार बागा हें शेतकऱ्याचे जीवन हा केशरी रग कामगाराचा दुनियेंतील कामगाराचा लाल झेंडा आहे परतु कॉग्रेस कामगाराना शाततेने जा असें सागते लाल रगात शात रग ओतला म्हणजे केशरी रग होतो उरला पाढरा रग तो सर्व पाढरपेशाचा. समाजात कामकरी, शेतकरी व पाढरपेशे तीनच वर्ग असतात. खऱ्या स्वराज्यात हे तीनच वर्ग असतील. पाढरपेशे हे समाजाची सेवा करतील व त्यानाहि समाज साभाळील कोणी म्हणतात, हिरवा रग मुसलमान धर्माचा, केशरी रग शीखाचा व पाढरा रग हिंदु धर्माचा, परतु धार्मिक दृष्ट्या असे भेद करणें मला पसत नाही ते काही असो. भारतातील कोट्यवधि जनतेचें हें ऐक्यचिन्ह आहे. ज्या शाळेंतून उद्याची पिढी तयार व्हावयाची, त्या शाळेवर तरी हें ऐक्यचिन्ह आ ी हवें हें लहानसें फडकें तुमच्याजवळ किती तरी बोलेल, तुम्हाला किती तरी स्फूर्ति देईल. शाळेवरचा हा झेंडा कोणी काढून टाकावयास आला तर मरा, परतु काढून देऊ नका. लहान लहान मुलानी पराक्रम केला. ध्रुव बाळ लहान होता, प्रल्हाद लहान होता, चिलया लहान होता, शुकाचार्य लहान होते, शकराचार्य लहान होते, ज्ञानेश्वर लहान होते, रामदास लहान होते, शिवाजी लहान होते, बाजीराव लहान होते, विश्वासराव लहान होते, जनकोजी लहान होते, खुदीराम लहान होते, ज्योतिन्बाबू लहान होते, त्याचेच तुम्ही वारसदार. तुम्ही लहान नाहीं. तुम्ही महान् आहात. उद्या मोठमोठे मिशाळ लोक भिऊन घरी बसतील. परतु मुलें घरीं बसणार नाहीत. ज्या देशातील मुलें घरी बसतील तो देश मेलेला." असें व्याख्यान देऊन व्याख्यात्यानी पुढील गाणें सागितलें.—

मुलामुलींनी लढा अता चालवावा
भारतमातेचा कलंक घालवावा ॥ ध्रु० ॥

लाखों मुलें उठतील
तेव्हा बंध तुटतील
हिंदभूमिचा गौरव वाढवावा ॥ भा० ॥

घरदार आता सोडा
अपुल्या स्वराज्याला जोडा
आपला पराक्रम दुनियेला दाखवावा ॥ भा० ॥

झेंडा खाद्यावर घ्या
मुखी मोक्षगीत गा
येथून तेथून हा देश सारा जागवावा ॥ भा० ॥

मुलाना गाणें ऐकताना व म्हणताना खूप मौज वाटली.

फुलगावात स्वच्छता आली, ऐक्य आले, ज्ञान आलें. राष्ट्रभक्तीहि येऊं लागली. स्वराज्याचा अर्थ कळू लागला. मन्यादादा राज्यकारभाराची हकीकत सागे. शेतकरी आश्चर्यचकित होत. गव्हर्नरसाहेबाच्या बगल्याभोंवतालच्या बागेला नुसते दरसाल एक लाख रुपये द्यावे लागतात ही गोष्ट एक दिवस मनोहर सहज बोलून गेला. शेतकरी म्हणाले, "आमच्या मुलबाळाचीं तोंड सुकताहेत, तिकडे साहेबाच्या बागा फुलत आहेत!"

फुलगावचे रस्ते वाईट होते. परतु भाऊराव व मनोहर याच्या सागण्यानें सारा गाव रस्ते दुरुस्त करावयास उठला. गावातील रस्ते नीट झाले. शहराकडे जाणाऱ्या मुख्य रस्त्यापर्यंतचा भाग त्यानीं चागला केला. आसपासच्या गावाना जाणारे रस्तेहि त्यानी सुधारले. आपणास जो फुरसतीचा वेळ मिळेल तो स्वतः-च्या सभोंवतालची दुनिया सुधारण्यात दवडला पाहिजे. काटे फेकावे, दगड दूर करावे, खळगे बुजवावे, डबकी साफ करावी.

एके दिवशी रात्री मनोहर म्हणाला, "पूर्वी गावचा कारभार पचायती-मार्फत चाले. पच चागले असले तर कारभार नीट चालायचा, परतु माझ्या राज्यातील पंच निराळे आहेत. निरनिराळ्या जातींचे पच निवडायचे असली भानगड माझ्या राज्यात नाही. माझ्या राज्यातील पचाची नाव ऐकाः—गावात प्रेम हव, प्रेम हा पहिला पच. प्रेमाचा रग नसेल तर सार निर्जीव दिसेल. प्रेम म्हणजे पचप्राणातील पहिला प्राण. दुसरा पच ज्ञान. गावात विचार हवा. सर्व प्रकारची माहिती हवी. आधळेपणा नको. दुष्ट

रूढि नकोत. ज्ञानाचा डोळा नसेल तर सारं फुकट. सारे खड्ड्यात पडू. तिसरा पच उद्योग उद्योगी असण म्हणजे पुरुषार्थाच लक्षण 'कराग्रे वसते लक्ष्मीः' अस आपण म्हणतो. ज्याचे हात श्रमतात, त्याच्या हातात सपत्ति असते. गावात उद्योग नसला म्हणजे भाडण होतात. भाडणातून कज्जे-कोर्ट आणि शेवटी सर्वनाश होतो उद्योग हा तिसरा पच स्वच्छता हा चौथा पच. जिवतपणी नरकात राहिल तर मेल्यावर नरकातच राहाल आपल्या आजूबाजूस इवलीहि घाण आपण सहन करता कामा नये. स्वच्छता म्हणजे परमेश्वर. हा चौथा पच झाला पाचवा पच म्हणजे श्रद्धा मगलावर श्रद्धा हवी शेवटी चागलें होईल अशी ज्याला आशा नाहीं त्याच्या हातून प्रयत्न नीट होणार नाहींत. श्रद्धा म्हणजे अमर आशा. श्रद्धा म्हणजे मानवजातीच्या भवितव्या-विषयीं नि:शकता. हे पाच पच आपल्या गावात हवेत आपल्या हृदयात हवेत. जिथ हे पाच पच असतील तिथ प्रसन्नता नादेल. जिथ हे नसतील तिथ चिंता नादेल"

भाऊरावाचे वकील-मित्र कधीं कधीं फुलगावला येत भाऊरावाच्या येण्यामुळें फुलगावचें स्वरूप बदललेलें ते पाहात, परतु तरीहि ते वादविवाद करीतच.

"भाऊराव, कशाला ही यातायात करता? हे सारे पैसे पाण्यात जातील. तुम्हाला वकिली नको होती तर सारी इस्टेट विकून बॅंकेत पैसे ठेवायचे होतेत. इथल्या मातींत पैसे का ओतता? उद्या तुम्हाला जरूर पडली तर कोण देणार आहे दोन दिडक्या?" एक वकील-मित्र म्हणाले.

"जनतेचं हृदय म्हणजे माझी बॅंक. या बॅंकेत ठेवलेल बुडणार नाहीं अशी मला श्रद्धा आहे, आणि तुम्हाला सागू का, जनतेच्या हृदयापेक्षाहि सृष्टीची ही विशाल बॅंक मला फार आवडते सृष्टीच्या बॅंकेंतील सपत्ति मी भरपूर लुटतों. वाऱ्याचा जीवनदायी स्पर्श, प्रातःकाळचे पवित्र रग, सायकाळची सोन्याची लयलूट, ताऱ्याची अनत शाति, झाडाची गोड छाया, फुलाची सुरगी सुगधी सृष्टि, पाखराचें सगीत, गाईगुराच वत्सल हबरण ही माझी बॅंक आहे. परमेश्वराच्या या अनत बॅंकेंत कुणी येतच नाहीं. या बॅंकेंत नुसत आल, की भरपूर मिळत, लगेच ओळख पटते. सकाळ झाली म्हणजे पाखराची गोड किलबिल किती हृदयगम वाटते! पाखर अगदीं उजाडत जसे कलरव काढतात तसे इतर वेळीं काढत नाहीत. सकाळची वेळ म्हणजे रामप्रहर.

सकाळच्या वेळी सर्वत्र विश्वास असतो पारधी, शिकारी याची कल्पना त्या वेळेस पाखराना नसते. पहाटेची पाखराची गोड किलबिल ऐकून माझ्या मनात किती तरी सुदर विचार येतात ! सुदरपुर—सुदरपुरापेक्षा अनत पटींनी मी इथ सुखी आहे." भाऊराव सागावयाचे.

भाऊराव व मनोहर याच्या या चळवळींकडे सरकारी अधिकाऱ्याचें लक्ष जाऊ लागलें भाऊरावाच्या सर्वांशी ओळखी होत्या प्रथम प्रथम फुलगावचा पाटील भीत असे परतु तोहि पुढें निर्भय झाला शाळेवर झेंडा लगला ही गोष्ट जेव्हा सुदरपुरच्या फौजदाराला कळली तेव्हा त्यानें पाटलाना कडक रीतीनें लिहिलें. पाटलानें उत्तर पाठविलें "आम्ही झेंड्यास बदी का करावी ? शहरातून जर झेंडे लावतात, तर इथ का नको ? शिवाय ती खाजगी शाळा आहे मी तिथ ढवळाढवळ का करू ?"

एकदा मामलेदारसाहेब फुलगावला आले होते. ते भाऊरावास म्हणाले, "सरकारविरोधी लोकाचीं व्याख्यान तुम्ही करवता हें बर नाहीं. कॉंग्रेसची चळवळ हितावह होणार नाहीं"

भाऊराव म्हणाले, "शेतकऱ्याच उत्पन्न सरासरी दीड आणा असता शेकडों रुपये पगार घेणाऱ्या खुशालचेंडूस जनतेच हित कळेल, कीं ज्यानीं सर्वस्वाचा त्याग करून अहोरात्र जनतेच्या हिताचा विचार चालवला आहे व त्यासाठीं मरत आहेत, त्याना कळेल ?" भाऊरावाचें तें तेजस्वी उत्तर ऐकून मामलेदार गार झाले.

ते एवढेंच म्हणाले, "भाऊराव, जपून राहा. पुढे दिवस वाईट येणार आहेत."

भाऊराव म्हणाले " भारताच्या भाग्याचे दिवस पुढें येणार आहेत. तुमच्या दृष्टीची मला कींव करावीशी वाटते. माझ्या दृष्टीला भारताच स्वातत्र्य दिसत आहे. कोणी दुःखी नाहीं, अज्ञानी नाही, उपाशी नाहीं, कुठं भाडण नाहीं, क्षुद्र जातीय भेद नाहीत, असा तो दिव्य काळ मला दिसत आहे ! ते दिवस येण्यासाठीं आमच्या जीवनाच खत घालाव लागलं म्हणून काय बिघडल ?"

सरकारी अधिकाऱ्याची फुलगावात भीति वाटेनाशी झाली. फुलगांवचीं

मुलें, फुलगावचे तरुण आजूबाजूलाहि रान पेटवू लागले दिव्यानें दिवा पेटतो. फुलगावचा सुगध सर्वत्र जाऊ लागला.

एकदा फुलगावच्या निर्मळ नावाला काळिमा लावणारी एक गोष्ट झाली. एका शेतकऱ्याने सऱ्याचा नवीन मळा लावला होता. भाऊरावाकडे तें शेत पूर्वी गहाण होतें त्या दिवशी मारुतीसमोर तें शेत मूळ मालकास परत मिळालें होतें. त्या शेतकऱ्याच्या जीवनात अपार उत्साह सचरला सऱ्याचा मळा करण्याचें त्यानें ठरवून त्याप्रमाणें उद्योग सुरू केला. त्या शेतकऱ्याचें हें वाढतें वैभव कोणाला तरी सहन झालें नाही एके दिवशी सकाळी तो शेत-करी मळ्यात जातो तों सारी झाडें तोडून टाकलेली! तो शेतकरी हाय हाय करू लागला. त्याचे आशेचे अकुर तोडले गेले. कोणी केलें तें दुष्ट कृत्य? सारा गाव दुःखी झाला.

रात्री मारुतीसमोर सभा झाली. भाऊराव म्हणाले, "फार वाईट गोष्ट झाली. शेतकऱ्यान प्रेमान लावलेल झाड म्हणजे जणु त्याच मूल ती झाड नाही कापली गेलीं, तर कोमल मुलच जणु कापली गेलीं. ते हात धजले कसे? ज्यानं हें अविचाराच्या भरात कृत्य केल असेल, त्यान क्षमा मागावी. आपण रागाच्या भरात एखाद अनुचित कृत्य करतों, परतु मागाहून आपणास वाईट वाटत. ज्यान हें कृत्य केल, त्यान कबूल करीपर्यंत मी उद्यापासून उपास करणार आहें. मी पाणी पिऊन राहीन."

भाऊरावानी आपला निश्चय बदलला नाहीं. दुसऱ्या दिवशीं शाळेतील मुलानीहि आपण एक दिवस न जेवण्याचें ठरविलें. सर्व गावानें एक दिवस उपवास केला. एक दिवस गेला. दुसरा दिवस गेला. भाऊराव शातपणें पडून होते. "भाऊ, तुमच्यासाठीं मी करू उपास? तुम्ही खात नाहीं, मी कस खाऊ?" आनदानें विचारलें.

" तू लहान आहेस. तू मोठा झालास म्हणजे तुझी वेळ येईल—" भाऊरावानी सागितलें.

"बहुळा गाईबरोबर तिच वासरूहि वाघाकडे गेल. तें का माग राहिल?" आनदानें प्रश्न केला.

" तूं एक दिवस उपास केलास तेवढा पुरे. माझ ऐक." ते म्हणाले.

" भाऊ, तुम्ही तुरुगात गेलेत तर मला नाही नेणार? आईला नाहीं नेणार? मन्यादादा तर म्हणतो, 'मुलामुलींनी लढा आता चालवावा.' तुम्ही तर उपास करू देत नाहीं. उद्या तुरुगातहि येऊ देणार नाहीं!" आनदा म्हणाला.

" तू गाईला पाणी पाज जा. गुलाबाची कळी फुलली का पहा जा." भाऊरावानीं सांगितलें.

" तुम्ही दिसत नाहीं म्हणून गाय चारा खात नाहीं. कळीसुद्धा फुलणार नाहीं " आनदा म्हणाला.

" गाईन चारा नाहीं खाल्ला ? " त्यानी विचारिलें.

" नाहीं, गायसुद्धा खात नाही. आम्ही मात्र खायच! मी नाहीं खाणार जा—" आनदा डोळ्यात पाणी आणून म्हणाला.

इतक्यात मन्यादादा आला. मन्यादादाच्या मुखावर आनद होता. त्यानें काहीं तरी आनदाची वार्ता आणली होती.

" भाऊ जेवत नाहीत आणि मन्यादादा, तूं आपला हसतोस!" आनदा म्हणाला.

" मी दुष्टच आहें." मन्यादादा म्हणाला.

" लहान मुलाना वनभोजनास जाताना उचलून घेणारा तू का दुष्ट ?" भाऊरावानीं विचारिलें.

" भाऊ, ज्यान तीं झाड तोडलीं तो मनुष्य आज रात्रीं मारुतीसमोर कबूल करणार आहे अस कळत. आजची सभा प्रचड होणार आहे." मन्यादादानें वार्ता सांगितली.

" गाईन चारा खाल्ला तर ही गोष्ट खरी. गुलाबाची कळी फुलली तर ही गोष्ट खरी." आनदा म्हणाला.

" जा, गाईला चारा देऊन ये." मन्यादादानें सांगितलें.

आनदा गेला. त्यानें गाईला चारा दिला. तिनें खाल्ला. त्यानें गुलाबाची कळी पाहिली. ती फुलली होती. तो उड्या मारीत आला.

" भाऊ, आज रात्रीं तुमचा उपास सुटेल. आज रात्रीं आपण एकदम जेवू. सभा संपेपर्यंत आम्ही जेवणार नाहीं." असें सांगून आनंदा निघून गेला.

रात्रीं मारुतीच्या पटांगणात अपूर्व सभा झाली. गभीर शांति पसरली होती. मन्यादादा म्हणाला,

" बधुभगिनींनो, ज्या बधूच्या हातून तें अविचाराच कृत्य घडल, तो क्षमा मागणार आहे. आपण त्याला प्रेम देऊ. त्याचा कोणी उपहास करू नका. त्याच मन दुखवू नका आपण सारे चुकणारे आहोंत पुन्हा आपल्या गावात अस न होवो म्हणजे झाल" कोणी ते दुष्ट कृत्य केलें हे पाहण्यासाठी लोक अधीर झाले होते. एक शेतकरी उभा राहिला. तो म्हणाला,

" माझ्या हातानीं मी तें काम केल हरबा पूर्वी बरे वागत परतु तो मळा परत मिळाल्यापासून त्याना मिजास चढली त्यानी माझा अपमान केला. हरबाचा अभिमान उतरविण्यासाठी ते कृत्य मीं केल. लोकाच्या अगावर हरबा ओरडू लागले होते झाड तुटलेली दिसताच ते स्वतः रडू लागले भाऊरावानीं उपास केला. या गावाच भल व्हाव म्हणून हीं देवमाणस झटत आहेत. त्याच चीज करा. गर्व करू नका. मी केल तें वाईट केल. मला पोलिसाच्या ताब्यात दिलत तरीहि हरकत नाहीं"

सभा स्तब्ध होती. हरबा मळेवाला उभा राहिला तो म्हणाला, " मी पोलिसाकडे कशाला जाऊ ? झाल ते झाल, मीहि क्षमा करतों. मला मळा मिळालाच नाहीं असें मानतों"

भाऊराव म्हणाले, " मला आनद होत आहे. हरबाचा उदारपणा पाहून काय बोलाव तें मला कळत नाही. पुन्हा आपल्या गावात अस काहीं करू नका. हरबाना झाड लावण्यासाठी मी पैसे देतों. हरबा ते घेतील अशी मला आशा आहे. मला परका समजू नका. माझ्याजवळ जे थोडे फार पैसे आहेत. ते तुमचेच आहेत. तुमचीच ती ठेव आहे. फुलगावात सत्य व अहिंसा अधिकाधिक येवोत हीच सत्यस्वरूप, प्रेमस्वरूप व ज्ञानस्वरूप परमेश्वराला माझी प्रार्थना आहे."

त्या रात्री भाऊरावानीं उपास सोडला.

" आनदा, पोटभर जेव हो." ते म्हणाले.

" पुन्हा नाही ना तुम्ही उपास करणार ? तुम्ही उपास केलात तर वाईट वाटत. पुन्हा उपास करायचा झाला तर मला सागा." आनदा म्हणाला.

" तासातासाला भूक लागते गुलामाला. म्हणे उपास करीन !" आनदी म्हणाली.

" बघ करीन कीं नाही! मी उपास करीन, फटके खाईन, तुरुगात जाईन, सार करीन." आनदा म्हणाला.

" परवा जरा चापट मारली तर रडलास " आनदी म्हणाली

" आईच्या हातचा मार कुणाला आवडेल? शिपाई मारील तर रडणार नाहीं, पळणार नाही " आनदा म्हणाला

" तें नवीन प्रभातफेरीच गाण केलस रे पाठ ? " मन्यादादानें विचारलें.

" हो! इतर मुलानीसुद्धा तें उतरून घेतल म्हणून दाखवू का भाऊ ? " आनदानें विचारलें.

" आत्ता नको. आधीं जेव." ते म्हणाले.

आनदा म्हणजे एक रत्न होतें. प्रभातफेरीचीं गाणीं तो सागायचा, झेंडा हातीं घ्यावयाचा सारा गाव त्याचें कौतुक करी एवढासा होता परतु घोड्यावर बसायला शिकला होता घोडा त्याला पाडीत नसे गाय त्याला मारीत नसे. मन्यादादाने त्याला पोहायला शिकविलें होते. बेलाशक तो विहिरीत उडी घ्यायचा. भीति त्याला माहीत नव्हती. रात्रो पायात वहाणा कधी घालायचा नाहीं. 'मला कशाला साप चावेल? मी का वाईट आहे?' असें म्हणायचा.

आनदाच्या वर्गात जीवन म्हणून एक मुलगा होता. तो आनदाचा मित्र. जीवन अशक्त होता.

" आई, जीवन अशक्त आहे. तो कशान ग माझ्यासारखा होईल?" एके दिवशीं आनदानें विचारले.

" त्याला गाईच दूध नेऊन दे. मळ्यातील टोमाटो दे." आनदी म्हणाली.

आनदा रोज दूध व टोमाटो जीवनाच्या घरी नेऊन द्यायचा.

" आनदा, जीवनाला देतोस. अन् दुसरी मुल नाहींत का गावात ? " कोणीं त्याला विचारलें.

" सर्वांना दूध कसें पुरेल? सर्वांना टोमाटो कोठून देऊं ? " तो म्हणाला.

" तू तुझ्या वाटणीच दे." ते गृहस्थ म्हणाले

" मी खात नाहीं म्हटल तर आई रडेल, भाऊ रडतील. मन्यादादाला वाईट वाटेल—" आनदा म्हणाला.

फुलगावात आनंद वाढत होता. निर्भयता वाढत होती. प्रेम वाढत होतें.

## आशा-निराशा

## १०

तारा कर्तव्यात चूर असे. विचार करावयास तिला वेळ कोठें असे? परतु एके दिवशीं तिला बाळाची जोरानें आठवण झाली. दुपारच्या प्रौढ भगिनी-वर्गातील एक भगिनी आपला दोनतीन वर्षाचा मुल्गा बरोबर घेऊन आली होती. तो मुल्गा तेथें गडबड करीत होता. त्याच्या आईनें त्याला चापट मारली. तो रडू लागला.

"रडवतेस कशाला त्याला?" तारा बोलली.

"फार छळतो हो. जरा दुसऱ्याजवळ रहात नाहीं. सारखी आई हवी." ती भगिनी म्हणाली.

"आईशिवाय कोण आहे मुलाला? नाहींच इलाज तर मग मूल दुसऱ्या-जवळ जाईल. परतु तिथहि आईसाठी झुरेल." तारा म्हणाली.

"पुष्कळ मुल आईपासून दूर राहतात, साहेबाच्या मुलाना दायाच फिर-वीत असतात." ती म्हणाली.

तारेच्या डोळ्यात पाणी आलें. 'आपला बाळहि आईशिवाय राहिला असेल का! त्यानें टाहो फोडून प्राण तर नसेल्ना सोडला? त्या तरुणानें आईची

वत्सलता माझ्या मुलास दिली असेल का? माझा बाळ, कोठें असेल तो? त्या दिवशी असच मी त्याला मारल होत. आणि त्याच रात्रीं त्याग केला. माझ्यासारखी दुष्ट माता असेल का जगात?"

तारेला तो विचाराचा, भावनाचा बोजा सहन झाला नाहीं. ती आपल्या खोलीत जाऊन पोटभर रडली. सारा भूतकाळ एका क्षणात समोर उभा राहिला. सात आठ वर्षांत स्मृतिसागराला एवढी भरती आली नव्हती. किती तरी प्रसग, किती तरी व्यक्ति, किती तरी स्मृति!

तो दिवस खिन्नतेतच गेला. परतु पुन्हा दैनदिन सेवाकर्म सुरू झालें. सूर्याला एखादे वेळेस ढग झाकोळतात नेहमी नाही एके दिवशी सेवासदनाच्या दाराशी अकस्मात् एक गाडी थाबली. तीतून एक तरुण खालीं उतरला. बैल सोडून तो आत कचेरीत गेला तेथें एक भगिनी बसलेली होती.

"काय काम आहे, कोण पाहिजे?" तिनें विचारिलें

"ताराबाई म्हणून सूतिका आहेत ना? त्याना बोलवावयास मी आलों आहे" तो म्हणाला

"मीच ताराबाई. कुठ जायचय्?" तिनें विचारिलें.

"एका खेड्यावर. एका शेतकऱ्याची सून अडली आहे. तुम्ही याल तर फार उपकार होतील. मी गाडी घेऊन आलों आहे. पुन्हा तुम्हाला पोंचवून देईन" तो तरुण म्हणाला.

"बर. येतें हा." असें म्हणून ती आत गेली.

इतर भगिनींस सागून आपली बॅग घेऊन तारा निघाली. त्या तरुणानें गाडी जुपली. बैल पळतच सुटले. जणू त्यानाहि कठिण प्रसग समजला होता. शेतकऱ्याची दया बैलाना येणार नाही तर कोणाला? शेतकऱ्याचें दुःख माणसाना कळत नाही; परतु त्याच्या मुक्या पशूना तें कळतें.

"गावाच नाव काय?" तारेनें विचारिलें.

"फुलगाव." तरुण म्हणाला.

"फुलगावची कीर्ति ऐकली आहे. तिथ भाऊराव म्हणून वकील राहतात. त्यानीं मध्यतरी उपास केला होता. होय ना? तेंच ना फुलगाव?" तिनें विचारिलें.

"होय." तो म्हणाला.

"तें गाव पहाव म्हणून कितीदा मनात आलं होत. परतु आज हा योग आला. त्या फुलगावला आणखी एक तरुण राहतात. मुल घेऊन ते प्रभात-फेऱ्या काढतात. आसपासच्या खेड्यातून जातात, दर रविवारी गावसफाई करतात. बर त्याच काय नाव ?" तिने विचारिले

"त्याच नाव मनोहर" तो म्हणाला

"त्याचा काय आश्रम आहे ?" तिनें विचारिलें

"ते भाऊरावाकडेच राहतात" तो म्हणाला.

"भाऊरावाच्या जीवनात त्या तरुणानच क्राति केली अस सुदरपूरचे लोक म्हणत असतात. भाऊरावानीं सारी स्वतपत्र जाळली ही गोष्ट खरी का हो ?" तिनें प्रश्न केला.

"हो, अक्षरशः खरी." त्यानें सागितलें.

गाडी वेगानें जात होती. वाटेंत एक नाला होता बैल पाणी पिऊं लागले. त्या तरुणानें गाडी थाबविली. इतक्यात समोरून दोन वाटसरू येत होते. त्यानीं त्या तरुणाला भक्तीनें प्रणाम केला.

"काय मन्यादादा, इकड कुठ ?" त्यातील एकानें प्रश्न केला

"ज्योतिबाची सून अडली आहे, याना त्यासाठी घेऊन जातों आहें." मनोहर म्हणाल

"आम्हा गरिबासाठीं तुमचा जन्म ! आमच्या गावीं या याख्यान द्यायला. जरा पेटवा कीं। आमच बी गाव." दुसरा म्हणाला.

"तुमच्या गावाच नाव ?" मनोहरनें विचारलें

"चादणें." त्यानें सागितलें.

"चादण्याला तर आलों होतों. चादणे गावात प्रकाश असला पाहिजे. बर. पुन्हा येईन. आता गर्दी आहे." मनोहर म्हणाला.

गाडी जोरानें निघाली. तारा गाडी हाकलणाराकडे पहात राहिली. 'हाच तो तरुण भाऊरावाच्या जीवनात क्राति करणारा असला पाहिजे' असें तिनें आता ओळखलें. त्या शेतकऱ्यानीं मन्यादादा म्हणून हाक मारली. यानीं मघा त्या तरुणाचें नाव मनोहर असें सागितलें. मनोहर व मन्यादादा एकच असणार.' ती मनात म्हणाली.

"तुम्हीच। मनोहर ना ? भाऊरावाकडचे मनोहर ?" तिनें विचारलें.

"होय." तो म्हणाला.

"तुम्हाला मी कुठ तरी पाहिल होत." ती म्हणाली.

"कुठून पाहणार? कदाचित् सुंदरपूरला कधीं पाह्यल असेल." तो म्हणाला.

"नाही, पुष्कळ वर्षांपूर्वी पाहिल होत. पाहू द्या तुमच्याकडे नीट!" ती कंपित स्वराने म्हणाली

मनोहरनें तारेकडे पाहिले

"तुम्हीच ते. तुम्हीच ते. तुम्ही का एकटे आहात?" तिने विचारलें.

"हो" तो म्हणाला

"मला पाहिल्याच तुम्हाला नाही आठवत?" तिनें विचारलें.

"कस नाहीं आठवणार?" तो म्हणाला.

"माझा बाळ आहे ना?" तिने एकदम मनोहरचा हात धरून विचारलें.

"आहे." तो म्हणाला.

"मला भेटेल?" तिनें विचारलें.

"हो." तो म्हणाला

तारेचे डोळे चमकले. फुलगावात तिच्या जीवनाचें फूल फुलत होतें. फुलगाव केव्हा येईल असें तिला झालें. 'बाळ आठ नऊ वर्षांचा झाला असेल. मोठा झाला असेल, कसा दिसत असेल छान? परतु तो मला ओळखणार नाहीं. दुष्ट मातेला त्यानें का ओळखावें? मला आधीं कळतें तर त्याला मी खाऊ आणला असता. आता काय देऊं? त्याला जवळ घेता येईल का, त्याच्या पाठीवरून हात फिरवता येईल? तो राहील का माझ्याजवळ उभा!' तारा विचारात तल्लीन होती

फुलगाव आलें. ज्योतिबा दारात उभेच होते.

"कस आहे ज्योतिबा?" मनोहरनें विचारिलें.

"चला लौकर. वाट पहात आहेोत." तो वृद्ध शेतकरी म्हणाला.

ज्योतिबाचे घरापाशी गाडी आली. ताराबाई उतरली. आनदी तेथें होती. तिने ताराबाईस आत नेलें भाऊराव तेथे ओटीवर होते. दुसरीहि काहीं मंडळी सचिंत बसली होती.

"ताराबाई आल्या, आता धोका नाही. त्याच्या हाताला यश आहे." भाऊराव म्हणाले.

" पोरीला फार वेदना. माझ्या म्हाताऱ्याच्या नशिबात काय असेल तें खर ज्योतिबा बोलले.

इतक्यात आनद तेथें आला

" आनदा, इथ कशाला आलास? इथ गडबड नाही करायची ह!" भाऊ-रावानी सागितले

" आई इथ आहे?" आनदानें विचारिलें

" हो आत आहे. तू घरी जा" भाऊराव म्हणाले

" तुम्हीपण चला ना? आईला राहू दे इथ आई येईल मागून. चला चला.' आनद हात धरून ओढू लागला

" थाब रे! मार हवा का?" भाऊरावानी रागानें विचारलें

" मारा तर खरे. मग आई आतून धावून येऊन तुम्हाला मारील!" आनदा म्हणाला

सर्वांना हसू आलें. आता बाहेर सध्याकाळ होऊ लागली. गाईगुराची वेळ झाली. गाव गजबजू लागला. घरात दिवे लागले मनोहरने एक स्वच्छ कंदील लावून दिला दिवा पाहून सर्वांनी नमस्कार केला.

" आनदा, नमस्कार कर दिव्याला." भाऊराव म्हणाले.

" का?" त्यानें विचारिलें.

" दिवा प्रकाश देतो" ते म्हणाले

" मला नाहीं आवडत प्रकाश. रात्र झाली की मी आईजवळ झोंपतों. सकाळीं उजाडल कीं आई उठून जाते ती म्हणते, 'तो बघ प्रकाश, ऊठ.' मला राग येतो त्या प्रकाशाचा सारखी रात्रच राहील तर आईच्याजवळ झोंपता येईल." आनदा म्हणाला.

"तूं काय अजून आईजवळ झोंपतोस?" ज्योतिबानी विचारिलें

" मग कुठ झोपू? आईचा हात अगावर नसेल तर मला झोंप येत नाहीं! मी का भाऊएवढा मोठा आहे? मिशा आल्या म्हणजे माणस एकटीं निज-तात." आनदा म्हणाला.

" तुझा जीवन तर एकटा निजतो!" मन्यादादा बोलला.

" जीवनचे भाऊ लहान आहेत मग तो काय करील?" आनंदा म्हणाला.

इतक्यात आनदीबाई घरातून बाहेर आली.

" सुटली हो मुलगा झाला ! " ती म्हणाली
" देवाची दया ! " ज्योतिबा म्हणाला.
" आई चल." आनदा म्हणाला
" थाब. त्या दुसऱ्या आई येत आहेत." आनदी म्हणाली.
" दुसऱ्या आई ? " आनदानें प्रश्न केला
" हो ! अनेक मुलाच्या आई, अनेक मायलेंकराच्या आई " आनदी म्हणाली.
ताराबाई बाहेर आली
" चला आमच्याकडे आता बाहेर अधार पडला आहे. सकाळीं जा." आनदी म्हणाली
" भाऊराव, तुम्ही याच सार पहा " ज्योतिबा म्हणाला.
" हो काळजी नको " भाऊराव म्हणाले
भाऊराव, मन्यादादा, आनदी, आनद व तारा सारी मळ्यातल्या घरात आली
" तुम्ही आधी स्नान घ्या करून. पाणी तापल आहे." आनदी म्हणाली
" आई, भूक लागली आहे " आनदा म्हणाला
" मी पटकन् करते हो स्वयपाक " आनदीनें त्याच्या पाठीवरून हात फिरवीत सागितलें.
" मन्यादादा, तू गोष्ट तरी साग रे एक गमतीची ! " आनद म्हणाला.
" रोज रे कुठल्या नवीन गोष्टी ? " मनोहर म्हणाला.
" रोज नवीन फुल फुलतात रोज गाय नवीन दूध देते. रोज आई नवीन जेवण करते. रोज नवीन गोष्ट हवी शिळ खाऊ नये अस तूच ना सागतोस ? " आनदा म्हणाला.
" त्या नवीन आई आल्या आहेत, त्याना गोष्ट सागायला साग." मनोहर म्हणाला.
" त्या सागतील ? " आनदानें विचारलें.
" हो." मनोहर हसत म्हणाला
तारेनें स्नान केलें. आनदीताईनें खादीचें पातळ नेसावयास दिलें होतें. तारा लुगडें धुवूं लागली " लुगड राहू दे गोपाळ धुवील दमलात तुम्ही, बसा आता." आनदी म्हणाली.

अगणातील खाटेवर तारा बसली.

" तुम्ही गोष्ट सागता ? " आनदा तारेजवळ जाऊन म्हणाला.

" कोणती सागू गोष्ट तुला ? ये इकड " तारेने आनदाला जवळ घेतलें

भाऊराव घरात गेले होते मन्यादादा तेथें नव्हता आनद व तारा दोघेच तेथें होती तारा त्याच्या डोक्यावरून सारखा हात फिरवीत होती. तिच्या डोळ्यातून पाणी आलें व आनदाच्या अगावर तें पडलें

" हें काय, पाणी कसल ? " त्याने विचारले

" माझे डोळे की नाही दुखरे आहेत त्यातून पाणी गळत रात्री " तारेनें सागितलें.

" आमच्या गाईच्या डोळ्यातूनसुद्धा कधीं कधी पाणी येत मला वाटत की गाय रडते परतु मन्यादादा म्हणाला, अस येत एखादे वेळेस पाणी. भाऊच्या उपासाच्या वेळीं गाय चारा खाईना. पाणीसुद्धा थोड पिई खरच, हें काय, तुम्ही बोलतच नाही सागा ना गोष्ट " आनदा म्हणाला

" माझ्या माडीवर बसशील तर सागेन " तारा म्हणाली.

" मी का लहान आहे ? तुमची माडी दुखेल मी परवा आईला म्हटल 'घे ग मला कडेवर', आईला घेता येईना, आईची फजिती झाली. मी अगदीं तुमच्याजवळ बसेन म्हणजे झाल " आनदा म्हणाला.

" बरं. सागतें गोष्ट. एक होती आई तिला होता एक मुलगा. त्या आईला सर्वांनीं हाकलून दिलं आपला लहान मुलगा घेऊन ती आई जगभर भटके. गाणीं गाई, भीक मागे. एकदा ती आगगाडीतून जात होती डब्यात खूप गर्दी होती. तिला बसायला जागा कोणी देईना ती आई रडायला लागली, इतक्यात त्या डब्यातील एक तरुण उठला व म्हणाला, 'बाई इकडे या, निजवा इथ मुलाला. मी उभा राहीन.' त्या तरुणाच्या अगावर खादी होती. त्या आईन मुलाला माडीवर निजविल. गाडींतील गर्दी कमी झाली त्या तरुणान आपली घोंगडी पसरली. घोंगडीवर त्या मुलाला आईन ठेवल. तो तरुणहि झोपला. गाडींतली सारी मडळी झोंपली. ती आई उठली. ती खिडकींतून उडी टाकू बघत होती. तिला उडी टाकवेना. एका स्टेशनवर ती एकटीच खालीं उतरली. काळोखात एकटीच निघून गेली. ती रानावनात भटके. 'माझा बाळ सुखी राहो' अस तोंडान

म्हणत असे. पुढें पुष्कळ वर्षे गेली त्या तरुणाची अन् त्या आईची पुन्हा गाठ पडली तो मुलगा मोठा झाला होता तुझ्याएवढा झाला हाता आईनं त्याला पोटाशीं धरल आईन त्याला ओळखल परतु बाळ ओळखीना तिन त्याला विचारल, 'बाळ येतोस माझ्याबरोबर ? मी तुझी आई, खरीखुरी आई' बाळ म्हणाला 'खोटीखोटी आई माझी खरी आई घरात आहे. तुम्ही खोटी खोटी आई.' मुलाचे ते शब्द ऐकून त्या आईला वाईट वाटल. ती म्हणाली, 'जन्म देणारी आई खरी नव्हे. जिन वाढवल तीच खरी आई. ती जन्म देणारी आई निघून गेली ती वेडी झाली ती नदीकाठचे दगड घेते, त्याना माडीवर थोपटते ती फुलें तोडते. त्याना पायावर घालते व ओव्या म्हणते ती वेडी झाली आहे"

"आनदा, चल रे जेवायला. त्यानाहि घेऊन ये" आनदी घरातून म्हणाली.

"चला तुमचा मी हात धरतो पण ही खरी आहे काहो गोष्ट? आगगाडीतून ती आई का उतरली ? तें मूल का वाईट होत?" आनदा विचारू लागला.

"मुल सुदर होत तुझ्यासारखे त्याचे डोळे होते तुझ्यासारखा तो गोरा गोरा होता. परतु वेडी होती त्याची आई. वेडाच्या भरात काही तरी करी." तारा म्हणाली

"पण मीं माझ्या आईला ओळखल असत. शभर वर्षांनी माझी आई आली तरी मी ओळखीन एकदा आम्ही गमत केली. मी डोळे मिटून निजलों होतों. मन्यादादा, भाऊ, जीवन, जीवनची आई, गोपाळ, ती पार्वती, सारी माझ्या पाठीला हात लावून जात. आईचा हात मी ओळखायचा अस ठरलं होतं. आईन हातातल्या बागड्या सुद्धा काढून ठेवल्या होत्या परतु आईचा हात मीं नेमका ओळखला सर्वांना आश्चर्य वाटल विचारा आईला. आई नाही का ग ?" आनदानें आनदीताईस विचारिलें

"हो हो. आता पुरे कर बडबड. जेव. भूक ना लागली आहे ?" आनदी म्हणाली.

सर्व मंडळी जेवू लागली.

"तुमच्याविषयी पुष्कळ ऐकल होत. मध्यें सुदरपूरची वकील मडळी आली होती. त्यानी तुमची स्तुति केली. तुम्ही खेड्यात याल की नाहीं अस वाटत होत." भाऊराव म्हणाले.

" तुम्ही खेड्यासाठी सर्व जीवन देत आहात. आम्ही एखादे वेळेसहि का येऊ नये ? तुमच्यामुळें आम्हाला स्फूर्ति येते. ज्याच्या त्याच्या तोंडी तुमच नाव आहे " तारा म्हणाली.

" माझे शहरातले मित्र मला वेडा म्हणतात." भाऊराव म्हणाले

" भाऊ, यानी मघाशी वेड्या आईची गोष्ट मला सांगितली मुलाला सोडून आई जाईल का हो कधी ? खर असेल का हो भाऊ हे ?" आनदानें विचारिलें.

" मन्यादादाला विचार." भाऊ म्हणाले

" मन्यादादा आज मुळी बोलतच नाही त्यान एकसुद्धा गोष्ट सागितली नाही." आनदा म्हणाला

" मन्यादादाच आज पोट दुखत आहे." आनदी म्हणाली.

" मग या बर करतील ! बायकाचें पोट दुखल तर मुलगा होतो पुरुषाच दुखल तर गोष्ट मिळेल ! " आनदा म्हणाला.

" गोष्ट लिहिताना, कविता लिहिताना खरच पोट दुखत पोटदुखीशिवाय खरी प्रसूति नाहीं." तारा म्हणाली

" प्रसूति म्हणजे ? " आनदानें विचारलें

" प्रसूति म्हणजे बाळत होण ! " भाऊराव म्हणाले

" मन्यादादा बाळत होईल त्याला मग एक गोष्ट होईल." हसत आनदा म्हणाला.

" थोडी घ्या ना पोळी ! सकोच नका करू." आनदी तारेला म्हणाली.

" तुमच घर म्हणजे सर्वांचं घर. इथ कोण कशाला सकोच करील ? " तारा म्हणाली.

" त्याच्याकडे काय बघतोस ? घास घे." मन्यादादा म्हणाला.

" बोलला मन्यादादा. आई, त्याच्या कपाळाला कुकू नाही आग धुतल्या-नंतर लावायला विसरल्या ! मी गध नाही लावल तर भाऊ रागावतात. मला नाहीं आवडत गध. तुम्हाला कुंकू आवडत नाहीं वाटत ? चिकट चिकट कुंकू ! " आनदानें विचारलें.

" काहीं तरी विचारशील. वेडबघू आहे नुसता." आनदी म्हणाली.

" असू दे जा. आज मी तुझ्याजवळ निजणारच नाही. आज याच्याजवळ निजेन." आनदा म्हणाला

" माझ्या लाथा चुकल्या!" आनदी म्हणाली.

" जरा लोळलों तर म्हणे लाथा चुकल्या! मी मुळीं बोलतच नाहीं." आनदा फुरगटून म्हणाला. जेवणे झाली. आनदीचेंहि जेवण झालें.

" तू मग याच्याजवळ निजणार ना रे?" आनदीनें आनदास विचारलें.

" पण मी जवळ नसलें म्हणजे तुला झोंप येणार नाहीं! त्या दिवशीं मी लोळत जरा दूर गेलों तर कशी शोधीत होतीस? मला ओढून जवळ घेतलस! आहे का आठवण?" आनदा हसून बोलला.

" चावट आहे साग काय ते." आनदीनें विचारलें.

" माझ्या खऱ्या आईजवळ मी निजणार." तो म्हणाला.

'मी त्याच्याजवळ आज निजेन' असें आनदा जेवताना म्हणाला होता म्हणून तारेला अपार आनद झाला होता परतु तिचा तो आनद पार मावळला. भाऊराव व मनोहर अगणात खाटेवर झोंपले. आनदी, आनद व तारा आत झोंपलीं. तारेला झोंप लागेना. ती तळमळत होती.

रात्रीं एकाएकीं आनदा ओरडत जागा झाला, "आई, आई, पोट दुखत ग माझ. आई ऊठ ना." तो आनदीला हलवू लागला. आनदी उठली, तिनें दिवा लावला. त्याचें पोट ती चोळू लागली. परतु पोट राहीना. 'फार दुखत ग!' असें म्हणून तो रडू लागला. ताराहि उठली.

" थाबा. मी लावतें त्याच्या पोटाला. मला माहीत आहे औषध." तारा म्हणाली.

तारा तेल लावू लागली.

" तुझ डोक माझ्या माडीवर ठेव. डोक जरा उच हव. अस्सं." तारेनेंच डोकें उचलून घेतलें. "तू त्याच्याजवळ निजेन म्हणालास आणि निजला नाहींस. म्हणून पोट दुखू लागल—" आनदी म्हणाली.

" आता निजू? नाहीं तर पुन्हा दुखेल. मन्यादादा म्हणतो बोलल्याप्रमाणं कराव—" आनद म्हणाला.

तारा तेल चोळीत होती. तिचें हृदय वात्सल्यानें भरून गेलें होतें. तिच्या

हातात स्नेहसागर उसळला होता वाटीतील तेलाच्या बिंदूत हृदयसिंधु ओतला गेला होता

"बर वाटत का बाळ?" तारेनें विचारले

"हो. पोट दुखायच केव्हाच राह्यल पण मला मजा वाटते म्हणून बोललों नाही. मी तुमच्याजवळ निजू? नाहीतर पुन्हा पोट दुखायच. तुम्ही मन्यादादाच्या पोटाला का नाही लावलत तेल? मोठ्याच आपोआप थाबत असेल, होय ना?" आनदा म्हणाला.

"ये माझ्याजवळ निजायला गार वार सुटला आहे" तारा म्हणाली

"जाऊ आई?" आनदानें विचारलें

"जा, लोळू नकोस ह!" आनदी म्हणाली

मायलेंकरें एका पाघरूणात आली तारेनें आनदाच्या अगावर हात ठेवला त्याला अगदीं जवळ घेतलें आनदाला केव्हाच झोंप लागली. हळुहळू तारेचेहि ओले डोळे मिटून गेले

पहाट झाली थडगार परतु भावनोत्कट उषा आली उषा जगाला उठवायला येते, जगाला चैतन्य द्यावयास येते, परतु गार गार वाटते. पहाटे अगावर पाघरूण घ्यावेसें वाटतें. सृष्टि आपलें काळें पाघरूण दूर करू पहात असते. भाऊराव, मनोहर व आनदी उठलीं मनोहर चरक्यावर सूत कातीत होता. मुखानें रामनाम घेत होता. तारा व आनद झोंपलीं होतीं— गाढ झोंपली होतीं.

मनोहरचें सूत कातणें झालें. त्या मायलेकराना एकत्र पाहून त्यानें हात जोडले. आईचा व बाळाचा — दोघाचे मुखचद्र एकत्र झाले होते. मायलेकराचें तें मधुरमीलन—! जगाला अज्ञात असें मीलन पाहण्यात मनोहर तन्मय झाला होता. इतक्यात तारेला जाग आली. तिनें समोर मनोहर पाहिला. तिनें डोक्यावर पाघरूण घेतलें. बाळाचा मुका घेतला. मनोहर निघून गेला. तारेनें बाळाला पुन्हा एकदा हृदयाशी घट्ट धरलें. शेवटी ती उठली. निजलेल्या आनदाला नीट पाघरूण घालून उठली.

"किती उशीर झाला! इतकी झोंप मला कधीं येत नाहीं—" तारा म्हणाली.

" रात्री पोट चोळताना जागरण झाल शिवाय शीण झालेला—" आनदी म्हणाली.

तारा आता जावयास निघाली ज्योतिबा थोडें दूध घेऊन आले होते. तें कृतज्ञतेचें चिन्ह तारेनें अव्हेरले नाही भावनाची किमत ती ओळखीत असे.

" आनद, तू येतोस रे सुदरपूरला ? तुला खाऊ देईन, चित्राचीं पुस्तक देईन." तारेनें विचारले

" जातोस का रे ?" भाऊरावानी पण विचारलें

" आज नको. तुमचे मेळे करता ना, तेव्हा न्या त्याला." आनदीनें सुचविले.

" खरच तेव्हाच ये बर का रे ?" असें म्हणून तारेनें त्याच्या डोक्यावरून हात फिरविला.

" फुलगावला येत जा मधूनमधून." भाऊराव म्हणाले

" येईन येथून कर्तव्यस्फूर्ति घेऊन जाईन." तारा म्हणाली.

मन्यादादानें गाडी हाकल्ली. सद्गदित तारा पाठीमागे पहात होती. गेलें फुलगाव ! गाडीत कोणी बोलत नव्हतें. तारा मनोहरकडे पहात होती. तारेच्या तोंडावरचे भाव मनोहरला थोडेच दिसत होते ? त्याच्या का पाठीला डोळे होते ? परतु भावनाचे डोळे पुढें मागें सर्वत्र असतात. गाडी जोरात जात होती. मन्यादादाची टोपी खाली पडली. गाडी थाबली. तारेनें एकदम पाठीमागून उडी टाकली. ती पळत गेली व टोपी घेऊन आली. तिनें ती झाडली. आपल्या खिशातील रुमालानें पुसली.

" तुम्ही कशाला उतरलात ?" मनोहर ओशाळून म्हणाला

" मजवर अनत उपकार करणाऱ्याविषयी माझ्या मनात काहींच का भावना नसतील ? मी काय दगड आहे मनोहर ?" तिनें विचारलें.

दोघें पुन्हा गाडीत बसलीं. तारा ती टोपी माडीवर सारखी चाळवीत होती.

" द्या. घालू दे डोक्याला. वाटेंत कोणी ओळखीच भेटत. टोपी नसेल डोक्याला तर त्याना अमगल वाटत." मनोहर म्हणाला.

" पुन्हा पडायची एखादी. असू दे माझ्या हातात. सुदरपूर जवळ आल म्हणजे घाला. तोंपर्यंत माझ्या माडीखालीं ती ठेवतें. म्हणजे जणू इस्त्री होईल!" तारा हसून म्हणाली

"तुम्हाला काय ताप आला आहे?" मनोहरनेंहि हसून विचारलें.

"होय." ती म्हणाली

"पाहू!" मनोहर म्हणाला.

तारेनें हात पुढें केला. मनोहरनें तो पाहिला

"थंडगार आहे हात!" तो म्हणाला.

"त्या हातात उष्णता नाहीं? हात कढत नाहीं लागत तुम्हाला? तुम्ही डॉक्टर नाहीं. मला हें सार समजत. तुम्ही माझ्या नाकाजवळ हात आणाल तर कढत कढत श्वास तुम्हाला भासतील." ती म्हणाली.

मनोहर काहीं बोलला नाहीं. गाडी जात होती. तो बैल पळवीत होता. त्याना मारीत होता.

"कशाला मारता? गरीब बिचारे बैल!" ती म्हणाली.

"त्याना पाठीवर काठी हवी. नाकात वेसण हवी. तरच नीट काम व्हायच--" मनोहर म्हणाला.

"आपल्या मनाच, आपल्या इंद्रियाच असच आहे नाहीं!" तारेनें विचारलें.

"हो." तो म्हणाला.

"मनोहर, गाडी हळू हाका. सुदरपूर येऊच नये अस मला वाटतय. तुम्ही व मी या गाडींतून असेच हिंडत राहूया—" ती म्हणाली.

मनोहर बोलला नाहीं. मध्यें नाला आला. बैल पाणी पिण्यासाठीं थाबले. मनोहरहि खालीं उतरला. ताराहि उतरली. "ती पहा दोन पाखर." तारा म्हणाली.

"आपण माणस आहोंत." मनोहर म्हणाला.

"अहकारी माणस." ती म्हणाली.

"पक्षुपक्ष्यापेक्षा आम्ही थोर आहोंत अस मानण्यात व तस वर्तनात दाखविण्यात कोणता आहे अहकार? मनोहर गभीरपणें म्हणाला.

"थोडावेळ मी हाकलू का गाडी? द्या दोरी माझ्या हातात." तारा म्हणाली.

"कोणी बघेल तर हंसेल." मनोहर म्हणाला.

" तुम्ही हसू नका म्हणजे झाल. गाडी चालवायला शिकवा मला. मी एकटी आहें." ती म्हणाली.

तारा गाडी हाकूं लागली. बैल गाडी भलतीकडे नेऊ लागले.

" आवरा-आवरा, ओढा " मनोहर म्हणाला. तो एकदम पुढें झाला. तारेच्या हातातील दोरी घेऊन त्यानें बैलाना खेंचलें. गाडी रस्त्यावर नीट आली. दोघाचे हात दोरीवर होते दोघें जवळजवळ बसली होती. कोणी बोललें नाहीं. मनोहरनें हळूच आपलें अग जरा दूर केलें.

" आपण एकत्र येऊ. मनोहर दूर का होता ? आपणास देवान एकत्र येण्यासाठी निर्मिल आहे. माझ्या मुलाचे तुम्ही मायबाप झालेत. आता माझे पति व्हा ! मनोहर, आपण खूप सेवा करू. मला भरपूर राबवा. माझ्या हातात व हृदयात अपूर्व शक्ति येईल. माझ्या हृदयात हे विचार तुम्हाला पाहताच जागृत झाले. आगगाडींत तुम्हाला पाहिल त्या वेळेस मनात काही आल. आता सात वर्षे झालीं त्या गोष्टीला. ते सुप्त विकार आज पुन्हा जागृत झाले. ते मेले नव्हते. हृदयात एका बाजूला कोपऱ्यात तेहि वाढत होते. तुम्हाला पाहताच तो न कळत वाढलेला अकुर आज पुन्हा वाढला. बहरला. मनोहर, तुम्ही एकटे आम्हात, मीहि एकटी. मज अभागिनीची दया नाहीं येत ? यात पाप का आहे ?" तारेनें मनोहरचे हात हातीं घेऊन म्हटलें.

" गाडी खालीं जाईल— " आपले हात मोकळे करून मनोहर म्हणाला.

तारा मनोहरकडे पाहत होती, त्याला भीत होती. तिनें खादीची टोपी त्याच्या डोक्यावर घातली.

" माझ्या प्रेमाचा मुकुट तुमच्या डोक्यावर मी चढवीत आहें. माझ्या माडीवर तुमची टोपी नव्हती. तुमच तें डोक होत. माडीवर बाळाला निजवणं, माडीवर पतीच मस्तक घेऊन तें चेपण, याहून स्त्रियाच्या माडीचा दुसरा मोक्ष नाही. मनोहर, मी गाडी हाकलतें. तुम्ही माझ्या माडीवर डोक ठेवून निजा. तुम्ही माझे आहात, मी तुमची आहे." ती थरथरत म्हणाली.

" काय हें बोलता ? वेड्या आहात तुम्ही. भारत स्वतत्र होईपर्यंत ससारात पडायच नाहीं अस मी व्रत घेतल आहे. तोंपर्यंत एकच संसार—" तो म्हणाला.

"भारताला स्वतंत्र करू पाहणाऱ्या थोरांनीं का लग्न केलं नाहीं?" तिनें विचारलें.

"परंतु मी प्रतिज्ञा केली आहे ती पाळणं माझं काम आहे. ती पाळायला मला मदत करा. पाठीमागं सरा. पुढंपुढं येणाऱ्या विकारांनाहि पाठीमागं सारा. शांत व्हा. सेवेंत तुमचं जीवन चाललं आहे. सेवेंत अधिकाधिक रमा. म्हणजे हें असं काहीं फार आठवणार नाही." तो म्हणाला.

तारा दूर झाली. ती पाठीमागें पाय सोडून मनोहरकडे पाठ करून बसली. पुन्हा एकदम तोंड फिरवून ती म्हणाली, "मनोहर, तुम्ही का निर्विकार आहात? तुम्हाला पाहून माझ्या मनात विकार का उत्पन्न व्हावेत? काल तुम्ही बोलत नव्हतेत फार. आनंद म्हणे 'आज मन्यादादा बोलत नाहींत' काल तुमचं पोट दुखत होतं. आज सकाळीं आनंदाला कुशींत घेऊन मी निजलेली असतां, तुम्ही उभे राहून मजकडे पाहत होतां. त्या सकाळच्या तुमच्या पाहण्यानं मी भांबावलें. मीं एकदम तोंडावरून पांघरूण घेतलं. माझ्याकडे पाहण्याची जर इच्छा झाली तर तुम्ही माझे का होत नाहीं? चोरून पाहण्यापेक्षा पवित्र हक्कानं पहा!"

मनोहर काहीं बोलला नाहीं. परंतु थोड्या वेळानें तो म्हणाला, "सकाळीं मायलेकरांस एकत्र पाहून प्रथम मीं हात जोडले. मला तें पवित्र दर्शन वाटलं. माझ्या पाहण्यात प्रथम पवित्रता होती. मी वंदन करून निघून गेलं पाहिजे होतं. त्या पावित्र्याचा परिमल घेऊन निघून गेलं पाहिजे होतं. नंतरचे क्षण पवित्र नव्हते. मी मोहानं उभा होतों. तुम्ही डोळे उघडून मजकडे पाहिलंत तेव्हां माझ्या डोळ्यांत पावित्र्य नसून विकार होते. परंतु मी झटकन् निघून गेलों, तुम्हीहि तोंड झाकलंत. मी लाजलों. मी एक धडपडणारा प्राणी आहे. मनात वासनाविकार येतातच. त्यांच्या आहारीं न जाण्याची खटपट आहे या झटापटींतच पुरुषार्थ आहे, पदोपदीं आपला पुनर्जन्म आहे. नदी या ठिकाणची तिथं नाहीं, त्या ठिकाणची पलीकडे नाहीं. ती क्षणात उथळ तर क्षणात गंभीर, क्षणात वेगवती तर क्षणात शांत, कधीं भावनांच्या भोंवऱ्यात फिरणारी, तर कधी कड्यांवरून उड्या घेणारी, कधीं सरळ कधी वाकडी—त्याप्रमाणंच हें जीवन आहे. कधीं विकारांचीं वादळं येऊन नदी गढूळ होते, कधीं सद्विचारांचा प्रसन्न

शरद्ऋतु येऊन जीवनाची नदी प्रसन्न दिसते. खळमळ खालीं बसतो. मी कालचा आज नाहीं, सकाळचा आता नाही. सारख जीवन बदलत आहे. परतु यातून विकास का विनाश? मी मागल्यावर श्रद्धा ठेवणारा आहे. शेवटीं सार भल होईल, सार गोड होईल असा माझा विश्वास आहे."

सुदरपुर जवळ आलें तारा शात होती ती आता थरथरत नव्हती. सेवासदन आलें ती खालीं उतरली. मनोहरनें प्रणाम केला.

"क्षमा करा" ती म्हणाली.

"मलाहि करा" तो म्हणाला



# कैदी

## ११

"वर्दी पूरी करना पडे गा गाणा गाता है गाणा बाहर. इधर तो मार खाना पडे गा. देखता क्या? पीसो." हवालदार त्या कैद्यावर ओरडून म्हणाला.

त्या कैद्याच्या हाताना फोड आले होते बाजाच्या पेटीवर नाचणारीं तीं नाजूक बोटें आज जातें फिरवीत होतीं. त्याला तें जातें ओढवेना. पोत्यातील धान्य सरेना. त्यानें आपले हात डॉक्टराला दाखवले. परतु डॉक्टर फक्त हसला.

"होईल, सवय होईल. सवय करायलाच पाहिजे. घाबरून कस चालेल. जरा हळूहळू दळा." डॉक्टर म्हणाले.

"चक्की मुळीं फिरवत नाही डॉक्टर!" तो म्हणाला.

"पाठीवर हवालदाराचा दडा बसला म्हणजे फिरवेल. बैलाच्या पाठीवर काठी बसली म्हणजे ते भराभरा गाडी ओढतात." असें म्हणून डॉक्टर निघून गेले.

तुरुगातील डॉक्टर औषधे देण्यासाठी नसतात फटके मारण्याला मनुष्य योग्य आहे कीं नाहीं हें सागण्यासाठी असतात. फटके मारून झाल्यावर ड्रेसिंग करण्यासाठीं असतात कैदी पळून गेला तर तो ओळखता यावा म्हणून त्याची लाबी, रुदी, उची नीट पाहण्यासाठीं, त्याच्या अगावर खुणा कोठें आहेत, तीळ कोठें आहे हें पाहण्यासाठी ते असतात सर्वांना कठीण काम देता येईल असा शेरा मारण्यासाठी असतात

तुरुगातील डॉक्टराची ही तऱ्हा, मग तेथील इतर अधिकाऱ्याची कशी असेल त्याची कल्पनाच करणे बरें तुरुगात माणुसकीशिवाय बाकी सारें असतें. तुरुग म्हणजे माणसाना पशु करण्याची स्थाने. कैद्याची असलेली माणुसकी, उरलेला थोडा स्वाभिमान, त्याचीहि येथें वासलात लाविली जाते. त्यानें घास मोजून खावयाचे, अगावर पाणी मोजून घ्यावयाचें कैद्याकडून मळे लावण्यात येतात. रताळी, कोबी, बीट भरपूर पिकवतात परतु साहेबाच्या घरीं जाण्यासाठी, वा बाजारात विकण्यासाठी ती असतात. कैद्याच्या नशिबीं सडका पाला व पिवळी, पिकलेली, बियानें भरलेली वागी! भाजीपाल्याचा खर्च भरपूर दाखवतात धान्याचा खर्च भरपूर दाखवतात, परतु जेलचे अधिकारी व कॉन्ट्रॅक्टर याना सारा इतिहास माहीत असतो.

एके दिवशी एका कैद्याच्या पायात दडाबिडी ठोकण्यात आली. त्यानें एक रताळें खाल्लें हा त्याचा अपराध! बैलप्रमाणें ते कैदी मोटा ओढीत व रताळ्यास पाणी भरीत परतु एक रताळे त्यानें खाले तर तो अपराध झाला! फौजदारसाहेब, जेलरसाहेब याच्या घरीं रताळीं जात, परतु ते सारे साव! भरपूर पगार घेऊन फुकट खाणारे हे सभ्य लोक! आणि घामाघूम होणारे ते कैदी! त्याचा कोठला हक्क? त्याचा फक्त मरण्याचा हक्क. शिव्या खाण्याचा, दडे खाण्याचा, दडाबिडी सोसण्याचा त्याचा हक्क!

परमेश्वर जर कोणास अधिक शिक्षा करणार असेल, तर या जेलर, सुपरिंटेंडेंटसाहेबास करील. काहीं काम न करता चैन करणाऱ्यास तो शासन करील.

आमचा गोविंदा कैदी हे सारे प्रकार पाहून घाबरत असे. आपण जिवत कसचे बाहेर पडतो असें त्याला वाटे. काहीं कैद्याना कोणी भेटायला येई,

त्याना साबण वगैरे देई, पण गोविंदला कोण होतें? त्याला कोण पत्र पाठवणार, कोण भेटायला येणार, कोण साबण देणार?

सात वर्षांची सजा! सात दिवस तुरुगात राहणें मुद्धा कठीण, तेथें सात वर्षें काढावयाची! गोविंदाची कम्बरच खचून गेली. केवळ निराशा त्याच्या डोळ्यासमोर होती अगावरचे ते फाटके कैदी-कपडे पाहून त्याचें हृदय फाटे कठ दाटे. डोक्यावरचे सुदर केस! कोठे गेले ते? तुरुगात आल्याबरोबर त्याला सन्यास देण्यात आला. वस्तरा झोंबतो असें म्हटल्याबद्दल हवालदारानें डोक्यावर थपडा मारल्या सर्वत्र अपमान!

उची सिगारेट ओढण्याची त्याला सवय, उची गादीवर झोपण्याची सवय. आता कोठली सिगारेट, कोठली गादी. इतर कैदी चोरून विडी पीत कोणी विड्याचीं थोटकें पाहत हिडत. कोणी कोणी गुदद्वारात विडी लपवीत. गोविंदाला हें सारें पाहून किळस येई. त्याला विडी पिण्याची तलफ येई, पण विडीचें थोटूक त्याच्यानें ओढवेना. सतराजणानी तोंड लावलेली विडी तोंडाला लाववेना.

'सतराजणानीं तोंड लावलेले ओठ तुला चालत. सतराजणानी भोगलेली नार तुला चाले. त्या वेळेस नाहा शिसारी आली? त्याची शिसारी येती तर हे दिवस कशाला येते? परतु वारागनाकडे लोळत पडलास. रड आता भरपूर. भोग आता फळ!' असें त्याचें मन त्याला म्हणे.

एके दिवशीं चक्कींतील एक कैदी साबणाचे तुकडे खात होता. गोविंदा कैद्याला त्यातील रहस्य कळेना.

"साबण कां खाता?" त्यानें विचारले.

"म्हणजे दवाखान्यात विश्राति मिळेल." तो कैदी म्हणाला.

"साबण खाऊन का आजारी पडता येत?" गोविंदानें विचारलें.

"साबण खाल्ला म्हणजे शौचास फेसाळ होत. डॉक्टराना सागाव की, मला आमाश झाला आहे. दोन दिवस दवाखान्यात विश्राति मिळते. निदान दोन दिवस काम मिळत नाहीं. शौचाच तपासल तरी हरकत नसते. संशय येत नाहीं." तो कैदी म्हणाला.

गोविंदा कैद्यास हें सारें ओंगळ वाटे. परंतु दुसरा उपाय काय? तुरुगात येरव्हीं थोडीच विश्राति मिळणार आहे? तुरुगात देवाचें स्मरण होतें. प्रेमळ

माणसाचें स्मरण होतें. कृतकर्मांचें स्मरण होतें. परंतु तुरुंगात ज्याची पहिली फेरी असते, त्याला हें सारें. जे पुनः पुन्हा येतात, त्याना तुरुंग हें घरच वाटतें. त्याना बाहेरच करमत नाहीं सुटल्यावर पुन्हा तुरुंगात केव्हा जाऊं असें त्याना होतें. माझा बिस्तरा, माझी थाळी-भांडें राखून ठेवा असें जाताना ते सांगतात. सुटलेले कैदी पुन्हा महिन्या दोन महिन्यात आलेले गोविंदानें पाहिले तेव्हा त्याला आश्चर्य वाटलें. परंतु त्या कैद्यानी त्याचें आश्चर्य नाहींसें केलें.

एकदा तुरुंग पाहावयास कांहीं पाहुणे आले होते. जेलरसाहेब स्वतः त्याना तुरुंग दाखवीत होते हिंडता हिंडता मंडळी चक्कीचे ठिकाणीं आली. गोविंदा कैदी दळीत होता. सर्व कैद्याच्या माना खाली होत्या.

" हे पहा एक गाणारे कैदी रात्रीं गायलाच लागले. जेलमध्यें आहों हें विसरले. झोपेंतसुद्धा गातात !" जेलरसाहेब हसत म्हणाले.

पाहुण्यांपैकी एकजण गोविंदा कैद्याकडे टक लावून पाहू लागला. गोविंदा त्याच्याकडे पाहू लागला.

" तुम्ही सुंदरपुरला होता का ?" पाहुण्यानें विचारलें.

" हो." गोविंदा कैदी म्हणाला.

" तिथं गायनाचा वर्ग चालवणारे तुम्हीच का गोविंदराव ?" पाहुण्यानें पुन्हा प्रश्न केला.

" हो. " तो म्हणाला.

" तुम्हाला कुसुम माहीत आहे ? तुम्ही तिला गाणं शिकवीत होतेत. गाण्याचा एक प्रयोग तिच्यावर केला होतात ?" पाहुणा विचारू लागला.

" तुम्हाला काय माहीत ?" कैद्यानें विचारलें.

" कुसुमनंच एके दिवशी ती गंमत सांगितली." पाहुणा म्हणाला.

" कुसुम तुमची कोण ?" गोविंदानें प्रश्न केला.

" माझी पत्नी. सुंदरपुरला माझं जाणं येणं असे. व्यापारासाठीं आम्ही सर्वत्र हिंडतों. तुमचं गाणंहि मीं एकदा ऐकलं होतं. कुसुमची माझी सोबरीक जमली. तुमचं गाणं एके दिवशी मीं ऐकलं. तुमच्याजवळ तिनं गाणं शिकावं असं तिच्या वडिलास मींच आग्रहपूर्वक सांगितलं होतं. पुढं आमचं लग्न झालं. तुम्हाला इथं पाहून मला वाईट वाटतं." पाहुणा म्हणाला.

" माझ्या कर्माची फळ मी भोगलीच पाहिजेत. कुसुमला क्षमा करण्यासाठी सागा. तुम्हीहि क्षमा करा इथ माझा पुनर्जन्म होत आहे आत्म्यवारच एकेक पापकवच गळून पडत आहे एक दिवस मी मुक्त होईन. पाप्याला अनत भविष्यकाळ आहे " गोविंदा कैदी म्हणाला

" इथ खूप त्रास होत असेल ?" पाहुण्यानें सहानुभूतीनें विचारलें.

" त्रासासाठींच तुरुग असतात तुरुगात रोज अगातून घामधारा निघाव्या लागतात व डोळ्यातून जलधारा निघाव्या लागतात मी या पाण्यान पवित्र होत आहे मी सर्व जगाला पूर्वी तुच्छ मानीत असे आज जगातील सर्वात तुच्छ असा मी झालों आहे. जिवतपणीच देवान नरक दाखवला आता मेल्यावर यमयातना दुसऱ्या भोगाव्या लागणार नाहीत " गोविंदा कैदी शातपणें सागत होता.

" तुम्हाला काही पाहिजे ? " पाहुण्यानी विचारलें.

" नको. पाण्याबद्दल प्रेम वाटत असेल तर ते थोड द्या." गोविदा सद्‌गादित होऊन म्हणाला.

पाहुणे निघून गेले. हवालदार गोविदा कैद्याकडे जरा आदरानें पाहू लागला. थोगमोठ्याच्या हा ओळखीचा दिसतो असा त्यानें तर्क केला

त्या दिवशी तिसरे प्रहरी गोविंदा कैद्याला एकदम जेलरसाहेबाकडून बोलावणें आलें. आपण त्या पाहुण्याजवळ बोललों म्हणून शिक्षा तर नाहीं ना असें त्याच्या मनात आलें

" तुम्हाला भेट आली आहे. या तुम्हाला भेटायला आल्या आहेत." जेलर-साहेब म्हणाले.

" मी कुसुम. ओळखलत का मला ? ही माझी मुलगी." पाहुण्याबाई म्हणाल्या.

" सात वर्षे झाली. या मुलीच काय नाव ? " गोविंदानें विचारलें.

" लिली." कुसुमनें सागितलें.

" तुम्ही मला भेटायला आलात, मला किती समाधान होत आहे ! मी इथ आहे ही गोष्ट सुदरपुरला गेलात तर भाऊरावास तुम्ही सागू नका. तुमच्या यजमानासहि याबद्दल सागा. भाऊरावास वाईट वाटेल. त्याना मनोहर भेटला. देवाचे त्याच्यावर उपकार. मला माझा अनुभव हाच मनोहर, अनुभव

हाच माझा गुरु, हाच सखा. तुम्ही सार विसरून आलात, किती छान!"
गोविंदा म्हणाला.

"तुम्हाला साबण आणला आहे व आश्रम-भजनावलीच पुस्तक आणल आहे. जेल्रसाहेबानी या वस्तु द्यायला परवानगी दिली आहे." कुसुमनें सांगितलें.

गोविंदानें आश्रमभजनावलि हाती घेतली. ती त्याने चाळली.

"महात्माजींच्या आश्रमात यातीलच प्रार्थना म्हटल्या जातात." कुसुमने पुस्तकाचा परिचय करून दिला.

"किती योग्य वस्तु तुम्ही दिल्यात! साबणान बाहेरचा मळ धुऊन टाकीन आणि या प्रार्थनानी मनाचे मळ धुऊन टाकीन. अतर्बाह्य स्वच्छ होऊन बाहेर येईन जगलों–वाचलों तर बाहेर येईन, नाही तर इथूनच देवाकडे जाईन. पुन्हा बाहेर बरबटण नको." गोविंदा गभीर खिन्नतेनें म्हणाला.

"तुम्ही तुरुगातून पवित्र होऊन बाहेर याल व जगाला निर्मळ सुदर सगीत शिकवाल." कुसुमनें आशा दाखवली.

"मी तुम्हाला काय देऊ? माझ्या डोळ्यातील अश्रु तुम्हास देतों, दुसर काय देणार? तुम्ही सकाळींच तुरुग पाहावयास का नाहीं आलात?" गोविंदानें शका विचारली.

"तुरुगातील देखावे मला पाहवणार नाहीत असं वाटल. तुमचे हे फाटके कपडे पाहून मला खरोखर वाईट वाटत आहे तुम्ही किती वाळलात?" ती म्हणाली.

"तुरुगात शरीर वाळत व आत्मा पुष्ट होतो." गोविंदा म्हणाला.

"आता वेळ सपली." जेलरसाहेब म्हणाले

शिपाई गोविंदा कैद्यास घेऊन गेला. कुसुम त्याच्याकडे पाहत होती. लिलीला घेऊन ती निघून गेली.

काहीं दिवस गेले. एके दिवशीं गोविंदा कैद्याची चक्की बद झाली. त्याला कचेरीत काम मिळालें. तेथें कारकुनास तो मदत करी, हिशेब करी. कैद्याच्या दिवसाच्या बेरजा करी. गोविंदा कैद्याचें अक्षर मोत्यासारखें होतें. तो दिसे सुंदर, लिही सुदर.

जेलरसाहेबाची गोविंदा कैद्यावर मर्जी बसली. ते दुपारीं जेवण करून जेल-मध्यें येत. गोविंदा कैद्यास ते गाणीं म्हणायला सागत. आश्रम-भजनावलींतील सुदर भक्तिमय पदें गोविंदा कैदी आळवी व ऐकणारांच्या डोळ्यातून टिपें काढी. दर रविवारी एका मोठ्या बराकीत कैदी जमवण्यात येत व गोविंदा कैदी तेथें भजन करी तें भजन ऐकून कैदी सद्गदित होत बाहेरच्या व्याख्या-त्याचीं कोरडीं व्याख्यानें ऐकण्याऐवजीं गोविंदा कैद्याचें हें भजनच कैद्याना आवडे. नीतिधर्मावर व्याख्यानें देण्यासाठीं बाहेरचे पाहुणे येत व पाच रुपये प्रत्येक व्याख्यानाचे घेऊन जात त्या व्याख्यानात ना कस, ना रस, ना जिव्हाळा, ना कळकळ ! गोविंदा कैद्यानें एके दिवशीं व्याख्यान दिलें किती सुदर बोलला तो ! गोविंदा कैदी साधक झाला होता. ती साधकाची वाणी होती. मुमुक्षूचें तें भाषण होतें तो म्हणाला, "मित्रानो, आपण बाहेर पाप करून इथ आलों. आता इथ पाप करू तर तें कुठ फेडायचं ?" त्याचे ते सकप शब्द हृदया हृदयात गेले.

गोविंदा कैदी असें म्हणायच्याऐवजीं त्याला आता 'गोविंदा साधु' असें सारे म्हणत. पूर्वीचा वासनाचा कैदी गोविंदा मरून गला. कामक्रोधाचा कैदी गोविंदराव नष्ट झाला. वासनाकोश गळून पडला. किड्यातून फुलपाखरू बाहेर पडतें, मुक्त होतें, त्याप्रमाणें गोविंदा कैद्याचें झालें. एक प्रकारची मधुर शाति, पवित्र काति त्याच्या चेहऱ्यावर दिसू लागली. तुरुगाच्या चिखलात तें पवित्र कमळ फुलत होतें. त्याचा सुगध इतराच्याहि जीवनाला लागत होता.

जेलरसाहेब बदलून गेले. कैद्याशी कठोरपणें वागण्याची सवय झालेले जेलर-साहेब घरींहि तसेंच वागत ते स्वतःच्या मुलाना शिक्षा करायचे, त्याना बाधून ठेवीत. त्याना मिठाची भाकर खायला देत. त्याना वेतानें फोडून काढीत. पत्नी त्याच्यासमोर बिचारी थरथरत असे. घरी काम करावयास येणाऱ्या कैद्याजवळ जेलरसाहेबाची पत्नी म्हणावयाची "तुमची तशीच माझी दशा. आम्ही स्त्रिया म्हणजे कैदीच आहोंत. कुठ पळून जाऊ तर समाज आणखीन कठोर शिक्षा करील. मुकाट्यान रडाव, सार सहन कराव."

परतु कर्दनकाळ जेलरसाहेब गोविंदा कैद्याचीं भजनें ऐकून निराळे बनले.

"अतर मम विकसित करो अतरतर हें ।"

हें गीत ऐकता ऐकता जेलर डोळे मिटीत. त्याचा स्वभाव प्रेमळ झाला. गाणें ऐकून ते घरीं जात व मुलाचे मुके घेत. पत्नीशीं गोड बोलत कृष्णाच्या बासरीनें शिळा पाझरत असें पुराणात वर्णन आहे त्याचा अनुभव त्या तुरुगात येऊ लागला. हा गोविंदा कैदी म्हणजे गोकुळातीलच तो बन्सीधर गोविंदा नव्हता ना ? तो मोरमुकुटवाला, मेघश्याम, गोपालकृष्ण नव्हता ना ?

पतीमध्यें ही अद्‌भुत क्राति कोणी केली हें पत्नीस कळेना. परतु एके दिवशी पतीच्या तोंडूनच तिला सारें कळलें. आपणहि त्या कैद्याला बघावें असें तिला वाटलें आपल्या ससारात ज्यानें मधुरता आणली, त्या थोर उपकार-कर्त्याला पाहावें असें तिला वाटलें त्या दिवशीच्या रविवारीं आपलीं मुलें घेऊन तीहि पतीबरोबर भजनश्रवणास गेली. फौजदारसाहेबानी गुलाबाचीं सुदर फुलें तोडून जेलरसाहेबाच्या पत्नीला नेऊन दिलीं. भजन झालें. तीं फुलें तिनें पतीच्या हातीं दिलीं. जेलरसाहेबानीं तीं गोविंदा कैद्यास अर्पण केलीं ! तुरुगात अधिकाऱ्याकडून एका कैद्याची पूजा ! तो चमत्कार होता. परतु असे चमत्कार या सृष्टीत कधी कधी घडून येत असतात थडगार झऱ्या-जवळ अत्यत कढत पाण्याचे झरे हिमालयात आढळतात. भर वाळवटात मध्येंच झुळझुळ वाहणारें पाणी आढळतें व डोळयास शातविणारी हिरवळ दिसते. डामरातून गोड साखर व सुदर रग आपणास मिळतात. डामरांतून साखर व रग मिळण्याचे शोध शास्त्रज्ञानी लावले आहेत. जगाला त्यात आश्चर्य वाटत नाही. परतु एखादा दुर्जन सज्जन झाला, एखादा पापी पवित्र झाला असें त्याना सागितलें तर तें त्याना खरें वाटत नाही. डामराहून का मनुष्य अधिक डामरट आहे ? डामरातील दिव्यता का माणसात नसावी ?

# कोठें आहे धर्म ? १२

मनोहरला स्वातंत्र्याची तहान लागलेली होती. वरून शांत दिसणारा मनोहर आंत दुःखसंतापानें जळत असे. फुलगांवच्या मुलांच्या जीवनकळया तो फुलवीत होता. पूर्वी तो खादी खांद्यावर घेऊन वाऱ्याप्रमाणें सर्वत्र भटके. ओथंबलेला मेघ वर्षत असतो. स्वातंत्र्याच्या भावनांनी ओथंबलेला मनोहर सर्वत्र स्वातंत्र्याच्या कल्पना फैलवीत फिरे. परंतु तें भटकणें त्यानें बंद केलें होतें. एका गांवाला विशेषेंकरून त्यानें बांधून घेतलें होतें.

एके दिवशीं एक कफनी घातलेला तरुण मनोहरचा शोध करीत त्या गांवीं आला. उंच व धिप्पाड होती ती मूर्ति. डोक्यावर जटा वाढलेल्या होत्या. हातांत एक रुद्राक्षमाला होती. पायांत खडावा होत्या. खांकेस झोळी होती. मनोहर शाळेंत मुलांना गोष्टी सांगत होता तों ते बोवा बाहेर आले. मनोहर बाहेर आला. त्यानें त्या बोवाजींचा हात हातांत घेतला. बोवाजींची व त्याची जुनी ओळख असावी.

“ सांग तुझी गोष्ट, मी पण ऐकेन. पुष्कळ दिवसांत तुझी वाणी कानीं पडली नाहीं.” बोवाजी म्हणाले.

मनोहर गोष्ट सांगू लागला. मुलें ऐकू लागलीं. "एक होता सावकार. गावोगाव त्याची शेती, त्याची जमीन. हजारों घरातून त्याला शिव्याशाप मिळत. कुणी त्याला बरं म्हणत नसे. पिकलं नाही तों सावकाराचे लोक येत व माल घेऊन जात उरलंसुरलं सरकार नेई त्यातून थोडं उरलं तर कुणी दादामहाराज, कुणी बाबामहाराज, असे गाद्या चालवणारे महाराज घेऊन जात. शेतकऱ्यांची मुलं उपाशी असत. ना त्याना भाकर ना त्याना ज्ञान. थंडींत ना पांघरूण, ना अंथरूण शेतकऱ्याच्या बायकांच्या अंगावर चिंध्या असत. सावकाराचीं शेंकडों घरं होतीं. त्यांच्या घरात शेंकडों गाद्या-गिरद्या होत्या. त्यांच्या घरात कुत्रीं, पोपट यानाहि मेजवान्या असत. अजीर्णानं घरातील मंडळी आजारी असत. उन्हाळ्यात तो सर्वांना घेऊन थंड हवेच्या ठिकाणीं जाई सावकार सुखात होता. श्रमणारे शेतकरी दुःखात होते.

तो सावकार धार्मिक म्हणून प्रसिद्ध होता. एका जुन्या समाधीचा त्यानं उद्धार केला होता एका देवाला त्यानं मुकुट केला होता एका देवाला तो रोज पंचपक्वान्नाचा नैवेद्य नेई. एका देवासमोर रोज चौघडा वाजण्याची त्यानं व्यवस्था केली होती. मेल्यावर मोक्ष मिळेल अशी त्याची श्रद्धा होती.

सावकार मेला. सावकार सुद्धा शेवटीं मरतात. मातींत मिळतात. त्याचा आत्मा देवाकडे गेला.

देवानं विचारलं, "तू काय पुण्य केलंस ?"

सावकार म्हणाला, "तुझी पूजा बांधली, तुला मुकुट केले, तुझ्या दारात चौघडे वाजवले, तुला नैवेद्य दाखवले."

देव म्हणाला, "माझ्या दारात चौघडे वाजवलेस परंतु शेतकऱ्याना तूं शंख करावयास लावलंस, मला नैवेद्य दाखवलेस, शेतकऱ्यांचीं मुलं उपाशी होतीं. मला मुकुट केलेस, शेतकऱ्यांच्या घरावरून नांगर फिरवलास. मी का फक्त देवळांतील दगडात आहे ? त्या शेतकऱ्यात का मी नव्हतों ? तू मला त्या लहानशा दगडात फक्त कोंडून ठार केलंस. देवाची समाधि बांधलीस. जा, तू देवाचा भक्त नसून, देवाची हत्या करणारा आहेस. इथं तुला मज्जाव आहे."

इतक्यात त्या सावकाराचं एक कूळ मरून तिथं आलं. आपल्या कुळाला काय न्याय मिळतो हें सावकारास पाहायचं होतं.

देवानं कुळास विचारिलं. 'तू काय पुण्य केलंस ?'

तें कूळ म्हणाल, “मी मुलाबाळास आधीं खायलाप्यायला दिल नाहीं बायकोला लुगड घेतल नाहीं. आम्ही सर्वजण पाऊस-पाण्यात, थडी-उन्हात खपत असू. साप-विंचू, दगडधोंडे, काटेकुटे, कशासहि जुमानीत नसू वर्षभर श्रमाव, घाम साडावा, रक्त आटवाव व शेत पिकवावीं पिकेल तो माल मी आधीं सावकारास देत असे मनात म्हणत असे ‘जिवतपणीं कष्ट करू परतु मेल्यावर तरी देवाजवळ जाऊ.”

देवान विचारल, “सावकाराच मुद्दल फिटल होत कीं नाही? किती घेतल होतंस कर्ज?”

कूळ म्हणाल, “सावकाराच घेतले पाचशें, परतु त्याला व्याजापायी भरले सातशें. मुद्दल कधी फिटतच नसत”

देव म्हणाला, “जेवढे घेतले तेवढे फार तर द्यावे आणि ते ५०० तरी त्यानीं कुठून आणले? परतु घेतले तेवढे दिले तर त्यात फार वावग नाहीं तुम्ही असे बावळट कसे? म्हणे मुलाबाळाना खाऊ दिल नाहीं, बायकोला लुगड घेतल नाहीं. त्याचा साभाळ करण हें पहिल कर्तव्य. तुम्ही श्रमलात, जें पैदा केलत त्यावर पहिला तुमचा हक्क. मग सरकार, मग सावकार, हा खरा धर्म. तू अधर्मान वागलास, तुला मोक्ष नाही.”

कूळ म्हणाल, “आम्ही तस करू तर आम्हाला तुरुगात घालतील घरात खायला नसल तरी तहशील आधीं भरावा लागतो. सावकाराच देण द्याव लागत. काय कराव?”

देव रागावून म्हणाला, “बड करावं. षढासारख वागण म्हणजे का धर्म? अन्यायाविरुद्ध झगडा करा, त्यासाठीं सघटना करा असे रडता काय? दुबळेपणान रडणारे व अन्याय सहन करीत जगणारे ते देवाचे नाहींत. जा.”

देवान छळणारा सावकारहि दारात उभा केला नाहीं, तो मुळुमुळू रडणारा शेतकरीहि त्यान उभा केला नाहीं. त्यान सावकाराला ‘माणुसकी म्हणजे धर्म, सर्व बधूस सुखी करण म्हणजे धर्म’ ही गोष्ट शिकवली. शेतकऱ्यास ‘अन्यायाविरुद्ध झगडा उभारा, तुम्ही श्रमता तर तुम्ही आधीं खा’ अस शिकवल.

मुलानो, खऱ्या धर्माची या गोष्टीवरून तुम्हाला कल्पना येईल. तुम्ही उद्या मोठे व्हाल तेव्हा या धर्माचे वारकरी व्हा.”

गोष्ट सपली मुलें घरोघर गेलीं. मनोहर व ते बुवाजी मळयात गेले. बरोबर आनदहि होता

" हा कोण, तुझा मुलगा की काय ? " बुवाजीने विचारलें.

" नाहीं. हा माझ्या मित्राचा मुलगा. त्याचाच हा मळा. ते पूर्वी सुदरपुरला वकील होते परतु आज बरींच वर्षे या खेड्यात ते सेवा करीत आहेत. त्यानीं सावकारी सोडून दिली. स्वत. श्रमतात देवाचा धर्म ते आचरीत आहेत—" मनोहरनें थोडक्यात हकीकत सागितली

इतक्यात उन्हात काम करून भाऊराव आले

" हे भाऊराव " मनोहरनें मित्रास सागितलें.

" आणि हे कोण ? " भाऊरावानीं विचारिलें.

" हे माझे एक जुने मित्र आम्ही दोघानी लग्न न करण्याच ठरवल होतं, स्वराज्याच्या कामाला वाहून घेण्याच निश्चित केल होत. याच नाव नारायण." मनोहरनें सागितलें.

" मन्यादादा, आई विचारते पाहुण्याची आघोळ व्हायची आहे ना ? " आनदानें येऊन विचारलें.

" हो. स्नान करायच आहे. मी थड पाण्यानच स्नान करतों " नारायण म्हणाला.

" तुझं खाण्यापिण्याच काहीं विशेष तत्र आहे कीं काय ? " मनोहरनें विचारलें.

" तस विशेष काहीं नाहीं " नारायणनें हसून सागितलें.

नारायणानें स्नान केलें. त्याचें जपतप बरेंच होतें. तो डोळे मिटून बसला होता. आनद हें पाहत होता. त्यानें अशी कवाईत कधी पाहिली नव्हती.

" याच केव्हा आटपणार ? मला तर भूक लागली आहे." आनद म्हणाला.

" अरे पाहुणे आहेत ते अस म्हणू नये." आनदी म्हणाली.

" मला आपल आधी वाढ. " तो म्हणाला.

" मघाशींच विचारल, तेव्हा नको म्हणालास, बस. तुला वाढतें." आनदीनें सागितलें.

थोड्या वेळानें भाऊराव, मनोहर, नारायण सारे जेवावयास आले.

" काय रे पाहुण्याच्या आधी बसलास ? " नारायणानें आनदास विचारलें.

" मन्यादादा म्हणतो लहान मुल म्हणजे देव. देवाला आधीं नैवेद्य दाखवावा." आनद म्हणाला.

" पण देव नैवेद्य खात नसतो." नारायण म्हणाला.

" खरा देव खातो. नामदेवाच्या देवान खाल्ला होता. नाहीं का ग आई ?" आनंदा म्हणाला.

" तुला स्तोत्र वगैरे येतात का रे ? " नारायणानें विचारले.

" स्तोत्र म्हणजे न समजणाऱ्या कविता होय ना ? मन्यादादा म्हणतो, 'प्रभातफेरीची गाणी' म्हणजेच्च आपलीं स्तोत्र. हीं स्तोत्र आम्हाला समजतात. परंतु 'ती खट फट स्तोत्र' समजत नाहींत. भाऊ म्हणतात तसली." आनदा हसून म्हणाला.

" मनोहर, तू का देवाधर्माला चाट दिलीस ? शाळेंतील त्या गोष्टीवरून तसच वाटल." नारायण म्हणाला.

" कधीं कधीं आईबापापासून दूर ठेवण्यात मुलाच हित असत. तो स्वावलंबीहि होतो व आईबापाची मग प्रेमानः आठवण करतो. देवापासून काहीं दिवस आपण दूर राहू या. देव देव करून आपण बावळट व पुरुषार्थहीन झालों आहोंत. जड व परावलबी झालों आहोंत. छायेंत पीक वाढत नाही. झाड तोडाव, सावट दूर करावी, तेव्हा पेरलेल फोफावतं. काही दिवस देवाच झाड जरा छाटू या. देवाच हें जुन झाड पोकळ झाल आहे. दिसायला उच, छाया दाट– परतु ना फुल ना फळ. खडसून टाकू या हें झाड. किंवा नवीन देवाचं नवीन झाड लावू या." मनोहर भावनेनें बोलत होता.

" मन्यादादा, आधीं जेव तू, म्हणजे मग वादास जोर येईल." आनदी म्हणाली.

" या गोष्टी वाद करायच्या नाहींत. ज्याच्या त्याच्या श्रद्धेच्या आहेत. औषध घेऊन पाहाव. गुण आला तर ठवाव, नाहीं तर फेकून द्याव, परमेश्वराच भक्तिपूर्वक स्मरण मला तरी जीवनदायी वाटत." भाऊराव म्हणाले.

" परमेश्वराच कृतज्ञतापूर्वक स्मरण करण निराळ, आणि धर्माच्या वायफळ गप्पा निराळ्या ! " मनोहर म्हणाला.

" मी उठू. नाहीं तर म्हणाल पाहुण्याच्या आधी उठलास." आनदा म्हणाला.

" मन्यादादान तुला काय शिकविल आहे ?" नारायणाने विचारलें.

" आपल झाल की उठाव व्यर्थ वेळ दवडू नये. माशा मारीत पानावर बसू नये, अस मन्यादादा सागतो" आनदानें सांगितलें.

" मग ऊठ ' नारायण म्हणाला

जेवणें झाली भाऊराव न झोपता आज सूतच कातीत बसले. मनोहर व नारायण बोलत होते

" मनोहर, धर्माशिवाय स्वराज्य मिळणार नाहीं. आधी धर्माचा पाया हवा." नारायण म्हणाला

" स्वराज्य मिळवण ही गोष्ट का धर्मापेक्षा निराळी आहे ? धर्म म्हणून निराळी वस्तु नाही." मनोहर त्वेषानें बोलला.

" मला तर सर्वत्र धर्मग्लानि दिसत आहे. नास्तिकता सर्वत्र बोकाळली आहे " नारायण म्हणाला

" धर्माला उज्ज्वलता कधी होती ? ज्या समाजात हजारों वर्षे माणसाना पशूहून नीच करून ठेवण्यात आल तिथ का धर्म होता ? सतानीं बड करून ज्ञानाची भाडवलशाही मोडली. सार ज्ञान मराठीत आणल. परतु तें मराठीत आणलेल लिहा-वाचावयास कोणी शिकवायच ? स्त्रिया, वैश्य, शूद्र या सर्वांना मोक्ष देणाऱ्या त्या श्रीकृष्णाच्या या भारतभूमीत अद्याप शेंकडों जाती रानटी कशा राहिल्या ? ज्या जातींत शबरीसारख रत्न झाल, त्या भिल्लामधें आम्ही कधीं गेलों नाही. मिशनरी जातात व त्याची सेवा करतात. कोठला धर्म नि काय ? जिथ शेंकडा ९० लोक निरक्षर आहेत, जिथ अस्पृश्यता आहे, जिथ जातिभेदाचा बुजबुजाट आहे, जिथ श्रेष्ठ-कनिष्ठपणाचे पदोपदीं वाद, जिथ स्त्री म्हणजे मालमत्तेची, भोगाची एक चीज, जेथें लाखों लोक अन्नवस्त्रहीन असता राजेरजवाडे, सावकार-कारखानदार, जहागिरदार-इनामदार, गादीबहाद्दर, सत-महत आपापल्या चैनी खुशाल चालवीत असतात, लहानपणापासून लग्नाशिवाय दुसरा विषय जिथ कानावर पडत नाहीं, तिथ का धर्म आहे ? तिथ का धर्म होता ? खरा धर्म आता येत आहे. धर्माचे बडेजाव माजवले जात असता, प्रत्येकाच्या ओठावर देवधर्म नाचत असता, जर ही लाजिरवाणी दशा

समाजास येते, तर तो देवधर्म उडवण म्हणजेच खरी आस्तिकता. ज्या आस्तिकतेत ओलावा नाहीं ती नास्तिकता. ज्या नास्तिकतेंत ओलावा आहे ती खरी आस्तिकता. स्त्रियाचा आत्मा जागा होत आहे, हरिजनाचा आत्मा जागा होत आहे, श्रमणारी जनता उठत आहे, मुल बड करू पाहत आहेत, गुलामी लादणाऱ्या गुरूंना भिरकावून देत आहेत, यात मला खरी धर्मप्रभा दिसत आहे सर्व प्रकारच्या क्षुद्रतेला काडी लावण हा आजचा धर्म आहे सर्वत्र भरलेली प्राणघेणी घाण जाळून भस्म करण हा धर्म आहे हातातील माळ फेक व झाडू घे, ती झोळी फेक व खाद्यावर खादी घे. ॐ ॐ सोड व

'मरावयाला उठा मुलानो भारतमातेच्यासाठी !
स्वातत्र्याची गाणी गाऊ झेंडा घेऊ निज हाती'

अशी गाणीं गात हिंड. हरिजनाच्या झोपड्यात प्रेमाचा प्रकाश ने हा आजचा युगधर्म आहे शेतकऱ्यात, कामगारात निर्भयता ने, त्याची पोलादी सघटना कर. या कफन्या नकोत आता. ज्या ज्या सोंगानीं समाजात दभ माजला ती सारी त्याज्य मानू या. माळा, खडावा, गध, भस्में, लुग्या, भगवी, वस्त्र सर्वांना दूर ठेवू या. नारायण, आपण स्वराज्यासाठीं तडफडत होतों. मी मनात म्हणत होतों तू कुठ तरी स्वराज्याची सघटना करीत असशील परतु तू तर जपतप साधन करणारा झालास." मनोहर थाबला

"आधीं देव मिळावा अस मला वाटत. देवाचा आदेश मिळावा अस मला वाटत. देव म्हणजे झूट म्हणणाऱ्याच्या डोळयात अजन घालाव अस मला वाटत." नारायण शातपणें म्हणाला.

"समोरच्या मनुष्यास पाणी मिळत नाही. त्याला पाणी देण्यासाठीं तू का देवाच्या आदेशाची वाट पाहत बसणार? तुझ हृदय तुला सागत नाहीं कीं पाणी दे ! देवाचे आदेश पदोपदीं आपणास मिळत असतात, परतु ते आपण झिडकारीत असतों. अनवाणी पायान हजारों गरीब स्त्रीपुरुष प्रखर उन्हातून हिंडतात. त्याच्या पायात पायतण मिळावींत म्हणून झगडा हें का देवानं सागायला पाहिजे? देवान बुद्धि दिली ओह, हृदय दिल आहे. हातपाय दिले आहेत. त्याचा उपयोग न करता, त्याचे आदेश ऐकण्याची मूर्ख इच्छा करीत राहूं तर देव हसेल. नारायण, ज्या दिवशी भरतखडात स्त्रियाचा कुणी अपमान करणार नाहीं, त्याचा कुणी छळ करणार नाहीं, त्याना स्वातत्र्य लाभेल,

ज्या दिवशीं सर्वांना सुखानं खातापिता येईल, ज्या दिवशी सर्वांना ज्ञान-विकास व कलाविकास करून घेण्यासाठी फुरसत मिळू लागेल व तशी सोय असेल, ज्या दिवशीं सर्व मुलांचें शास्त्रीय संगोपन होऊं लागेल, ज्या दिवशी आर्थिक, राजकीय, धार्मिक वा सामाजिक गुलामगिरी समूळ जाईल, त्या दिवशीं थोडा धर्म आला असें म्हणतां येईल असा धर्म म्हणजेच स्वराज्य–" मनोहर म्हणाला

"आमच्या त्या सुंदरपुरला अद्याप नीट गटारं नाहींत परंतु काही श्रीमंत जैन व्यापाऱ्यांनी एक लाख रुपये खर्चून मोठं मंदिर बांधलं त्या मंदिराऐवजी गटार बांधणं हा खरा धर्म झाला असता. ते जैन साधु नाका-तोंडात जंतु जाऊं नयेत म्हणून तोंडावर पट्टे बांधतात परंतु ते जंतु उत्पन्न होऊं नयेत म्हणून गटारं बांधा असं सांगणार नाहींत रोग येईल, लोक मरतील मग त्या देवळातून कोण जाणार? एक लाख रुपयांत सुंदरपुरच्या सर्व हरिजनांना पुरेशा—साध्या परंतु निरोगी अशा झोपड्या बांधून देता आल्या असत्या. परंतु असा डोळस विचार कुणी करीतच नाहीं. मी असं बोललों तों मजवर ते किती रागावले!" भाऊरावांनीं सांगितलें

"मनोहर, आपले हे सनातन वाद आहेत. ज्याच्या त्याच्या प्रवृत्तीप्रमाणं जो तो वागणार. अरविंदाचा मार्ग निराळा, महात्माजींचा निराळा, विवेकानंदाचा निराळा प्रयत्न प्रामाणिक असला म्हणजे पुरे. मी बरेच दिवसांत तुला भेटलों नव्हतों म्हणून आलों. मी आतां हिमालयांत जाणार आहे. देव भेटला तर मी तुला येऊन भेटेन. तू अलीकडे हिंडत-फिरत नाहींस वाटतं?" नारायणानें विचारलें.

"सर्वत्र हिंडत होतों, परंतु हल्लीं इथंच अधिक राहतों. दोन्ही प्रकारचे लोक हवेत. नद्याहि हव्यात व विहिरीहि हव्यात. काहींनी सदैव हिंडावं. काहींनीं स्थिर राहावं. उद्या समजा सत्याग्रह झाला, तर या फुलगावांतून शंभर तरी माणसं माझ्या पाठोपाठ येतील. कारण त्यांच्या जीवनांत मी शिरलों आहे. त्यांच्याशीं जिव्हाळ्याचे संबंध आले आहेत. परंतु मी जर सर्वत्र केवळ हिंडत फिरत असतों तर १०० तरी लोक माझ्या पाठोपाठ येतील असं मला खात्रीनं सांगतां आलं नसतं. एक हजार खेड्यांतून एक हजार निष्ठावंत, निरलस व सेवापरायण

तरुण जर स्वत.ला गाडून घेतील तर एक लाख सत्याग्रही सेना तयार झाली असं समजायला हरकत नाही. हिंदुस्थानात जवळ जवळ २७० जिल्हे आहेत प्रत्येक जिल्ह्यात १० असे व्रती लोक जर निघतील तर हिंदुस्थानात जवळ जवळ तीन लाख फौज तयार होईल असा मी हिशेब करीत असतो सेवकाचा तुटवडा आहे. हजारो घुमणारे व एकेठायी रमणारे सेवक पाहिजे आहेत परतु दुर्दैवी भारतात, धर्माच्या व अध्यात्म्याच्या या भूमीत अशाचा दुष्काळ आहे? जर्मनीत मजुरीचे पैसे वाचवून त्यातून स्वखर्चाचा गणवेष करून स्वयसेवक नाझी सघटनेत शिरतात आमच्याकडे खादीचा गणवेष लागतो म्हणून कोणी स्वयसेवक होत नाहीं. खादी महाग म्हणून कोणी घेत नाहीत खादीची टोपी त्याना बावळट दिसते. बेट्याना गुलामगिरीत पिचत राहणे बावळटपणाच वाटत नाही. नारायण, राष्ट्राला आग लावणारे लोक पाहिजेत आणि तू जाणार थड हिमालयात!" मनोहर निराशेनें म्हणाला.

"थंड हिमालयातून जीवनदायी गगा-यमुना मिळतात. तुझा उत्साह अखड राहो. निराशा तुला न शिवो मला आता निरोप दे." नारायण म्हणाला.

दोघे मित्र एखमेकाना कडकडून भेटले

"आनद कुठ गेला?" नारायणानें विचारले

"तो जीवनकडे गेला असेल. जीवन नावाचा त्याचा एक मित्र आहे.' भाऊराव म्हणाले.

"थोड सरबत घेऊन जा. थाबा—" आनदी येऊन म्हणाली

थडगार सरबत सारे प्याले.

"शात झाल मन!" नारायण म्हणाला

"पुरुष म्हणजे आग, स्त्रिया म्हणजे शाति" भाऊराव म्हणाले.

"बर येतो" नारायण म्हणाला.

दोघ मित्र बाहेर पडले. काही अतरापर्यंत मनोहर पोंचवावयास गेला होता.

"नारायण, हिमालयाचे पवित्र वारे तुझ्या मनोहरकडे पाठव. तुझ्या तपस्येंतील काही सुगध, काही सयम मनोहरकडे मधून मधून धाड." मनोहर कपित आवाजानें म्हणाला.

" आपले बाह्य मार्ग निराळे दिसले, तरी आपल अनरग एक आहे एकाच हिमालयातून सिंधु व ब्रह्मपुत्रा निघाल्या. त्या दोन भिन्न दिशानी गेल्या, पण शेवटी सागरालाच मिळाल्या जातों मनोहर." असें म्हणून तो गेला. दिसेनासा झाला तरीहि मनोहर तेथेंच उभा होता. दिसेनाशा झालेल्या मित्राला बघत होता !

— — —

# मेळा

## १३

वसतऋतु आला म्हणजे ताराबाई मेळा तयार करीत असे. निरनिराळ्या वसतपूजाचे ठिकाणी मेळ्याला निमत्रणें येत व मेळ्याचे कार्यक्रम होत. हळदीकुकवाचे समारभ जेथें होत तेथें तो मेळा बोलावला जाई. आनदाला मेळ्याचे वेळेस ती आणणार होती मेळ्यासाठी काही सवाद लिहून ठेवा असें पत्र पाठवून मनोहरला तिनें प्राथिलें होतें. मनोहरला लिहिलेलें तें पहिलें पत्र होतें. 'सवाद तयार आहेत' असें त्याचें उत्तरहि आलें होते.

एके दिवशीं तारा फुलगावला जाण्यासाठी निघाली. आनदासाठी तिनें खाऊ घेतला होता. ती पायी निघाली होती. पहाटेची वेळ झाली होती. बाहेर कोकिळा कूऊ कूऊ करून उपनिषद् आळवीत होती. वसतऋतूंतील वैभव पाहून हें वैभव फुलवणारा कोठें आहे, खरेंच कोठें आहे, असें ती कोकिळा विचारीत होती, का असे हें वैभव फुललेलें असता माझा प्रियकर कोठें आहे, माझा हृदयदेव कोठें असें ती विचारीत होती?

किती तरी वर्षांनी तारा आज इतक्या लाब पायी जात होती. आपल्या बाळाला पोटाशी धरून जवळ जवळ आठनऊ वर्षांपूर्वी ती अशीच भटकत

असे. ते दिवस तिला आठवले तो पायाना विळखा घालणारा साप तिला आठवला. ती घाबरली. अद्याप बाहेर स्वच्छ प्रकाश पडला नव्हता. पुन्हा एखादा साप नसेल ना रस्त्यावर असें तिच्या मनात आलें परतु तिला हसू आले आपण किती घाबरट असें तिला वाटलें ती गाऊ लागली. ही कोण कोकिळा पहाटे रस्त्यातून गात जात आहे असें झाडावरच्या कोकिळेस वाटले. मध्येंच तारेला स्फूर्ति येई व तीहि कुऊकुऊ करी. माझा हृदयदेव कोठे आहे, माझा प्रियकर कोठें आहे, असे का ती त्या गूढ शब्दानी पुकारीत होती? तिलाहि माहीत नव्हतें, कूऊ कूऊ करीत ती पळत सुटे. जणू हातून निसटलेल्या वस्तूचा ती पाठलागच करीत होती.

तो नाला आला. त्या नाल्यात आता पाणी नव्हतें. तो कोरडा होता. तेथेंच तिनें पारवराचें जोडपं मनोहरला दाखविलें होतें. तेथेच आता मला 'हाकलू दे गाडी' असें त्याला ती म्हणाली होती 'आपण पाखेंर नाहीं, आपण सयमशील माणसें आहोंत' असे मनोहर तिला म्हणाला होता. तिला तें सारें आठवलें. ती त्या नाल्यात बसली. अद्याप वाळू गार होती मनोहरसबधीं मनोहर विचार करण्यात ती तल्लीन झाली. एखाद्या व्यक्तीवर आपलें प्रेम असणें म्हणजे का पाप आहे? परतु हें प्रेम आहे का पागलपणा आहे? या प्रेमाची खोली किती? या प्रेमाला पोखरून पाहिलें तर आत हाताला काय लागेल? मला एकटें एकटें वाटते हा का माझा दोष? एकटें असणें म्हणजे अनैसर्गिक आहे. कोणाच्या तरी जवळ असण्यात आनद आहे. मनोहर मला नसतील मिळणार म्हणून का त्याची मूर्तिहि मी मनात आणता कामा नये?

तारा उठली. ऊन्ह फार होण्यापूर्वी तिला पोंचलें पाहिजे होते. चालण्याची तिला सवय नव्हती. तिचे पाय थकले. आपण गाडी घेऊन का आलों नाहीं असें तिच्या मनात आलें परतु आता बोलून काय? आपल्याला एवढेंसें चालवत नाही याची तिला लाज वाटली मनोहर खेड्यापाड्यातून हिंडतात. लहान लहान मुलेंहि त्याच्याबरोबर जातात. ती थकत नाहींत आणि मीं का थकावें? 'हा खोटा थकवा आहे. पायानो, भराभर चला,' असा ती हुकूम सोडी.

फुलगावच्या शाळेवरचा उच झेंडा दिसू लागला. आलें एकदाचें गाव. ती गावामध्यें शिरली. ताराबाई पायीं आलेली पाहून लोकाना आश्चर्य वाटलें.

ज्योतिबाचा मुलगा लाडक तिला रस्त्यात भेटला. त्याच्याच पत्नीची तिने सुटका केली होती

" कसा आहे रे तुझा मुलगा ? " तारेनें विचारले.

" चागला आहे आई पायी आल्यात तुम्ही ? आधीं कळवल असत तर गाडी पाठवली असती " तो कृतज्ञतेनें म्हणाला

" म्हटल पायींच जाव तुमच्या बायका पायी जातात आम्हाला पदोपदीं गाड्याघोडी लागतात आम्ही पोशी-पोषाखी माणस ! " ती हसत म्हणाली

लाडक ताराबाईबरोबर चालत होता शाळेंतील मुलें घरी जात होती

" मन्यादादा गेला का रे घरी ? ' लाडकनें एकाला विचारले.

" हो. आनद व ते आत्ताच गेले. " मुलानें सागितले.

" लाडक, मी जातें. कशाला येतोस ? " ती म्हणाली.

" चार पावल तुमच्याबरोबर चालून थोडाच दमणार आहे ? " तो विनयानें म्हणाला.

मळा आला भाऊराव अद्याप काम करीत होते आनद तेथें बाहेरच होता तो धावतच पुढें आला.

" आज कुणाच दुखत आहे पोट ? " त्याने विचारलें

लाडकला हसू आलें. तारेलाहि हसू आवरलें नाही ती म्हणाली, " आज माझ पोट दुखत आहे "

" काहीं तरी तुम्ही तर चालत आल्यात. पोट ज्याच दुखत तो का चालेल ? " त्यानें विचारलें

" ज्याच पोट दुखत तोच चालत येतो " तिने उत्तर दिले

' लाडक, आता जा ह " तारेनें सागितलें

लाडक निघून गेला

मन्यादादाहि आला. तारा घरात गेली आनदीस आनद झाला.

" एकदम आल्यात, आधीं कळवलतहि नाही ! " आनदीनें विचारले.

" आल मनात, निघून आलें सवाद तयार आहेत अस मनोहराच पत्र आल होत म्हटल घेऊन याव " तारा म्हणाली.

" आणि पायीं आल्यात ? थकल्या असाल. " आनदी म्हणाली.

" थकवा पार निघून गेला. तुमचा मळा म्हणजे आश्रम. जिथ कितीहि कष्ट

केले तरी श्रम वाटत नाहीं तो आश्रम आश्रमात येताच श्रमपरिहार होतो" तारा हसून म्हणाली.

"आमचा हा गृहस्थाश्रमच आहे अजून!" आनदी हसून म्हणाली

'धन्यो गृहस्थाश्रम:' तारेनें चरण म्हटला

"तुम्ही मला मेळ्यासाठी नेणार होता ना? फसवलत मला?" आनदानें विचारलें.

"मेळा अद्याप व्हायचा आहे सवादासाठी आलें आहे तुला नेण्यासाठीहि आलें आहे" तारेनें सागितले

खोट! काही तरीच पायी तर आल्यात मला का कडेवरून नेणार आहात? मी का आता लहान आहे कुकुल बाळ? तुम्ही मला उचलाल का तरी!" आनदा म्हणाला

"तू कुकुल बाळ नाहींस तर पायी जा त्याच्याबरोबर." मनोहर म्हणाला

"पण आपण गाडीतूनच जाऊ त्याना तर आता चालवणार सुद्धा नाहीं त्या पहा आपले पाय चेपताहेत. तूहि येशील ना मन्यादादा?" आनदानें विचारलें

"मला काम आहे गोपाळ येईल गाडीबरोबर" मनोहर म्हणाला

"नाहीं तर मीच हाकीन गाडी नाही चालणार?" त्यानें विचारलें

"हा घे तुला खाऊ" तारेनें खाऊ दिला.

"तुम्ही अग धुवा. जा रे आनदा, त्याना पाणी दे आधीं. मग खा खाऊ." आनदीनें सागितले.

"तुमच्या नेसू खादीच पातळ का नाहीं? मन्यादादाला खादी म्हणजे प्राण म्हणूनच तो तुमच्याबरोबर येणार नाही. तुमचा राग आला असेल त्याला आई तर खादीची पातळ नेसते भाऊ आईच्या पातळासाठी सूत काढतात व आई भाऊच्या धोतरासाठी. नाही का हो भाऊ?" मळ्यातून येणाऱ्या भाऊना आनदाने विचारले

"तुम्ही मधून मधून येणार होतात, आज शेवटी आल्यात?" भाऊराव म्हणाले.

"वेळच होत नाहीं." तारा म्हणाली

तारा अग धुऊन आली भाऊराव आघोळ करून पूजा करीत होते. आनदा पानाची तयारी करीत होना मन्यादादा काय करीत होता ? कोठें गेला होना तो ? आनदानें मन्यादादाला हाका मारल्या.

" कुठ रे गेला होतास ? " आनदाने विचारलें

" गाण करीत होतो " मनोहर म्हणाला

" आत्ता बाग वाजता आली स्फूर्ति ? " तारेनें विचारलें

" सूर्य डोक्यावर आला म्हणजेच वारे उठू लागतात." त्याने उत्तर दिलें.

" तुम्ही पोटभर जेवा आता " आनदी तारेस म्हणाली

" तुम्हा सर्वांना पाहूनच पोट भरल " तारा बोलली

" मग उठा हो खर असेल तर ? " आनदा म्हणाला

" चावट आहे ! " आनदी म्हणाली

" मला खर ते आवडत खोट बोलू नये अस मोठी माणसे सागतात व स्वत.च खोट बोलतात." आनदा म्हणाला.

" जेवताना गोविंद गोविंद म्हण " आनदी म्हणाली

" तुम्ही म्हणता का हो गोविंद गोविंद ? आईच आपल काही तरीच. लहान मुलाना काहीहि सागाव ! " आनदा म्हणाला.

" मी आजपासून तुझ्याजवळ बोलणारच नाही " आनदी म्हणाली

" मग मी रडेन." तो म्हणाला.

" शेवटी रडुबाईच ! " मन्यादादाने चिडविले

" असू दे जा, रडुबाई आहे मी, तर सभेत मला गाणी म्हणायला का सागतोस ? " आनदानें विचारले.

" बाकी आनदाचा आवाज गोड गोविदराव असते तर त्याना आनद आवडता." भाऊराव म्हणाले.

" नको त्याची आठवण " आनदी म्हणाली.

तारा पटकन् उठून गेली. ती हात धुऊन आली.

" मागूनचा भात नाहीं घेतलात तो ? " आनदीनें विचारलें.

" विसरल्या. आता पुन्हा बसा हो. " आनदा हसून म्हणाला

" माझ खरोखरच पोट भरल." तारा म्हणाली

" अति श्रमान जेवण जात नाहीं." भाऊरावानी सागितलें.

"अति सर्वत्र वर्जयेत्" मनोहर म्हणाला
तारा तेथून बाहेर आली.

"आनदा, तुझ झाल ना जेवण? त्याना घोंगडी वगैरे दे जा एखादी अथरायला, पड्ड दे जरा त्याना." आनदीनें सागितले.

आनदा गेला तारा तेथेच बाहेर उभी होती

"तुम्हाला झोपागच आहे ना? कुठ झोपता?" आनदानें विचारले

"तू सागशील तिथ" ती म्हणाली

"इथ खूप उजेड आहे, त्या खोलीत जरा गार वाटत मन्यादादा दुपारीं तिथ लिहीत बसतो. तिथ पडा मन्यादादाची घोंगडी आहेच तुम्हाला घोंगडी बोचेल का?" आनदाने विचारलें

"तुम्हाला नाही ना चोचत?" तिनें विचारलें

"मला बोचते बुवा मन्यादादाला नाही बोचत मोठ्या माणसाचं टणक होत अग. लहान मुलाच मऊ असत नाहीं?" आनदा म्हणाला.

"आनदा, उगाला दे रे काही?" तारेनें सागितलें.

"ती घ्या पिशवी—मन्यादादाची प्रवासी पिशवी ही पिशवी म्हणजे मन्यादादाची उशी हो–!" आनदा म्हणाला

तारा निजली. तेथील एक शाल तिनें पाघरायला घेतली. दमून गेली होती ती मनोहर कातीत बसणार होता फळीवरचे पेळू आणण्यासाठी त्या खोलीत तो गेला अगदी हलक्या पावलानी तो गेला व हलक्या हातानी पेळू काढू लागला. पेळूची पुडकी बाधलेली होती, परतु एकदम पुडकी खाली पडली. तारेच्या अगावर पडली ती एकदम दचकून उठली तिचे हात मनोहरच्या अगाला लागले.

"काय पाहिजे?" तिने विचारले

"काही नको. पेळू हवे होते. तुम्ही झोपा तुमची झोपमोड झाली?" मनोहर म्हणाला.

पेळू घेऊन मनोहर निघून गेला. तारा पुन्हा पाघरूण घेऊन निजली. काहीं वेळ झोप येईना. परतु नतर गाढ झोप लागली. किती तरी वेळानें ती जागी झाली

" तुम्ही मला कुणी उठवल का नाहीत ? " तिनें विचारलें.

" झोपेतून उठवण पाप ! " भाऊराव म्हणाले.

" देशाची झोप उडवली पाहिजे, अस मन्यादादा मोठमोठ्यानें सांगतो.

देशाची उडवा झोप । भाग्याचा झाला लोप

अस त्यान गाण नाहीं का केल ? " आनंदाने विचारले

" हुशार आहेस तू " तारा म्हणाली

" पण आई मला वेडा म्हणते " तो म्हणाला

" मग खर कोणत ? " तिनें हसून विचारलें

" आई सांगेल तेच खर " आनंदा म्हणाला

" तू येतोस ना माझ्याबरोबर ? आठ दिवस राहा " तारा म्हणाली

" आठ दिवस ! मला कंटाळा नाही आला तर राहीन. चालेन ना बाबा ? " त्याने विचारलें

" चालेल. मेळ्यात गाणी म्हण तुझ गाण ऐकून लोक टाळ्या वाजवतील. तुला पदक बक्षीस मिळतील जा—" भाऊराव म्हणाले.

" मन्यादादा, तू येतोस पोंचवायला ? " आनंदाने विचारलें

" गोपाळाला सांगितल आहे मला काम आहे बाळ " मनोहर म्हणाला.

" सेवासदन सोडाव अस कधी कधी मनात येत. तुमच्या स्वराज्याचा प्रचार करावा अस वाटत." तारा म्हणाली.

" मन्यादादाची पिशवी याच्या डोक्यात भरली ! " आनंदा हसत म्हणाला.

" कस बोलतोस तू " तारेने आनंदाला जवळ घेऊन म्हटले.

" मन्यादादाच एका मित्राला अस म्हणाला होता. त्या मित्रान ही पिशवी घेतली उशाला व झोप झाल्यावर तो म्हणाला, 'आपणहि सत्याग्रहात येऊ.' तेव्हा मन्यादादा 'माझी पिशवी तुमच्या डोक्यात शिरली वाटत ? अस म्हणाला होता. नाहीं का रे मन्यादादा ? " आनंदानें विचारलें.

" सेवासदनात राहून तुम्ही सेवाच करीत आहात. वेळ आली व राहवलच नाहीं तर या संस्था सोडून. आज कशाला सोडता ? संस्थेत राहून जितक काम करता येत, तितक एकटं राहून करता येत नाहीं." भाऊराव म्हणाले.

" तुम्हाला उशीर होईल. आता निघा तुम्हाला पोचवून गोपाळाला रात्रीं दहापर्यंत गाडी परत घेऊन आल पाहिजे. हे घ्या सवाद. ही काही गाणीं आहेत." मनोहर म्हणाला.

" किती चागल आहे अक्षर ! " तारा म्हणाली

" गोविदरावाच यापेक्षा सुदर होत, नाहीं मनोहर ? " भाऊराव म्हणाले.

" गोविदरावाच सार सुदर होत. परतु त्या सौदर्यांत आत्मा नव्हता, प्राण नव्हता, त्याच शील सुदर नव्हत." मनोहर म्हणाला.

" गाडी जोडली आहे " गोपाळनें येऊन सागितलें.

" आनदाचे कपडे, त्याची वळकटी—" भाऊरावानी सुचवलें

" तिथ आहे भरपूर अथराय-पाघरायला. कपडे घेतले त्याचे." तारा म्हणाली.

" आनदा, हट्ट नको करू. कटाळलास तर ये परत " आनदी म्हणाली.

" आई, आज कोकिला सारखी ओरडते आहे. तिच का काहीं हरवल आहे ? ती का आपल्या पिलाना हाका मारीत आहे ? ही बघ कशी ओरडत आहे ? कूऊ कूऊ—" आनदा एकदम म्हणाला.

" कुऊवाल्या, आता गाडीत बस." मनोहर म्हणाला.

तारेनें सर्वांचा निरोप घेतला. ती गाडीत बसली. आनदा पुढे बसला अगदी. मनोहर गाडीबरोबर जात होता.

" मन्यादादा, तू सुद्धा ये. गाडीत बस मग उतर " आनदा म्हणाला.

" नको, गाडीत गर्दी आहे." मनोहर म्हणाला.

" गर्दी कसली ? आम्ही तिघच आणि मी तर लहान पाच-पाच माणसं सुद्धा बसतात. तुम्ही मन्यादादास सागा हो." आनदा तारेस म्हणाला.

तारा बोलली नाही मनोहरहि काही बोलला नाहीं गाडी गावाबाहेर आली.

" तुम्ही येता का ? " तारेने विचारलें.

" नको काम आहे." तो म्हणाला.

" कुऊ कुऊ " आनदानें केलें.

इतक्यात लाडक आपला मुलगा घेऊन आला.

" तुमच्या पायावर घालू दे. तुम्ही पुण्यवान माणस " असें म्हणून लाडकनें

आपल्या मुलाचें डोकें तारेच्या पायावर ठेवले तारेने तो बाळ हातात घेतला त्याचा तिनें मुका घेतला

" उन्हातून कशाला आणलास? लाल बघ झाला आहे!" तारा परत देताना म्हणाली

" शेतकऱ्याच्या मुलाला ऊन नाही, पाऊस नाही. माग मन्यादादानी सागितल होत एकदा, कीं रजपूत लोकात मुलगा झाला तर त्याला तरवार दाखवीत, मुलगी झाली तर दिवा दाखवीत मुलग्यान लढता लढता मराव मुलीन शत्रूच्या ताब्यात जाण्यापेक्षा जाळून घ्याव, असा त्यात हेतु असे शेतकऱ्याच्या मुलाना ऊन दाखवाव " लाडक म्हणाला

" गोपाळ, जाऊं दे गाडी." मनोहर म्हणाला

गाडी निघाली मनोहर व लाडक माघारे वळले मनोहरनें एकदा वळून पाहिलें. तारेनें साश्रु प्रणाम केला. गाडी दौडत होती. आनदा पुढे पुढें होऊन बैलाच्या शेपेस हात लावीत होता

" फार नको वाकू बाळ, पडशील " तारा प्रेमानें म्हणाली.

" मुल नाहीं पडत, मोठी माणस पडतात." आनदानें सागितले आनदाचा उत्साह काहीं वेळ होता. परतु पुढें तो कटाळला.

" मी तुमच्या माडीवर निजू?" त्यानें विचारलें

" ये नीज हो " तारा म्हणाली.

तारेच्या माडीवर डोके ठेवून आनदा झोपी गेला ती त्याला मधून मधून थोपटी. त्याच्या केसावरून हात फिरवी. सुदरपुर जवळ आलें. तिनें मोठ्या प्रेमानें आनदाला उठवलें गोपाळ गाडी घेऊन परत गेला

जेवणें वगैरे झाल्यावर रात्री आनदा चित्राची व गोष्टीची पुस्तके पाहत होता. तारेनें अथरूण घातलें

" तू मजजवळ निजशील ना रे? आईचा हात पाठीवर असल्याशिवाय तू निजत नाहीस. आज मी माझा हात तुझ्या पाठीवर ठेवीन—" तारा म्हणाली

" पण तुमच्या अथरुणावर खादीची चादर नाहीं मी का याच्यावर निजणार? तुम्ही खादी नाही वापरीत मग मला कशाला आणलत? मी आपला जमिनीवर निजेन " आनदा म्हणाला

' उद्या की नाही आपण खादी आणू खादीची मला पातळ आणीन अथरुणावरची खादीची चादर आणू तुला खादीचे नवीन कपडे करू आजच्या दिवस नीज ये एखादे दिवशी नसली खादी म्हणून काय झाल ? " तारा म्हणाली

" परतु उद्या नक्की आणाल ? गाडीतसुद्धा तुमच्या माडीवर मी झोपलों तुमच्या नेसू तर खादी नाही जिथ खादी नाहीं तिथ खाऊ नये अस मन्यादादा म्हणतो " आनदा म्हणाला

" तुला झोप येते ना ? ये नीज–" तारा त्याला जवळ घेऊन म्हणाली

आनदास झोप येत होती म्हणून ताराहि लवकर झोपली आनदास कुशीत घेऊन निजण्याचा मोक्ष तिला अनुभवावयाचा होता. दोघेंजण निजून गेली

दुसऱ्या दिवशी तारेनें खादीची खरेदी केली आनदासहि तिनें एक खादीचा सुदर पोषाक करून दिला. तिने खादीची पिशवी घेतली. घड्याळाला खादीचा पट्टा घेतला. पैसे ठेवण्याचे पाकीट खादीचें घेतलें

" तुम्ही घोंगडी नाही घेत ? " आनदानें विचारले.

" घोगडी कशाला ! गादी तर आहे." तारा म्हणाली.

" घोंगडीवरच निजाव, घोंगडीच पाघरावी, अस मन्यादादा म्हणतो." आनदा म्हणाला

" घोगडी बोचते म्हणून तूच फुलगावला म्हणालास ना ! " तारेनें आठवण दिली.

" नुसत्या घोंगडीवर निजल तर मन्यादादा नुसत्या घोगडीवरच पडतो. तो म्हणतो, 'घोगडी म्हणजे कृष्णाची काळी गादी' तुम्ही सुद्धा घ्या. मन्यादादा एखादे वेळेस आला तर त्यालाहि निजायला होईल." आनदा म्हणाला.

तारेनें दोन घोंगड्याहि खरेदी केल्या.

" हा मुलगा तुमचा गुरुच आहे. कुणाचा हा ? " खादीभाडारातील माणसानें विचारले.

" हा माझाच ! " एकदम तारा बोलून गेली.

" मी का तुमचा मुलगा ? " आनदानें विचारलें.

" अरे थट्टा केली. हा फुलगावच्या भाऊरावाचा मुलगा " तारेनें सागितलें.

" म्हणजे तो आगगाडीतला का ? " त्या माणसानें विचारलें.

" मला माहीत नाही " तारा म्हणाली

" काही तरीच हे बोलतात मी का आगगाडीतला ? मी का डबा आहे की इंजिन आहे ? चला, आपण जाऊ " आनदा तारेचा हात धरून म्हणाला

दोघें घरी आली तारेचें मेळ्याचें काम दुपारी सुरू झालें. कांहीं सवाद तयार झाले होते नवीन आणलेले फक्त शिकवायचे होते. तारा मुलीना शिकवीत होती निरनिराळी पदें सागत होती

" आनदा, तू पण करणार ना रे मेळ्यात काम ? " तारेनें विचारलें.

" परतु या तर साऱ्या मुली. मी मुलगी नाही होणार ! " आनदा म्हणाला.

" मुली का वाईट असतात ? " तारेनें हसून विचारले

" त्या तुरुगात येतील ? फटके खातील ? मुली तर रडक्या असतात." आनदा म्हणाला

" सावित्री तर यमाजवळ भाडली, सत्यभामेन नरकासुर मारला. सीता, द्रौपदी, दमयती वनात गेल्या झाशीची राणी कशी लढली ? मुली रडक्या नसतात. त्या दुसऱ्याना रडवतात " तारा म्हणाली.

या गोष्टी मला माहीत आहेत. शाळेंत मन्यादादा शिकवतो. पद्मिनीन जाळून घतलें. अहल्याबाई सुद्धा लढायला जात असे." आनदा म्हणाला.

" मग करशील ना तू काम ? " तारेनें पुन्हा विचारलें.

" कसल पण ? " त्यानें विचारलें.

" तें पाहू. तू एक गाण म्हण बर " तारेनें सागितलें.

" कोणत म्हणू ? " त्यानें विचारलें.

" खादीच, देशाच म्हण " तारा म्हणाली.

आनदा पद म्हणू लागला. तारा पेटी वाजवीत होती.

**गाणें**

खादि न का घेइ कुणी ॥ ध्रु० ॥
गोरगरिबा देई खाया
गोरगरिबा देई छाया
खादी असे बहुत गुणी ॥ खा० ॥

निज शरिरावर खादी घाला
निज बधूच्या हरवा हाला
किती सागति गाधि-मुनी ॥ खा० ॥

जो न कधीही खादी घेई
तो निजदेशा नाशा नेई
जनतेचा होइ खुनी ॥ खा० ॥

किती छान म्हटले आनदाने गाणें मुली म्हणू लागल्या, "पुन्हा म्हण रे, पुन्हा म्हण रे." आनदाने पुन्हा म्हटलें.

खादीच्या सवादात आनदाला काम मिळालें. आणि एक गोकुळातील सवाद होता त्यात तो कृष्ण झाला.

"कृष्ण होता काळा-सावळा. मी तर आहे गोरा." आनदाने शका काढली.

"नाटकात काळयाना गोर करता येत, गोऱ्याना काळ करता येत. तुझ्या डोक्यावर मोराच्या पिसाचा मुकुट ठेवू हातात बासरी देऊ, तुला छान सजवू." तारा म्हणाली.

"परतु देशी सजवा हो. नाही तर मन्यादादा रागावेल. आई रागावेल. आई मला खेळण सुद्धा देशीच देते" आनंदानें सागितले.

यदाचा मेळा अप्रतिम होणार असे सर्वत्र आले होतें. मेळयाचा पहिला कार्यक्रम थिएटरमध्येंच करावा असें ठरलें. भाऊराव, आनदी, मन्यादादा पाहावयास आली होतीं आनदाच्या मित्राला, जीवनलाहि त्यानीं आणलें होतें. ते सारे गुलाबचद शेठकडे उतरले होते. सेवासदन पाहून, तारेला भेटून तीं गेलीं.

"आम्हाला पाहून आनदा लाजशील हो." आनदीनें सागितलें.

"तुम्हाला पाहून उलट मला जोर येईल. जीवन तर टाळया वाजवील." आनदा म्हणाला.

"मी सारख्या टाळया वाजवीन" जीवन म्हणाला

"आम्ही सागू तेव्हा वाजव." मन्यादादा म्हणाला

अपार गर्दी जमली होती. व्यवस्था चांगली होती. स्वयसेविका उत्कृष्ट काम करीत होत्या. निर्भयपणें त्या वावरत होत्या. एक गृहस्थ तिकिटाशिवाय आत जाऊ लागला. त्याला प्रतिबंव झाला तरी तो जोरानें जाऊं लागला. त्या स्वयसेविकेनें त्याला ओढलें. दुसरीहि एक स्वयसेविका तेथें आली तो टवाळ मनुष्य मागें गेला. त्याला कोणी चिडविलें, 'पोरींनी पिटाळल तुम्हाला. कशाला राव जगलेत ?' परतु त्या टवाळाने उत्तर दिलें 'पोरींचे हात तर अंगाला लागले त्यांच्याशीं धिंगामस्ती करण्याच भाग्य तर लेका मिळाल !'

आनदाचें "खादि न का घेइ कुणी" हें पद लोकाना फार आवडलें. त्यानें तें पुनः पुन्हा म्हटलें शेवटी तारेनें येऊन सागितलें, "लहान मुलाला पुनः पुन्हा म्हणायला लावून दमवू नका. मी प्रार्थना करतें" आणि कृष्णाच्या वेषातहि तो किती गोड दिसत होता! सारे सभागृह स्तब्ध होतें. तो गोकुळातील सवादहि नवीन दृष्टीनें लिहिलेला होता.

"कृष्णा, तू का गोपींचीं वस्त्र पळवलीस ?" यशोदा त्याचे हात धरून विचारते.

"नाहीं ग आई. या गोपी गोकुळातील लुगडीं का वापरीत नाहींत ? गोकुळातील लोक मग उपाशी मरतात. तूं मला गोकुळात बनलेली घोंगडी दिलीस. तू स्वतः गोकुळातील लुगड नेसतेस, परतु याना हवींत बाहेरची. तो कस छळतो, तरी तिकडील लुगडी घेतील, तिकडील माल घेतील. किती सागितल तरी या गोपी ऐकतच नाही. आम्हीं सर्व गोपाळानीं गोकुळातील खादी, गोकुळातील घोंगडीं घ्यायच व्रत घेतल. परतु या बायकाचा आपला तोच हट्ट. त्याची फजिती करण्याच ठरवल. पळवली लुगडीं. त्याना सूर्याला साक्षी ठेवून शपथ घ्यायला लावल्यावर मग दिलीं परत. आपल गोकुळ सुखी ना करायच, आई ?" असें कृष्ण म्हणतो व मग सुदर गाणें गातो.

मेळयातील अनेकाना बक्षिसें मिळालीं. परतु आनदावर देणग्याचा वर्षाव झाला. कुसुमचे वडील सुखलालशेठ बक्षीस देताना म्हणाले, "मी गाण्याचा द्वेष्टा बनलों होतों. परतु आज पुन्हा प्रेमी बनलों. गाण जगाचा उद्धार करील. 'खादी न का घेइ कुणी' हे पद ऐकून मी आजपासून खादी वापरण्याच ठरवल आहे. कुमार आनदाला हें रिस्टवॉच मी बक्षीस देतों."

तारेनें मनोहरला आभार मानण्याचें काम करा अशी प्रार्थना केली होती. त्यानें ती झिडकारली नाही. त्यानें फारच सुंदर भाषेत आभार मानले स्वयंसेविका, मेळ्यातील मुली, यांच्या कामाचीहि त्याने तारीफ केली. तो म्हणाला, "स्त्रियांचा आत्मा जागृत होत आहे एकदां स्त्रियांचा आत्मा जागा झाला म्हणजे सारा समाज खडबडून उठल्याशिवाय राहणार नाही. असे मेळे खेड्यापाड्यांतूनहि गेले पाहिजेत. हे मेळे म्हणजे केवळ करमणूक नाही. हे मेळे म्हणजे पेटती मशाल आहे असले मेळे राष्ट्र पेटवतील व पारतंत्र्याच भस्म करतील सेवासदन लोकांच्या शुश्रूषेच काम करीतच आहे. तें पुण्यकर्म आहेच ताराबाई प्रसूतितंत्र उत्कृष्ट जाणतात तें काम त्या कुशलतेनं करतात. परंतु नवभारताचाहि जन्म होत आहे. तें कामहि त्या उत्कृष्टपणें करतील अशी आशा आहे. लोकांची रोगट मत, बोथट बुद्धि, संकुचित भावनाशून्य हृदय या सर्वांना निरोगी करण्याच महान् शुश्रूषाकर्म आहे. तें या मेळ्यांनीं होईल, परिणामकारक रीतीनं होईल असं मला वाटतं. आश्रय देणाऱ्या सहृदय प्रेक्षकांना व मेळ्यातील सर्व लहानथोरांना मी मनःपूर्वक धन्यवाद देतों. आतां 'वंदे मातरम्' गीत होईल व कार्यक्रम समाप्त होईल."

मेळ्याची कीर्ति पसरली अनेक कार्यक्रम झाले. सेवासदनाच्या पुण्याच्या मुख्य शाखेनें पुण्याला कार्यक्रम करण्याचें ठरविलें. पुणें म्हणजे रसिक टीकाकारांचें व सटीक रसिकांचें माहेरघर, परंतु तेथेंहि मेळ्यानें वेड लावले. कुमार आनंदाचे फोटो वर्तमानपत्रांतून आले. पुण्यास एका कार्यक्रमानें भागलें नाहीं. दोनतीन करावे लागले. परंतु पुण्याला एक प्रसंग आला. मेळ्याची कीर्ति जनतेंत पसरली व सरकारांतहि गेली. संवाद आक्षेपार्ह ठरून जप्त करण्यात आले कार्यक्रम बंद झाले. सुंदरपुरला ते पास करण्यात आले होते असे सांगण्यात आलें परंतु त्याचा उपयोग झाला नाहीं. गोकुळांतला संवाद सरकारला फारच झोंबला. संस्थेत राहून राष्ट्रजागृतीचें काम करणें म्हणजे तारेवरची सर्कस आहे ही गोष्ट तारेच्या लक्षांत आली. पारतंत्र्यांत संस्था चालविणें कठीण. मर्यादा सांभाळून, सरकारी तंत्रें सांभाळून काम करावें लागतें. इकडे मग जहाल लोकांच्या शिव्या खाव्या लागतात. मनाची शांति ठेवून होईल ती जनसेवा करावी लागते.

मेळा घेऊन तारा परत आली. आनंद फुलगांवला जाणार होता, परंतु

एकाएकी त्याला थंडी भरून ताप आला. साधाच ताप परंतु तारा घाबरली. तिनें औषध वगैरे दिलें रात्री त्याच्याजवळ ती बसली होती. देवाला प्रार्थीत होती.

" आईजवळ मला न्या " आनंदा म्हणाला.

" नेईन बर " तारेनें प्रेमाने संबोधिलें तारेच्या मनात विचाराचें काहूर माजले. आपले कांहीं पाप तर नाहीं ना आनंदाला बाधलें? ती आपल्या सर्व जीवनाचा विचार करीत होती. तिचा मुलगा तापाने तेथें फणफणत होता. तिचा मुलगा! त्या मुलाचा तिने त्याग केला होता आणि त्या मुलाचा जन्मदाता? त्या मुलाच्या जन्मदात्याम ती विसरून गेली होती. मनोहरच्या मूर्तीने तिचा हृत्प्रांत व्यापिला होता तिच्या जीवनात मनोहर भरला होता. ज्या मनात मनोहर भरला, त्या मनाला आनंद स्वत:चा समजण्याचा काय अधिकार? जे हात मनोहरचे हात हाती घेण्यासाठी अधीर झाले होते ते हात आनंदाच्या आत्म्यास तारक वाटतील की मारक? तारेच्या हृदयात शततरंग उठले. तिचे डोळे भरले ती केविलवाणी झाली तिनें एकाएकीं मनात काही निश्चय केला. तिचे डोळे एकदम निराळे झाले. मुखावर मंगल गंभीरता रंगली ती आपल्या ट्रंकेजवळ गेली.

" आई, नाहीं इथ आई " आनंदा म्हणाला.

आनंदाचे असे ते शब्द तिला निखाऱ्याप्रमाणें भाजीत. दग्ध करीत तिचे हृदय. पोळून निघे मन मी बाळाची आई नाही. पुरी आई नाही. जोंपर्यंत मनोहरचा विचार मी दूर केला नाहीं, तोंपर्यंत बाळाची मी खरी आई कशी होऊ? होऊ दे, खरी आई होऊ दे. तिनें ट्रंक उघडली. वरचें सर्व सामान काढले. अगदीं तळाला तिनें हात घातला. जणूं हृदयाच्या तळाला तिने हात घातला. समुद्राच्या तळचें दडलेलें मोती वर काढावे त्याप्रमाणें ट्रंकेच्या तळचें तिनें काही तरी काढलें. हृदयाच्या तळाशी बसलेलें रत्न पुन्हा तिने वर काढलें. तो एक फोटो होता. तिच्या पतीचा तो फोटो होता. त्यावर तिने मस्तक ठेवलें, त्यावर डोळयातील पाण्याचें अर्घ्य ओतलें. डोळयातील पाण्यानें ते पतिचरण धुतले. ते पतिचरण पदरानें पुसले. तिनें तो फोटो हृदयाशी धरला. क्षणभर तिची तन्मयता झाली.

" आई, ये ग आई." आनंदा बोलला.

' आले हो बाळ. खरी आई होऊन येते " तारा म्हणाली. तो फोटो तसाच हृदयाशी धरून ती आनंदाजवळ गेली.

" देवा, माझा एकच पति मनोहराकडे त्या भावनेनें अतःपर मी पाहणार नाही मुलीला क्षमा कर. पदरात घे बाळाला बरा कर " तिनें प्रार्थना केली

तो फोटो तसाच जवळ घेऊन ती तापाने फणफणणाऱ्या आनंदाजवळ निजली. त्याला तिनें जवळ घेतले. आनंदा तापात होता. ती अनुतापात होती तिच्या अनुतापानें आनंदाचा ताप विरघळला

" आई, घाम." तो म्हणाला

कोणाला त्याने आई म्हटलें? तारेला म्हटले—का तो फुलगावच्या आईला हाक मारीत होता? परंतु तो शब्द तारेला अमृताप्रमाणे वाटला तिने बाळाचा घाम पुसला. आनंदा मोकळा होऊ लागला तिनें त्याला कढत दूध दिलें दोघे मग झोपी गेली.

दुसरे दिवशी मनोहर गाडी घेऊन आला होता आनंदा जरा सुकून गेला होता.

" मीहि येतें बरोबर. बाळाला पुन्हा ताप आला तर तिथं राहीन. मी तसं संस्थेत सांगितलं आहे येऊ ना?" तारेनें विचारले.

मनोहर मातेला नकार कसा देणार? आजारी मुलाला आईपासून दूर कसा नेणार? गाडी निघाली आनंदाचें डोकें मांडीवर घेऊन तारा बसली होती. गार वारा सुटला होता. तिनें आनंदाच्या अंगावर पांघरूण घातलें.

" हवेंत गारवा आला आहे." मनोहर म्हणाला.

" पाऊस पडला असेल कुठं." ती म्हणाली.

पुन्हा कोणी बोललें नाही. मने बोलावयास अधीर होतीं, परंतु ओठ बोलू शकत नव्हते. तो नाला आला. आज तेथें पाणी नव्हते. बैल थांबले नाहीत. परंतु तारेच्या डोळ्यात पाणी आले व ते पाहून मनोहरने गाडी थांबवली.

" नाला कोरडा आहे. तुमचे डोळे का भरले?" मनोहरने विचारलें.

" मनोहर! पूर्वीच्या भावना ओसरल्या. पूर्वीचं उसळणारं पाणी काल बाळाच्या तापात आटून गेलं काल मी संकल्प केला, की मनोहराकडे मी निराळ्या तऱ्हेनें पाहीन. कठीण आहे. परंतु मनाला जोरानं वळवावं तिकडे

वळत. त्याला सवलत देता कामा नये मनोहर, मी तुमच्याकडे अतःपर भाऊ म्हणून पाहीन." तारा म्हणाली.

" आपण बहीण-भाऊ होऊ मनाला आवरू. तुमच्या भावना प्रकट होत. माझ्या अप्रकट असत परतु दोघें दोषी. तुमच्यात दभ तरी नव्हता माझ्यात दभ होता कधी कधीं सयमाला दभाच रूप येत. मन ओढ घेत असत, तरी आपण तें आवरतों. तारे, तू माझी ताई हो, मी तुझा मन्यादादा होईन."

" एका क्षणात अशा भावना होणार नाहीत परतु या ध्येयासाठी आपले प्रयत्न. या ध्येयासाठी एकमेकास उत्तेजन देऊ." मनोहर गभीरपणें म्हणाला.

" मन्यादादा, हाकल ना रे गाडी." आनद म्हणाला

कोकिळेने कूऊ केलें.

" कशी कूऊ करते! किती उत्कट आवाज!" मनोहर म्हणाला.

" आता कूऊ बद होईल. वसत सपत आला, आता पावसाळा सुरू होईल. नवीन ढग येतील. सृष्टि धुऊन निवेल घाण वाहून जाईल. झाड टवटवीत होतील. नवीन धान्य उगवेल–" तारा म्हणाली.

गाडी घरीं आली. भाऊराव घरातच होते.

" आज मळ्यात नाही अजून गेलेत?" तारेनें विचारलें.

" आज स्वयपाक आहे. ही आहे बाहेरची!" भाऊराव म्हणाले.

" आज मी करतें स्वयपाक." तारा म्हणाली.

" आनदा, तू पडून राहा." भाऊराव म्हणाले.

" हिंडू नकोस वाऱ्यात!" तारेनें सागितलें.

" आलास दिग्विजय करून?" आनदीनें येऊन विचारलें.

" परतु वीर शेवटीं थकला, आजारी पडला!" मन्यादादा म्हणाला.

" त्याची दृष्ट काढायला हवी." आनदी म्हणाली.

" तू किती झाल तरी शेवटी जुनीच!" भाऊराव हसून म्हणाले

" आज ताराताई करणार आहेत स्वयपाक!" मन्यादादा म्हणला.

" त्याना रे कशाला?" आनदी म्हणाली

" त्याचं माझ नात निघाल, आम्हीं जरा दूरचीं भावड आहोंत." मनोहर म्हणाला.

" खर की काय ? दूरचीं म्हणजे का पूर्वजन्मीची " हसत आनदीनें विचारलें

" याच जन्मींची, पुनर्जन्मावर माझा विश्वास नाही " तारा म्हणाली

" मेल्यावर पुनर्जन्म आहे की नाही याविषयी ताई तुला शका असेल, परतु याच जन्मीं पुनर्जन्म होत असतात, ही गोष्ट तुला कबूल करावीच लागेल " मन्यादादा म्हणाला

" आता मी जातें चुलीशी." तारा म्हणाली

" सूतिका स्वयपाकीणबाई होत आहे पुनर्जन्म. या घटकेला पुनर्जन्म ! " हसत आनदी म्हणाली.

मन्यादादा बाहेर गेले भाऊहि कामाला गेले. आनदा अथरुणात पडून जीवनला आपली पदकें दाखवीत होता. आनदी व तारा याचा सवाद चालला होता तारा एकीकडे काम करीत होती

तारेनें आनदाला आधी जेवायला वाढले, तो जेवून गेला.

" तुम्हाला मुल फारच आवडतात." आनदी म्हणाली

" हो, मुलामधें राहणं म्हणजे मनाच पौष्टिक औषध." तारा म्हणाली

" मी तुम्हाला एक विचारू का ? " आनदी हळूच म्हणाली.

" विचारा ! " ती म्हणाली.

" तुम्ही पुनर्विवाह का करीत नाही ? काय हरकत आहे ? " आनदीनें जपून विचारले.

" मी का आता लहान आहे ? " तारेनें हसून विचारलें.

" लहान नाहीं तर काय ? असाल २५।२६ वर्षाच्या. पुरुष ६० वर्षांचे झाले तरी लग्नाजोगते नसतात का ? " आनदी हसून म्हणाली.

" पुरुषानीं माणुसकी सोडली म्हणून का स्त्रियानींहि सोडावी ? २५ व्या वर्षी बायका ४।५ मुलाच्या आया होतात. खर सागू का ? आता मला लग्नाची इच्छा नाहीं—" तारा म्हणाली.

" मन्यादादा का तुमचा भाऊ ? त्याला तरी आग्रह करा हो लग्न करण्याचा. मी कधीं एखादे वेळेस म्हणतें परतु मन्यादादा उठून जातो." आनदी म्हणाली.

इतक्यात भाऊराव व मन्यादादा आले.

"ताई, जमते की नाही भाकरी? की येऊ करायला?" मनोहरने विचारले.

"करायला नको येऊ, आता खायला चस" ती म्हणाली जेवणे झाली. दुपारी तारा लाडककडे गेली होती लाडकच्या मुलासाठी तिनें आगडें आणलें होतें ज्योतिबाना किती आनद झाला

"तुम्ही शिकलेच्या बायका गरिबाची याद ठेवता शिकलेल्या बायका-विषयी आमची वेगळी कल्पना होती तुम्हाला पाहून ती बदलली" ज्योतिबा म्हणाले

"ताईन शिकलेल्या स्त्रियाच तोड उजळ केल." मन्यादादा म्हणाला

तारेच्या मनात दोन-तीन दिवस तेथेंच राहावे असें आले. आनदाला जवळ घेऊन ती निजली असती. मुलाची सेवा मातेला मिळाली असती

"तुम्ही जाणार ना आज?" आनदीने विचारले.

"राहाव वाटत." तारा म्हणाली

"ताईन जाव. सस्थेची जबाबदारी आहे. स्वधर्म घेतलेला पाळला पाहिजे." मनोहर म्हणाला.

"धुरात इथ रडाव लागेल." आनदी म्हणाली

"त्याचा मला आनद आहे." तारेने सागितलें

"ताईचे डोळे मग पाणीदार होतील." मन्यादादा म्हणाला.

"त्याचे डोळे का वाईट आहेत? मला फार आवडतात हो तुमचे डोळे." आनदी तारेला म्हणाली.

"मग त्याच्याशीं लग्न लाव." भाऊराव येऊन हसत म्हणाले.

"इश्श काही तरी बोलायच." आनदी म्हणाली.

"बायकाच बोलण जणू अर्थपूर्णच असत!" भाऊराव म्हणाले.

"ताई, तू जा. कोणाचा बोल येता कामा नये. सस्था चालवणाऱ्यानी अत्यत जपून वागाव लागतं" मनोहरनें सागितले.

"मलाहि वाटत त्यानी जाव" भाऊराव म्हणाले.

"गोपाळ पोंचवून येईल." मन्या म्हणाला

"मी आज पायीच जाणार आहे." तारेनें सागितलें.

"का?" भाऊरावानीं विचारलें.

" आज मला खूप आनंद वाटत आहे पंख फुटल्याप्रमाण वाटत आहे. वाटत पाखराप्रमाण उडून जाव, वाऱ्याप्रमाण निघून जाव. आज चालण्याचे श्रम होणार नाहीत " तारा म्हणाली

आनंदाच्या अंगावरून हात फिरवून, सर्वांना विचारून तारा निघून गेली लाडक व मनोहर पोचवायला गले होते

" मन्यादादा, तुझ्या ताईला काय देतोस ?" तारेनें विचारिलें.

" ही टकळी व हे पेळू घे मन अशांत असेल तेव्हा सूत कात " मनोहर म्हणाला.

" ही स्वराज्याची दीक्षा—ही बहिणीला भिक्षा ' तारा म्हणाली.

" लाडक, तुझ्या हातात काय आहे ?" मन्यादादानें विचारले.

" हे चार आंबे आणले आहेत यांना " तो म्हणाला

" ताई, मी दिल नीरस सूत, लाडकचे घे रसाळ आंबे !" मन्या म्हणाला.

" जे सूत हजारों लाखों हृदयांना बांधीत आहे, जे सूत स्वराज्य आणणार आहे, तें सूत का नीरस ? त्या सुतात सुखाचे सप्त सागर आहेत, सुखाचे अनंत संसार आहेत " तारा म्हणाली

मनोहर गेला. लाडक गेला. तारा निघाली मागे वळून तिने पाहिलें व ती निर्मळ हसली आता ती एकटीच जात होती. तिचें मन प्रसन्न होते. तोंडावर सात्त्विकता होती. यंदाचा मेळा अपूर्व झाला. किती घडामोडी या मेळ्यामुळें झाल्या !

# कायदेभंग

## १४

रावी नदीच्या तीरावर राष्ट्रसभेनें स्वातंत्र्याचा ठराव मंजूर केला होता. तो अपूर्व दिवस होता, सोन्याचा क्षण होता! राष्ट्रात एक प्रकारचें नवचैतन्य संचरलें. एक प्रकारची विद्युत् सर्व राष्ट्रांत खेळू लागली. साबरमतीच्या तीरावर महात्मा विचार करीत होता. शांति-निकेतनातील, अर्वाचीन काळातील उपनिषद्गीतें गाणारी कवीन्द्र रवीन्द्रनाथांची मूर्ति महात्माजींस भेटावयास गेली होती.

"स्वातंत्र्याचा ठराव झाला. पुढें काय करणार? कोणता मार्ग?" गुरुदेवांनीं विचारलें.

"मी अखंड विचार करीत आहें. अजून अंधार आहे. परंतु प्रकाश येईल." महात्मा नम्रपणें म्हणाला, आणि प्रकाश आला. सडलेल्या राष्ट्रीय जीवनांत जिवंतपणा आणण्यासाठीं मीठ आलें. बेचव राष्ट्रीय संसारांत अमृत-मय रुचि आणण्यासाठीं मीठ आलें. महात्मा गांधींनीं हिंदुस्थान सरकाराकडे एका इंग्रज तरुणाबरोबर स्वातंत्र्याच्या मागणीचें पत्र पाठविलें. परंतु साम्राज्य-

शाहीच्या सरक्षकानें दोन ओळींचें उर्मट उत्तर पाठविलें महात्माजी म्हणाले, " मी पदर पसरून भाकरी मागितली माझ्या पदरात धोंडे पडले ! "

८० सत्याग्रही बरोबर घेऊन साबरमतीच्या आश्रमातून महात्मा बाहेर पडले तें स्वातन्त्र्याचें प्रस्थान होतें दुनियेंत कधी न झालेला तो स्वातन्त्र्यसग्राम होता, अहिंसक युद्ध होते ! एका बाजूस बॉब, बदुका, तोफा, फास, व दुसरीकडे अहिंसा असा हा सामना होता जगाच्या इतिहासात एक नवीन पान लिहिलें जात होतें.

सागराच्या तीरावर महात्माजी उभे राहिले. वर विमानें फिरत होती, समोर समुद्र उचबळत होता एक विश्वव्यापी वामनी मूर्ति तेथें मीठ उचलती झाली " हें रावणी राज्य मी समुद्रात फेकून देतों " ती मूर्ति शातपणे म्हणाली भरताला सदेश मिळाला शिग फुकलें गेलें. सारे प्रात पेटले, भडकले पेशावरपासून चितागागपर्यंत, हरिद्वारपासून रामेश्वरापर्यंत सारें हिंदुस्थान कधीं उचबळलें नव्हते असें उचबळलें या लढाईत छातीची रुंदी पाहून रिक्रूट घेतलेले नव्हते या लढाईत चिमणी मुलें, चुलीजवळील स्त्रिया, खाटेवर पडणारे वृद्ध– सर्वांनीं भाग घेतला व जीवनातील दिव्यता दाखवली.

हिंदुस्थानात माणसें नाहीत, मेंढरें आहेत असें दुनिया म्हणे. परतु १९३० साल उजाडलें व भारतात माणसें आहेत, माणुसकी असलेलीं खरी माणसे आहेत, ही गोष्ट जगाला कळली. अमेरिकेंतील, इग्लडमधील लोक हा अभिनव झगडा पाहावयास आले घोड्याच्या टापाखाली सत्याग्रही आपली डोकी कशी शातपणें चिरडून घेतात, फोडून घेतात तें त्यानीं पाहिलें व त्यानी तोंडात बोटें घातली मुबईला अझाद मैदानावर गरोदर शीख स्त्रिया घोडेस्वारानीं तुडविल्या दिव्य शीख तेज प्रकट झालें. पेशावर प्रातात कडेवर मुलें घेऊन पठाण-माता उभ्या राहत व त्याच्या अगावरून लष्करी लॉऱ्या शातपणें परतु वेगानें जात. लष्करी पलटणींनीं गोळ्या घालण्याचें कोठें कोठें नाकारलें. गुजराथमधील बोरसद भागात स्त्रियावर प्रचड लाठीमार झाला. त्याचीं ढोपरें फुटली परतु त्या भगिनी जागच्या हलल्या नाहींत. महाराष्ट्रात शिरोडा गाजला. शेंकडों वार अगावर घेत वीरानीं मीठ लुटून आणलें. रक्ताने वीर न्हाले. त्याचे ते रक्तरजित कपडे मोठमोठ्या सभातून

विकले गेले व सारें महाराष्ट्र चेतवते आले मुबईला हजारो स्त्रिया समुद्राचे पाणी नेऊ लागल्या ज्याच्या कडेवर मुले खेळावयाचा, त्याच्या कडेवर कायदेभगाच्या पाण्याचे घडे चढू लागले जरा खुट् झाले, की अगचाई करणाऱ्या अबला पोलिसाच्या लाठ्याना पाहून हसू लागल्या

परतु सर्वात चमत्कार लहान मुलाचा. त्याना वानरसेना नाव मिळाले रामाला वानराना साथ दिली व रावण मातीत गेला भारतातील ही रामाचीं माकडे उभी राहिली त्याना राम कशात आहे तें कळत होतें त्यागाची हाक त्याच्या निर्मळ हृदयात जाऊन पोंचली घरातून मुले पळून जात. झेंडा हातीं घेत व तुरुगात जात. ती आपली नावे बदलीत. भिकारड्या, आईबापानीं ठेवलेल्या नावाची आम्हाला लाज वाटते असें ती म्हणत आम्ही रामाचीं वानरें, महात्मा गाधी आमचा बाप्पा असें तीं चिमुरडी मुले म्हणत या मुलानी एकच दगल उडवून दिली भारतमातेला मुलाचा अभिमान वाटला !

पावसाळा सुरू झाला, जगलचे कायदे मोडले जाऊ लागले. जगलाचा फार त्रास. जगलचे कायदे केवळ जगली आहेत. जळणाला काटकी मिळणें, जात्याला खुटा मिळणे कठीण झालें. गाईगुरास चारा नाहींसा झाला जगलाच्या कायदेभगामुळें स्वराज्याचा मत्र दऱ्याखोऱ्यात घुमू लागला, पहाडापर्वतात उठू लागला. मिठाने समुद्रकाठ जागृत झाला. जगल-सत्याग्रहाने डोंगर जागे झाले. 'गाधीचें राज्य आलें' असें रानातील भिल्ल, वजारी, कातकरी म्हणू लागले एके ठिकाणी काही वजारी पुरुषाना पकडून आणले तर त्याच्या बायका कचेरीत येऊन म्हणाल्या, " आम्हासहि तुरुगात ठेवा "

शेंकडो वर्षाचीं बधनें तुटली. सर्वाना वाचा फुटली. मुक्याना कठ आला. खेड्याखेड्यातून शाहीर जन्मले. किसानात, कामगारात न शिकलेले परतु भावनानीं पेटलेले कवि आपले पोवाडे घेऊन उभे राहिले. त्याचे पोवाडे ऐकून खेडीं उभीं राहू लागलीं प्रभातफेरीचीं तीं गाणी, ते पोवाडे साहित्यशास्त्रज्ञास आवडणार नाहींत. मराठी साहित्याची हीं भूषणें नसून दूषणें आहेत असें ते म्हणतील. परतु ब्रिटिश सिंहाला ते हृदयातील बोल सहन झाले नाहींत. त्या गाण्यातील तेज त्याला कळले. ते पोवाडे, ती गाणी सरकारनें जप्त केलीं. राष्ट्राला उभें करील तें वाङ्मय खरें, कीं राष्ट्राला चिखलातच ठेवील तें खरें ?

राष्ट्रातील मुलेंबाळें, स्त्रीपुरुष, किसान-कामगार एका अभिनव स्फूर्तीनें प्रचड सैतानी सत्तेशी निःशस्त्राचा दिव्य झगडा उभारतात, ही गोष्ट पाहून ज्याचीं हृदयें उसळली नाहींत, ते का साहित्यिक? भारतमातेला विचारा, स्वातन्त्र्याला विचारा, मानव्याला विचारा.

वानरसेनेची चळवळ बद पडावी म्हणून सरकारने वेत बाहेर काढला. वेताचे फटके बालवीरास मारण्यात येऊ लागले आईची चापट बसताच चार तास रडणारी कोंवळी मुले, भारतमातेसाठी फटके बसून ढुगणाचे तुकडे उडत असताना व रक्ताची चिळकांडी उडत असताना 'महात्मा गाधी की जय', 'वदे मातरम्' असा जयघोष करीत. नामातील अपूर्व महिमा नास्तिकास कळून आला. अमरकटकाच्या डोंगरात पवित्र नर्मदातीरावर पाणी पिऊन व पाला खाऊन राहणारी भिल्लाची मुलें! त्यातील दोघाना फटके मारण्यात आले. तापानें फणफणून ती मुलें देवाच्या माडीवर जाऊन बसलीं. त्याची करुण कहाणी एका थोर मिशनऱ्यानें इग्रजी पत्रात प्रसिद्ध केली. ती वाचून अनेकाचे डोळे ओले झाले व ब्रिटिशाबद्दलच्या सतापानें लाल झाले.

असा सत्याग्रहाचा सग्राम थाटला होता. मनोहर नाचू लागला. होम-कुडात उडी घेण्यासाठी तो अधीर झाला परतु आधी त्यानें इतर सिद्धता केली. त्यानें शेकडों गाणी व पोवाडे लिहून तरुणास दिले. "जा, पेटवा सारें रान, उठवा सारे रान" तो त्याना म्हणाला नवीन गाणें जेथें मिळेल तेथून तो तें आणी. त्याच्या हस्तप्रती हजारों करून वाटी.

"काय सागू मर्दा मी गमतीला
जगलाचा कायदा मी काल तोडिला ॥
भीति गेली दूर
आला भावनेला पूर
माझ्या मायबहिणी कापताति गवताला ॥१॥

हें गाणें मनोहरने दशदिशात वाटले. खानदेशाकडून तें आलें होतें; तळ-कोंकणापर्यंत तें गेलें.

'बार्डोलीत रावण अवतरला'

या पोवाड्याने हजारोंना स्फूर्ति दिली पोवाडेवाला पोवाडा म्हणता म्हणता 'विदेशी कपड्याची' बिदागी मागे व काळ्या टोप्याचा वर्षाव होई. शेवटीं प्रचंड होळी शिलगत असे व पारतंत्र्य त्यात भस्म होत असे

"नाहि भिणार आम्ही मरणाला
जनमनात गांधी संचरला ॥ ध्रु० ॥
साबरमतीची मूर्ति बोलली
'माझि लढाइ बापहो शेवटली
पडो प्राणाची आहुती जरी पडली
आणीन स्वातंत्र्याचें सुख, तरि फिरून दावीन मुख'
कानाकोपऱ्यात शब्द तो गेला" ॥ जन० ॥

हा पोवाडा बिनपंख उडत गेला व हजारोंना बेडर बनवता झाला. वाणी-करणी एकरूप झाली. पोवाडा व पराक्रम यांचें लग्न लागले. एखादे गाणें म्हणावें व दीड दोन वर्षांची सजा मिळावी असे प्रकार झाले.

मनोहर नवीन नवीन गाणी प्रसवत होता. त्याची प्रतिभा अखंडप्रसवा झाली होती. एके दिवशी त्यानें एक गाणें केलें. मित्र म्हणाले हें तुम्हींच म्हणून दाखवा. मनोहरला मोह आवरला नाहीं सुंदरपुरला प्रचंड सभा भरली होती. फुलगावची शंभर मुलें फेरी घेऊन आलीं व त्यांनीं गाणी गात दवंडी दिली. सभेला स्त्रियांचा सागरहि लोटला होता मनोहरनें तें गीत म्हटलें. भावनांनी लोक हेलावत होते

"काय सांगु इंग्रजाच्या करणीला
देश सारा यांनी माझा दीन केला ॥ ध्रु० ॥
दुष्काळ येति सालोसाल
कुत्रा खाई ना हो हाल
जाई पोट मिळुन आमुच्या हो पाठीला ॥ दे० ॥

शेतामध्ये नाही पीक
शेतकरी मागे भीक
सरकारने सारा परि वाढवीला ॥ दे० ॥

होई नित्य कर-वाढी
शेतकरी हाल काढी
कर्जाच्या नरकात तो बुडाला ॥ दे० ।

मिठावर याचा कर
गवतावर याचा कर
कर नाहींसा जिन्नस न उरलेला ॥ दे० ॥

दारु पाजी पोटभर
दारुबाज घरोघर
दारुपायीं देश सारा नागवीला ॥ दे० ॥

धंदा नाही ठेवला यानें
केलें आम्हा दीनवाणें
देई हातीं भिकेच्या हो झोळीला ॥ दे० ॥

याच्या लष्कराची मिजास
पगाराची घेती रास
मारती लाठ्या हो आमच्या आया-बहिणीना ॥ दे०॥

भाडण लावी जातीजातींत
मिळवी साऱ्या लोका मातींत
आपण स्वत: हो चोर परि गबर झाला ॥ दे० ॥

खाया नाही दोन तुकडे
लोक झाले मरतुकडे
परि गोरा हो ढेरपोट्या हा झाला ॥ दे० ॥
होती सोन्याची ही भूमी
होती भाग्याची ही भूमी
भरल्या बागेचा मसणवटा यानें केला ॥ दे० ॥
आता होऊ आपण धीट
करू एकी चला नीट
लावु हाकलून शिरजोर चोराला ॥ दे० ॥
आपले थोर मोठे भाग्य
गाधीबाप्पा दावी मार्ग
आणु देशात स्वातत्र्य-देवीला ॥ दे० ॥

गाणें चाललें असता किती कडकडाट होत होता सारें वातावरण भरून गेलें होतें. मनोहरनें थोडें भाषण केलें तो म्हणाला, "या काळात जिवत असण म्हणजे भाग्य! हें भाग्य अनुभवा. स्वातत्र्याची यात्रा सुरू झाली आहे. हींत सामील व्हा पारतत्र्य नष्ट केल्याशिवाय सुख नाहीं. भारतातील दारिद्र्याच्या कथा सागेन, तर तुमच्या अगावर शहारे येतील. मागच्या वर्षीच्या कडक थडींत त्या चादणें गावीं किती तरी माणस गारठून मेलीं. एखाद फाटक लक्तर लोकाच्या अगावर असायच. आईबाप मुलाना पोसवत नाही म्हणून—

"गगे, गोदे, यमुने, माझा नोहे तुझाचि हा बाळ"

असं म्हणून तीं फुल नद्याना अर्पण करतात! कुठ कुठं सर्व कुटुबच्या कुटुब विष खाऊन मरून जात! अरेरे, सस्यश्यामला भरतभूमीच्या लेंकराना का असे दिवस यावे? सर्व दुनियेला जिने पोसावें, तिच्या सतानाना दोन घास का महाग व्हावेत? अशा गोष्टी इग्लडात झाल्या असत्या तर बडें झालीं असतीं. ही दुर्दशा

आपण दूर केली पाहिजे अहिंसेचा झगडा आपण सुरू केला आहे त्याग दाखवा, तेज प्रकट करा महात्माजींनी लिहिलें, " उंदीरहि माजराशीं शेवटची लढाई देतो ससाहि लाडग्याशी जरा लढतो हिंदी जनता का त्याच्याहून नेभळट व निस्तेज झाली आहे ?" महायुद्धात ५०।५० लाखाच्या फौजा युरोपीय देशानी स्वदेशार्थ उभ्या केल्या. ३३ कोटि लोकातून ३ कोटि लोक मरावयास उभे राहिले पाहिजेत, तरच आपण इतर माणसाप्रमाणें आहोंत असें सिद्ध होईल. भारताच्या उज्ज्वल भविष्याबद्दल मला आशा आहे. एका कवीनें म्हटलें आहे—परमेश्वर तीन रूपानी अवतरतो. भिकारी, कवि व तत्त्वज्ञ— ही ती तीन रूपें. आज महात्मा गांधींसारखा भिकारी कोण आहे ? प्रार्थना व्हावी, राष्ट्रकार्यासाठी त्या महापुरुषानें मग हात पुढें करावे ! किती दिव्य असतें तें दर्शन ! त्या वेळेस परमेश्वरच आपणासमोर उभा असतो ! त्याप्रमाणेंच ते रवीन्द्रनाथ ! जगात तोफा व बॉंब याची घनगर्जना होत असता हा थोर कवि शातीची गीतें गात आहे ! पश्चिम ही पूर्वेवर सत्ता गाजविण्यासाठी आहे, गोरे हे जगाचें प्रभुत्व मिळविण्यासाठी जन्मलेले आहेत, अशा साम्राज्यशाही विचाराच्या काळात विश्वभारती विद्यापीठ स्थापून पूर्व व पश्चिम याचें दिव्य मीलन हे गुरुदेव करू पाहत आहेत ! अशा या कविश्रेष्ठाच्या रूपानें मला परमेश्वरच उभा आहे असे वाटतें. आणि ते अरविंद ! आज दीड तप झालें. तो महापुरुष, तो योगी, तो तत्त्वज्ञानी एके ठायीं बसला आहे. कल्पना करा मन किती चचळ असतें ! हे खाऊ, तें पाहू, तें जोडू, तें तोडू, असा आपला खेळ परतु वर्षानुवर्षें तो योगी ध्यानस्थ बसला आहे ! रवीन्द्रनाथ म्हणाले, " १८ वर्षापूर्वी अरविंदास पाहिले होतें. मी तेव्हा म्हटलें, 'अरविंद हा घ्या भक्तिमय प्रणाम !' आज अठरा वर्षांनीं पुन्हा पाहत आहे. आजहि तेंच म्हणतो 'अरविंद, हा घ्या भक्तिमय प्रणाम !' रवीन्द्रनाथासारख्यानीं ज्याचेविषयीं असे धन्योद्गार काढावे, त्याचें केवढें विभूतिमत्त्व ! महात्मा गांधी, गुरुदेव रवींद्रनाथ, योगी अरविंद ह्या तिघाच्या रूपानें परमेश्वर भारतात वावरत आहे. भारताला भय नाहीं, विनाश नाहीं. भारताला जय आहे, विकास आहे. आशेनें, त्यागानें, तेजानें, भक्तीनें या दिव्य झगड्यात सामील व्हा.

" तुका म्हणे व्हावें सत्यकर्मा साह्य । पातलीया भय नरका जाणें "

या सत्कर्माला साहाय्य करा. तनमनधनानें करा. एकमेकाचे पाय ओढाल तर नरकात जाल मेल्यावर नरक आहे की नाही मला माहीत नाही, परतु गुलामगिरीच्या नरकात लोळत राहाल यात सशय नाही!"

मनोहरला सरकारनें आता बाहेर ठेवले नाहीं त्याची तुरुगात रवानगी झाली भाऊरावानी करबदीचीच चळवळ हातीं घेतली. "गुजराथेंतील व कर्नाटकातील शेतकरी महात्माजी सागतील तर पुढें तहशील भरू, नाही तर पै देणार नाही असें कलेक्टरास सागत आहेत महाराष्ट्र का मेलेला आहे? स्वातत्र्यवीराचा महाराष्ट्र कोठे आहे? स्वराज्य शेतकरी व कामकरी यांच्यासाठीं आहे शेंकडा ९० त्याची प्रजा त्यांनी मरावयास उठले पाहिजे" भाऊरावाचा मळा जप्त झाला घर जप्त झाले त्याची शाळा जप्त झाली फुलगावात पोलीस पहारा करू लागले. भाऊराव, आनदी व आनद घरातून बाहेर पडली. जणू हरिश्चद्र, तारामती व रोहिदास! तिघांच्या खांद्यावर तीन झेंडे गावें पेटवीत, चेतवीत ते चालले.

एके दिवशीं खेड्यातील एका मदिरात तिघें होती. सभा होऊन गेली होती. आनद झोपला होता. भाऊराव व आनदी झोपली नव्हतीं

"मला आज कदाचित् पकडतील मी तुरुगात जाईन. तू?" भाऊरावानी विचारलें.

"मी का मागं राहीन?" आनदी म्हणाली.

"तुला काही दिवस ना गेले आहेत? तुझ जीवन सफळ होत आहे. तू जपल पाहिजे. तू आता फार हिंडू नकोस. माहेरीं जा." पत्नीचा हात हातात घेऊन ते म्हणाले.

"हें स्वातत्र्य माझ्या पोटी येत आहे. तें तुरुगातच नीट वाढेल, तुरुगातच प्रकट होईल. तेथील हवाच या गर्भाला मानवेल. बाहेर हा गर्भ गळून पडेल." ती म्हणाली.

"तुझी इच्छा! तुझी प्रसन्नता राहिली पाहिजे. प्रसन्नता हे सर्वांत मोठ पोषक व सरक्षक तत्त्व." ते म्हणाले

दुसरेच दिवशीं भाऊरावास अटक झाली. न्यायाधीश त्यांच्या ओळखीचे होते.

न्यायाधीश.—भाऊराव, तुम्ही स्वत. वकील होतेत तुम्ही कायद्याचा मान राखू नये हें आश्चर्य!

भाऊराव.—इंग्रजाचा कायदा मोडील तोच खरा वकील. आज मी वकिलीची खरी परीक्षा देत आहे शिक्षा देऊन मला पास करा मोठी शिक्षा देऊन पहिल्या वर्गात आणा

न्यायधीशः—तुम्हाला खटला चालवायचा आहे?

भाऊराव.—खटला चालवण म्हणजे ब्रिटिश न्यायाला महत्त्व देणं तरवारीच्या धारेवर राज्य चालवणाऱ्याजवळ का न्याय असतो? ती न्यायाची थट्टा आहे.

न्यायाधीश.—तुम्ही शेतकऱ्यास चिथावल आहे

भाऊराव.—तो माझा परम धर्म आहे जो पैसा राष्ट्रसवर्धनात खर्च व्हावा, तो का लष्कराचे लाड पुरवण्यात उधळला जावा? काय म्हणून कर द्यावे? इंग्रज सरकारन मरणाचा सुकाळ केला म्हणून? बेकारी, व्यसन, अज्ञान, कलह याचा बुजबुजाट माजवला म्हणून? पापाला पोसण पाप आहे.

न्यायाधीश.—भाऊराव! तुम्हाला दोन वर्षांची मी सक्तमजुरीची शिक्षा देतों

भाऊरावः—मी आभारी आहे

आता आनदीची पाळी आली. सुदरपुरला तिनें स्त्रियाची प्रचड सभा घेतली "तुर्की स्वातंत्र्याच्या लढाईत मुस्तफा केमाल पाशाला ७०।७० वर्षांच्या म्हाताऱ्या बायानी डोंगर चढून, दऱ्या उतरून, डोक्यावरून वाहून नेऊन दारूगोळा पुरवला. डोक्यावर मरण त्यानीं घेतल धोबिणी, मोलकरणी यानीं लढाईला पैसे दिले. तुम्ही काय करीत आहात? दारूच निरोधन करा. परदेशी कापडाच्या दुकानावर निरोधन करा. परदेशी माल घेऊ नका जपानी बागड्या हातात भरू नका जपानी खेळणी जाळा देशभक्ति घरोघर भरू दे."

आनदीला अटक झाली, ती तुरुगात गेली. आता आनद राहिला. लहान दहा वर्षांचा तो किशोर! त्याने एके दिवशीं फुलगावचे आपले बालमित्र जमवले. जीवन त्याचा मित्र त्याच्याबरोबर होता सर्वांनी हातात झेंडे घेतले. सुदरपुरवर या बालचमूनें स्वारी केली. चादणें गावचीं पळून आलेलीं

काहीं मुलें त्याना मिळाली. बालचमु वाढत गेली. आनद व जीवन पुढें होते. दोघाच्या हातात झेंडे होते. वानरसेनेचें गाणें ते म्हणत होते.

वानर वानर हुप्
या रे
वानर वानर हुप् ॥ ध्रु० ॥
महात्मा गाधी आले राम
त्याचे करू चला काम
त्यानी मारली आहे हाक
चला उठा लाख लाख
नका बसू गुपचूप ॥ या रे० ॥
झेंडा हातामध्यें घ्या
मुखी मोक्षगीत गा
सोडू मनातील भय
आपण मिळवू या रे जय
करू चळवळ आता खूप ॥ या रे० ॥
वानर रावणा करिती चीत
झाली श्रीरामाची जीत
आपण इग्रज येथुन पळवू
आपण स्वराज्याला मिळवू
आपलें आठवा दिव्य रूप ॥ यारे० ॥
देशामध्ये पेटला होम
येवो अगामध्यें जोम
दास्य विषजतु मारू
दैन्यादारिद्या सहारू
पेटवू स्वप्राणाचा धूप ॥ यारे० ॥

टाळया वाजवीत, जयजयकार करीत, मुलें जात होतीं. घराघरातून मडळी बाहेर येऊन त्या निर्भय मुलाचे दर्शन घेत होती सेवासदनातील सर्व भगिनी बाहेर येऊन पाहत होत्या. तारेने आनदास पाहिले टकळीवरच्या सुताचें तिनें दोन हार पटकन् आणले व आनद आणि जीवन याना घातले. एका तरी भगिनीनें धैर्य दाखविलें पोलिसानी तिचें नाव टिपून घेतलें.

"तुम्हीं काय हें केलेत? सस्थेला धोका येईल" एक भगिनी तारेला म्हणाली

"मी धोका येऊ देणार नाहीं." तारा म्हणाली

बाजारातून मुलाची सेना चालली. तुफान गर्दी झाली, परतु इतक्यात पोलीस आले व त्या मुलासमोर उभे राहिले

"तुम्ही जाता की नाहा घरोघर?" अधिकाऱ्यानें विचारलें

"तुरुग आमचे घर, आम्हा नाहीं आता डर"— आनद म्हणाला.

"या सर्वांचा तूच म्होरक्या दिसतोस. याला पकडा रे याला चागले फटके मारले पाहिजेत इतर मुलाना दहशत बसली पाहिजे तुम्हाला का चावटपणा वाटला?" अधिकारी दरडावून म्हणाला

"महात्मा गाधी की जय!" आनंद म्हणाला

"मलाहि पकडा. मलाहि फटके मारा आनदा आपला खाऊ नेहमीं मला देतो." जीवन म्हणाला.

"यालाहि पकडा रे बाकीच्याना पिटाळा" अधिकारी म्हणाला

पोलिसानी त्या लहान मुलावर लाठीमार सुरू केला. गर्दीवरहि लाठी सुरू झाली. जीवन व आनद याना नेण्यात आलें

जीवन व आनद याना फटके मारणार ही बातमी शहरभर पसरली तारा जेवली नव्हती ती या बातमीनें तीराप्रमाणे उठली. तिनें सस्थेचा राजीनामा नम्रपणें दिला. ती सस्थेंतून बाहेर पडली. स्त्रियाची प्रचड सभा तिनें बोलावली. ती म्हणाली, "तुमच्या कोंवळया मुलाना फटके मारले जात असता, तुम्ही का स्वस्थ बसणार? कचेरीला चला गराडा घालू. आपलीं मोती सोडवून आणू. खऱ्या माता असाल, तर माझ्याबरोबर याल. माताची माता भारतमाता बोलावीत आहे." तारा निघाली. तिच्या पाठोपाठ शेंकडों भगिनी निघाल्या.

जयजयकार करीत त्या जात होत्या. पुरुष लाजले व त्यांच्या पाठोपाठ जाऊ लागले. शाळासमोर उभी राहून तारा म्हणे, " तुमच्यासारख्या मुलांना फटके मारले जात असतां, शाळेंत काय घोकीत बसणार ? " ते शब्द ऐकून विद्यार्थि बाहेर पडत.

कचेरीजवळ भगिनींची पवित्र देशभक्तीची भागीरथी आली. त्या तेथे धरणे धरून बसल्या

" तुमचं काय म्हणणं आहे ? " अधिकाऱ्याने विचारलें.

" आमची मुलं परत द्या " तारा म्हणाली

" मुलं इथं नाहीत " अधिकारी म्हणाला.

" कुठं आहेत ? " तिनें विचारलें

" त्यांना दुसरीकडे पाठवण्यात आलं आहे " तो म्हणाला

" त्यांना फटके मारणार आहेत का ? एक माता तुम्हाला विचारीत आहे सत्य सांगा " ती म्हणाली

" फटके मारण्याचा हुकूम मागे घेण्यात आला आहे इथं कदाचित् गडबड होईल म्हणून त्यांना अन्यत्र पाठविण्यात आलें आहे " अधिकारी म्हणाला

स्त्रिया तेथून निघाल्या. पुन्हा जंगी जाहीर सभा भरली. तारेचें तेजस्वी भाषण झालें. थरारून गेलीं श्रोत्यांचीं मनें परंतु एकदम पोलीस आले त्यांनीं ताराबाईस अटक केली. सभेवर लाठीहल्ला केला

परंतु आनंद व जीवन कोठें आहेत ? त्यांना मोटारींत घालून पोलिसांनीं नेलें. कोठें नेत होतें त्यांना ?

" आम्हाला कुठं नेतां ? आनंदानें विचारलें

" आम्ही तुम्हाला जंगलात सोडून देणार आहोंत. " पोलिसांचा मुख्य म्हणाला.

" आम्हाला भीति वाटणार नाही. ध्रुव एकटा वनात होता आम्हीं तर दोघे आहोंत ! " आनंदा म्हणाला.

" तुम्हाला आम्हीं निरनिराळ्या ठिकाणी सोडणार आहोंत ! " अधिकारी म्हणाला.

‘ देवाची सोबत तर सर्व ठिकाणी आहे ! ” आनदा म्हणाला

“ तुम्हाला भूक लागली का रे ? ” त्यानें विचारलें.

“ हो.” दोघे म्हणाले

“ आमच्याजवळची भाकर खाता ? ” त्याने विचारलें

“ तुम्ही पोलीस इग्रजाच्या बाजूचे तुमची भाकर खाऊ तर तुमच्यासारखे होऊ—” आनदा म्हणाला

“ आम्ही का वाईट आहोंत ? काय रे जीवन ? तू का काहीं बोलत नाहीस ? ” त्यानें विचारले

“ तुम्ही वाईट आहात, तुम्ही लाठी चालवता, तुम्ही दुष्ट आहात. आम्ही का चोर आहोत ? ” जीवनने विचारले

“ मीठ लुटतात, जगलातलें गवत कापतात. ही का चोरी नाही ? ” तो म्हणाला

“ समुद्राच मीठ, त्याचे पैसे घेण म्हणजे चोरी रानातील गवत, त्याचे पैसे घेण म्हणजे चोरी ” जीवन म्हणाला

“ कुणी रे तुम्हाला हें शिकविल ” त्यानें विचारले

“ मन्यादादान–भाऊनी वर्तमानपत्रातून हें येत तुम्ही वाचीत नाही ? ” आनदानें विचारले.

“ आम्हाला तुम्ही तुरुगात नाही घालणार ? ” जीवननें विचारलें

“ नाही. तुरुगात आता जागा नाही–” पोलीस म्हणाले

“ इग्रजाची फजिती ! ” आनदा म्हणाला

“ महात्मा गाधी की जय ! ” जीवन म्हणाला.

“ तुम्ही का नाही महात्मा गाधी की जय म्हणत ! ” आनदाने पोलिसास विचारलें.

“ आम्ही सरकारचे नोकर ” एकजण म्हणाला.

“ इथ कुठ सरकार आहे ? इथ तुम्ही व आम्ही म्हणा वंदे मातरम्.” जीवनने सागितलें.

काही पोलीस हसले काहींनी मान खाली घातली. मोटार जात होती. आता अधार पडला. आनदास झोप येऊ लागली. जीवनच्या खाद्यावर मान

ठेवून तो झोपला जीवनलाहि झोप येऊ लागली फुलाच्या दोन कळया एक-मेकींना लागाव्या त्याप्रमाणें त्याचीं तोंडें एकमेकास लागत होती

"आपल पाप! अशा सोन्यासारख्या मुलास रात्रीं रानात टाकणार आम्ही? लाडग्यावाघासमोर टाकणार. हें पोट. हे पोट पाप करायला लावत!" तो मुख्य पोलीस म्हणाला

"लष्करान बड केल पाहिजे अशा तुरुगात जाण्यान काय होणार?" एक पोलीस म्हणाला

"महात्मा गाधी अवतार आहे तो हत्याराशिवाय स्वराज्य मिळवून देईल" दुसरा म्हणाला

त्या मुलाना जागें करण्यात आले

"तुला इथ सोडतों" जीवनला अधिकारी म्हणाला ते दोघे मित्र एक-मेकास भेटले त्याचे डोळे भरले पोलिसाचेहि डोळे ओले झाले. जीवनला खालीं सोडण्यात आलें मोटार पुढे चालली बऱ्याच वेळानें पुन्हा किर्रर झाडी आली. मोटार थाबली आनदास खाली सोडण्यात आले मोटार निघून गेली.

फुलगावचे शेतकरी आता उठावले शेंकडों तुरुगात गेले. वणवा पेटत चालला. सत्याग्रहाचें पाऊल मागे पडेना, चळवळ फोफावतच चालली भारताचें तोंड उजळ होऊ लागलें!

## भेट १५

जीवन अंधारात एकटा कोठे जाणार? आजूबाजूस रान होतें. कसल्याहि आवाजाची भीति वाटू नये म्हणून तो मोठमोठ्यानें गाणीं म्हणू लागला. चालता चालता व गाणीं म्हणता म्हणता तो थकून गेला तो रस्त्यात शेवटीं बाजूला झोपला! सकाळीं पाखरानी त्याला भूपाळी म्हटली. जीवन जागा झाला. तो पुन्हा चालू लागला. त्यानें आपल्या खिशातील तिरंगी झेंडा काढला वाटेंतील एक काठी घेऊन तिला तो झेंडा त्यानें लावला रानात स्वराज्याचा झेंडा फडकला तो स्वराज्याचा वारकरी बनला. झेंडा खांद्यावर येताच जीवनच्या पायात आणखी शक्ति आली शेवटीं जंगल संपलें उघडा रस्ता दिसू लागला दूर एक गाव दिसत होते. त्या गावात जावयाचे ठरवून तो तिकडे गेला. प्रभातफेरीची गाणी गात त्या गावात तो शिरला मुलें शाळेंत जात होतीं. आपल्या गावात आलेल्या एक छोटा गांधी पाहून ती आनंदलीं. जीवन त्याना म्हणाला "मी गाणें सांगतों, तुम्ही म्हणा." मुलानीं कबूल केलें. प्रचंड प्रभातफेरी निघाली. शाळा ओस पडली! मास्तर शाळेच्या बाहेर उभे होते. एक लहान ठिणगी आली व तें गाव पेटलें. स्त्री-पुरुष पाहू लागले.

" किती लहान आहे मुलगा " मायबहिणी म्हणत.

" नागाचं पिलूं लहान म्हणू नये, सिंह-वाघाचं पिलूं लहान म्हणू नये !" एक वृद्ध गृहस्थ म्हणाला

गावचा पोलीसपाटील इतक्यात रागारागानें आला

" काय रे पोरानो, जाता की नाही घरोघर ? बंद करा गाणं. तू कोण रे ? इथ कशाला आलास ? नीघ या गावातून—" पाटील दरडावू लागला

" घाबरू नका रे म्हणा गाणं पाटील इंग्रजांचे आहेत म्हणा महात्मा गांधी की जय, वंदे मातरम्" जीवनने मंत्राची दीक्षा दिली

मुलांनी प्रचंड जयघोष केला आजूबाजूस जमलेल्या लोकांनी केला

" बाळ, तू व्याख्यान दे " एक मनुष्य म्हणाला

" कोण म्हणतो व्याख्यान दे ? नाव टिपून घेईन." पोलीसपाटील म्हणाला.

" मी देतों व्याख्यान " असे म्हणून जीवन व्याख्यान देऊं लागला मंडळी तेथे खाली बसली जीवन म्हणाला—

" स्वराज्याची ही लढाई आहे सारे तुरुंग भरले तुरुंगात जागा नाहीं. आम्हाला फटके मारणार होते, परंतु सुंदरपुरला बायकांची केवढी थोरली टोळी पोलिसांवर चालून आली त्यांनी आम्हाला पळवलें, मी व माझा मित्र आनंद आम्हा दोघास मोटारींत घालून त्यांनी रात्री जंगलात सोडलें. आम्हाला एकत्र सोडलें नाही आम्हाला भीति वाटली नाहीं मी रस्त्यात झोपलों. आता तुमच्या गावात आलो आहे. आमच्या गावातील सारे शेतकरी तुरुंगात गेले. किती तरी बायका तुरुंगात गेल्या ! सरकारला पै कोणी देत नाही. गावात पोलीस फिरतात. त्याना कोणी खायला देत नाहीं. त्यांच्याजवळ बोलत नाही कोणी. ते इंग्रजांचे आहेत, हे पाटील असेच आहेत. याच्या जवळ बोलूं नका. याच्याकडे जाऊं नका. एकटे कुत्रे भुंकू दे "

पाटील रागावला. त्यानें जीवनचा हात धरला व " तुला पकडलं आहे." असें सांगितलें. 'महात्मा गांधी की जय' सारे म्हणाले. पाटील जीवनला घेऊन चालला. त्याने त्याला तालुक्याच्या ठिकाणी नेलें, जीवनला शिक्षा झाली. तो तुरुंगात गेला.

इकडे आनंदहि असाच थकेपर्यंत चालला. मग एके ठिकाणीं झोपला सकाळीं एका पांथस्थाने त्याला उठविलें आनंद उठला. त्यानेंहि झेंडा तयार

केला त्या पायस्थाबरोचर तो निघाला झेंडेवाल्याबरोबर चालवयास तो पाथस्थ भीत होता.

" बाळ, तू कुठ जाणार ?" त्याने विचारले

" जिथ पकडतील तिथ " तो म्हणाला

' तू लहान आहेस " तो पाथस्थ म्हणाला

" कृष्ण लहान होता नरी त्यान कालियाला चीत केल " आनदाने उत्तर दिले

" तुझे आईबाप कुठ आहेत ?" पुन्हा प्रश्न आला.

" तुरुगात. मी एकटाच बाहेर आहे " त्यानें सागितलें

दूर आगगाडीचे रूळ दिसले आगगाडीच्या रस्त्याने जावें असें आनदाच्या मनात आलें कोणते तरी स्टेशन येईल एखादी गाडी येईल, तीत बसावें असा त्याने निश्चय केला तो पळत निघाला पाथस्थ म्हणाला, " पळतोस का ? थाब."

" तुम्हीं माझ्याबरोबर तुरुगात येणार असाल तर थाबतो याल का ?" त्यानें विचारलें

" नाहीं रे बाबा " तो म्हणाला

" मग बसा रेंगाळत, मी चाललो " असें म्हणून आनदा उड्या मारीत चालला. रेल्वेचा रस्ता लागला गाणी गात तो जात होता. शेवटी त्याला स्टेशन दिसले. तो तेथे पोचला तिकीट काढायला त्याच्याजवळ पैसे नव्हते. नसले पैसे म्हणून काय झाले ? बसू गाडींत तो मनात म्हणाला आगगाडी आली. तीत तो बसला. गाडी सुरू झाली. त्याच्याने स्वस्थ बसवेना तो उभा राहून पोवाडे म्हणू लागला डब्यातील मडळींस कौतुक वाटलें. आनदाचा गोड आवाज, त्याची सुदर गोरीगोमटी मूर्ति, ती दिव्य गाणी ! — सारे त्याच्याकडे टकमक पाहू लागले.

" तू कुणाचा मुलगा ?" एकानें त्याला विचारले

" फुलगावच्या भाऊरावाचा " त्यानें उत्तर दिलें

" ते सावकार भाऊराव ? ज्यानी सर्व सावकारी सोडून दिली, शेतकऱ्यास कर्ज माफ केल, ते ?" कोणी तरी म्हणाले.

" हो. तेच. आनदा म्हणाला

" ते तर तुरुगात गेले." एक पोक्त गृहस्थ म्हणाले

" आता मी पण जाणार आहे आम्हाला काल फटके मारणार होते—" तो ऐटीनें म्हणाला.

वर्तमानपत्रें वाचणाऱ्या एकानें त्याच्याकडे पाहिलें.

" हा बघ तुझा फोटो, हा दुसरा कोण ?" त्यानें विचारलें.

" हा माझा मित्र जीवन. पोलिसानी आमची ताटातूट केली आमचा फोटो मला पाहू द्या हो " आनदानें तें वर्तमानपत्र घेतलें व वाचलें सुदरपुरची सर्व हकीकत त्यात आली होती ताराबाईच्या अटकेची हकीकतहि त्यात होती

" ताराबाईना पण पकडलें ! " तो म्हणाला

" तुझ्या ओळखीच्या आहेत ?" एकानें प्रश्न केला

" हो. त्याच्या कुशीत मी कितीदा तरी निजलों आहे. त्याच्या मेळयात काम केल आहे. त्या आईसारख्याच आहेत माझ्या. माझी आई सुद्धा तुरुंगात गेली आहे." आनदा किती गोड बोलत होता !

" तू कुठ जाणार आता ?" कोणी तरी विचारलें.

" काहीं ठरल नाही आगगाडी नेईल तिथ जाईन " तो हसून म्हणाला

" तिकीट कुठल काढल आहेस ?" एकानें विचारलें.

" पैसेच नाहीत तर तिकीट कस काढू. आमच घर सरकारन जप्त केल आहे--" त्यानें सागितलें.

" तिकडे खानदेशात पुष्कळ लहान मुल तुरुगात गेली आहेत तूहि जा तिकडे. पकडतील तुला." एकानें सुचविलें

" तिकडेच जाईन. जिथ लहान मुलाना पकडतात तिथच गेलेल बर " आनदा म्हणाला.

त्याला लोकानीं जागा दिली. कोणी त्याला खायला दिलें. त्याला झोप येत होती. एकानें त्याला आपल्या बिछान्यावर निजू दिले. दमलेला आनदा झोपीं गेला. पुढें एका स्टेशनवर तिकिटें पाहणारा गाडीत चढला. तो आनदाला उठवू लागला, परतु मडळींनी त्याची सर्व हकीगत सागितली. त्या तिकिटें पाहणाऱ्यास कौतुक वाटलें.

" अशी लहान मुल उठू लागली आणि आपण घरी बसतो लाज वाटली पाहिजे आपणाला " तो म्हणाला

आनदाच्या गोड चेहऱ्याकडे तो पाहत राहिला

" देवाच्या मूर्तीसारखा दिसत आहे " तो बोलला.

" गाणी किती सुदर म्हणतो " लोक म्हणाले.

तिकिटें पाहणारा आनदाला प्रणाम करून निघून गेला. थोड्या वेळानें पुणें आलें आनदा उठला

" हे पाच रुपये घे धुळ्याच तिकीट काढ." एका गृहस्थानें त्याला सागितलें इतक्यात तो तिकिटें पाहणारा तेथें आला.

" कुठ जायच बाळ तुला ? " त्यानें प्रेमाने विचारलें.

" धुळ्याला " आनदा म्हणाला.

" मी करीन तुझी व्यवस्था. माझ्याबरोबर जेवायला चल " तो म्हणाला.

आनदाला त्यानें जेवू घातलें. त्याला फळें घेऊन दिली. त्याला गाडींत बसवून दिलें. तिकीट काढून दिलें " कल्याणला उतर व पुढ दुसऱ्या गाडीत बसून जा मग चाळीसगावला उतर. धुळ्याची गाडी तिथून निघते. जा. हिंदुस्थानला स्वराज्य मिळवून आण—" तो म्हणाला.

" तुमच काय नाव ? " आनदानें विचारले.

" माझ नाव जयवत " तो म्हणाला.

" मग आम्हाला खात्रीन जय मिळणार " आनदा टाळी वाजवून बोलला.

गाडी निघाली. खाद्यावर झेंडा घेतलेला हा नयनमनोहर मुलगा सर्वांचें लक्ष वेधी. तो सर्वांच्या कौतुकाचा विषय होई. कल्याणला तो उतरला. कल्याण स्टेशनवर हातात झेंडा घेतलेला एक दाढीवाला गृहस्थ होता त्याने या लहान मुलाला पाहिलें.

" काय रे बाळ, तू कोण, कुठ चाललास ? " त्यानें चौकशी केली.

" मी आनंद. सुदरपुरजवळच्या फुलगावचा. मी धुळ्याला जातों. मला तिथ पकडतील. मला तुरुगात जायचं आहे, तुम्ही पण तुरुगात येणार ? " त्यानें प्रश्न केला.

" हो मलाहि तुरुगात जायच आहे. काय रे, भाऊराव व मनोहर तुला माहीत आहेत का ? " दाढीवाल्यानें प्रश्न केला.

"हो. ते तर माझे त्याचाच मी भाऊरावाचाच मी मुलगा. मन्यादादा तिथच असतो तुम्हाला काय माहीत ? ते तुमच्या ओळखीचे आहेत ?" आनदानें उत्सुकतेने विचारले

"वर्तमानपत्रातून वाचल होत." दाढीवाला म्हणाला

"माझी आईसुद्धा तुरुगात गेली. दुसरी आई सुद्धा गेली असेल" तो म्हणाला.

"भाऊरावानी का दुसर लग्न केल?" त्यानें विचारलें

"नाही हो सुदरपुरला ताराबाई आहेत, त्या माझ्या दुसऱ्या आई त्याच माझ्यावर फार प्रेम त्याच्याकडे मी राहिलों होता मला जवळ घेऊन निजत व म्हणत 'मला आई म्हण' त्या फुलगावला एखादे वेळेस येतात" आनदानें खुलासा केला.

"तुला भूक लागली असेल ना ? चल आपण जेवून येऊ" दाढीवाला म्हणाला.

दाढीवाल्याने आनदाला एका जवळच्या खानावळीत नेलें दोघे तेथे जेवले स्टेशनवर परत आले

"नीज या अथरुणावर गाडी आली की, तुला उठवीन." दाढीवाला प्रेमानें म्हणाला

आनदा झोपला दाढीवाला त्याच्याकडे सजल दृष्टीने पाहत होता आनंदाच्या डोक्यावरून त्यानें हात फिरवला, त्याच्या अगावरून हात फिरवला. आनदा एकदम जागा झाला "नीज बाळ, नीज माझ्या माडीवर डोके ठेवून नीज–" दाढीवाला म्हणाला आनदानें खरेंच त्या माडीवर डोकें ठेवलें. सुरेख उशी त्याला मिळाली

गाडीची वेळ होत आली. आनदाला जागें करण्यात आलें. ते दोघे एका डब्यात बसले. आनदाच्या डोळ्यावर झोप होती.

"जरा तिकडे व्हा हो. मुलाला जरा झोपू द्या." दाढीवाढा जवळच्या गृहस्थास म्हणाला.

त्या गृहस्थानें आनदाच्या त्या झोपाळू चेहऱ्याकडे पाहिलें व जागा दिली. पुन्हा आनदाचें डोके दाढीवाल्यानें माडीवर घेतलें. तो आनदाला मधून

मधून थोपटी, गाणे गुणगुणे चाळीसगावला पहाटे गाडी आली दोघे यात्रेकरू उतरले व धुळयाच्या गाडीत बसले

" आनद, दूध घे थोड " दाढीवाला म्हणाला

" तुम्ही नाही घेत ? " त्याने विचारलें

" तूच घे. तू लहान आहेस " दाढीवाला त्याची पाठ थोपटून म्हणाला.

आनदाने गरम गरम दूध घेतलें गार वारा सुटला होता " माझ्या पाघरुणात ये थडी वाजणार नाही " दाढीवाला म्हणाला आनदा त्याच्या पाघरुणात गेला

" तूच घे सार पाघरूण " त्यानें सागितले

" तम्हाला नको ? " आनदाने विचारलें.

" मोठ्या माणसाना थडी वाजत नाही " दाढीवाला म्हणाला.

" मी झोपू का पुन्हा ? मला झोप येते " आनदानें विचारलें.

" झोप– माझ्या माडीवर डोक ठेवून झोप " दाढीवाल्यानें सागितले

" आनदा शातपणें झोपला. दिशा रगू लागल्या होत्या. प्रकाश येऊ लागला होता. दाढीवाला गाणें म्हणू लागला आश्रमभजनावलीतील गाणें होतें तें ! आनदानें डोळे उघडले ते गाणे तो ऐकू लागला. भक्तिमय व गोड आवाज होता पवित्र भावना तेथें उत्पन्न झाल्या.

" किती गोड म्हटलत गाण ! आणखी म्हणा ना." तो म्हणाला.

" तू सागशील तेवढी म्हणेन. तुला पाहिल म्हणजे गावस वाटत—" दाढीवाला म्हणाला.

त्यानें आणखी एक गाणें म्हटलें. डब्यात आता गर्दी होऊ लागली. गोंधळ सुरू झाला. गाणे बद झालें, सूर्य आता चागलाच वर आला. गाडीहि निघाली होती. बाहेरचा देखावा आनद पाहत होता, परतु दाढीवाला आनदाकडे पाहत होता.

" तुम्ही सारख माझ्याकडे का बघता ? ताराबाई असच करीत—" आनदा म्हणाला.

" तुझ्याकडे पाहत राहावसं वाटत. तुला पाहून डोळे पवित्र होतात." दाढीवाला म्हणाला

" दाढीवालेच पवित्र असतात ऋषींना दाढी असे." आनदा म्हणाला.

" त्या ताराबाईंच नाव काय रे सार?' दाढीवाल्यानें विचारलें.

" मला नाही माहीत " तो म्हणाला.

" त्या एकट्या आहेत ? " पुन्हा दाढीवाल्यानें प्रश्न केला.

" हो. त्याच्या कपाळावर कुकू नसत. म्हणजे एकट्याच, होय ना ? " आनदानें उत्तर दिलें.

दाढीवाला शात बसला. मध्येंच त्याच्या डोळ्यातील अश्रु दाढीवर घळघळले !

" तुम्ही रडतासे ? " आनदानें विचारले.

" माझे डोळे जरा अधु आहेत— " तो दाढीवाला म्हणाला.

" ताराबाईंचे डोळे असेच दुखरे. पाणी यायच. परतु दिसतात छान असं आई म्हणे. तुम्हाला नीट दिसत नाही ? " आनदाने हळूच विचारलें.

" हल्ली जरा दृष्टि सुधारली आहे पूर्वी आधळाच झालों होतों पडत असे सारखा. एकदा तर खळग्यात पडलों. मरायचीच वेळ आली होती. परतु पुढ डोळ्यातून सारख पाणी गळू लागल आणि त्यानच दृष्टि सुधारत चालली—" दाढीवाला म्हणाला

" हात धरून नेणार कुणी नव्हत तुम्हाला? तुम्हाला मुलगा नाही ? तुम्हाला कुणी नाहीं ? " आनदानें प्रश्न केला.

कुणी नाही हात धरायला. कुणाचे हात मी सोडले तर कुणी माझे सोडले. शेवटीं मी एकटा राहिलों तू धरशील माझा हात, तू होशील माझा मुलगा ? साग. करशील माझ्यावर प्रेम ? मला नाहीं ना पडू देणार ? " दाढीवाल्यानें आनदाचा हात हातात घेऊन विचारलें.

" तुरुगात जाईपर्यंत होईन. तुरुगात आपणास एकत्र ठेवणार नाहीत. मुलाना अलग ठेवतात." आनदा म्हणाला.

" तुरुगातून सुटल्यावर तू आपल्या घरीं मला नेशील? मी तुला गाणं शिकवीन." दाढीवाला म्हणाला

" भाऊना गाणं फार आवडत. या आमच्या घरी. मी तुमचा हात धरून हिंडवीन. मळ्यात नेईन. फुल तोडून तुम्हाला देईन." आनदा म्हणाला.

"मला कमळ फार आवडत चिखलात पाय, परतु सूर्याकडे नजर–" दाढीवाला म्हणाला.

"फुलगावचे ज्योतिबा आहेत, त्याचा लाडक कमळ आणतों भाऊ त्याला म्हणतात, 'चिखलात रुतशील हो' लाडक म्हणतो 'शेतकरी नाही रुतत. त्याला चिखलाची सवय असते. चिखलात कोणी रुतेल तर शेतकरी त्याला काढील?' भाऊ हसतात व म्हणतात 'मीहि आता शेतकरी आहे मी पण फसणार नाही!' लाडक तुम्हाला कमळ देईल आणून." आनदानें सांगितलें.

अशी बोलणी होता होता बुळें आलें दाढीवाला व आनद खाली उतरले. त्यानी आपले झेडे खाद्यावर घतले दाढीवाला गाणे खड्या आवाजात सागत होता व आनदा ते म्हणत होता हळूहळू त्याच्याभोवती मडळी जमू लागली. प्रचड मिरवणूकच सुरू झाली आनदानेंहि गाणीं सागितली मग सभा भरली. आनदासुद्धा बोलला. दाढीवाल्याचेंहि सुदर व स्फूर्तिदायक भाषण झालें. परतु एकदम पोलीस आले व दोघाना पकडण्यात आलें 'महात्मा गाधी की जय' असे जयघोष झाले. दोघावर खटले होऊन दोघाना शिक्षा झाल्या. तुरुगात त्या दोघाची ताटातूट झाली. आनदा छोकरा-फाइलमध्यें गेला.

दिवसभर काम करावें, रात्री गप्पागोष्टी थोड्या कराव्या, असा राजकीय कैद्याचा जीवनक्रम असे. दाढीवाला ज्या खोलीत होता, तेथें दहा लोक होते. रोज प्रत्येकानें आपली जीवनकथा सागावयाची असा त्यानी ठराव केला. रात्रींचा वेळ आनंदात निघून जाई एके दिवशी दाढीवाल्याची पाळी आली. तो म्हणाला, "माझी जीवनकथा कशी सागू? परतु सागतों ऐका. एका खेडेगावात माझा जन्म झाला. भाऊबदकीत माझ्या वडलाना खूप त्रास झाला. शेवटीं त्यानीं आत्महत्या केली. माझ्या आईला तो धक्का सहन झाला नाहीं. ती मला जवळ घेई व रडे. ती मला घेऊन माहेरी गेली परतु तिचा तिथ अपमान झाला. ती तिथ राहिली नाही. तिला काय कराव कळेना. पुढ ती एका शहरात एका श्रीमत घरी स्वयपाकीणबाई म्हणून राहिली. मी तिच्याबरोबर होतोंच. आम्ही त्या घरातच राहत होतों. त्या श्रीमत मनुष्यास आमच्याविषयीं दया वाटे. मी शाळेंत जाऊं लागलों. माझा आवाज गोड होता म्हणून मला संगीत शिकविण्याचीहि त्यान व्यवस्था केली. आम्हाला काहीं कमी नव्हतें. परतु आई दुःखीच असे. तिच्या तोंडावर मी हसण कधीं पाहिल नाहीं. एके दिवशीं

मी पोरका झालों. त्या श्रीमत गृहस्थानीं मला हाकलून दिल नाहीं. मी मॅट्रिक झालों. परतु पुढ मी सर्वस्वी गायनालाच वाहून घेतलं. माझ्या आईबापापासून शरीरसौदर्य व कठमाधुर्य मला मिळाल होत या देणग्यानी माझ पतनहि झाल आहे व माझा उद्धारहि झाला आहे. त्या श्रीमत माणसाच्या मुलीच माझ्यावर प्रेम जडलें परंतु स्वयपाकीणबाईच्या मुलास मुलगी देण्यास पिता तयार होईना. तो माझी दया करी, मला शिकवी, तो मला कपडे देई, खायाला देई, परतु पोटची मुलगी देण्यास तयार झाला नाही. मलाहि तो अपमान वाटला. ही दयेची भीक कशाला, अस मनात येऊन मीं तें घर सोडल. त्या मुलीन माझ्याशी लग्न करण्याची प्रतिज्ञा केली होती.

'लग्न करीन तर याच्याशींच' ती त्याला म्हणाली.

'माझ घर सोड व वाटेल तें कर.' तो म्हणाला

'पर्वत नदीला जन्म देतो, परतु नदी सागराकडेच जाणार.' ती म्हणाली.

'मी का पर्वत ? मी का दगड ?' बाप रागानें म्हणाला.

'मुलीच्या जीवनाची माती करणाऱ्या बापाला काय म्हणाव तें तुम्हीच सागा.' ती म्हणाली.

शेवटीं तिन घर सोडल. आम्ही दोघानी जीवनाच्या गाठी बाधल्या. तें शहर सोडून आम्ही दूर गेलो. काही दिवस स्वर्गसुख अनुभवल. परंतु मी पत्नीजवळ नेहमी म्हणायचा 'मला उडून जावस वाटत. एकाच ठिकाणीं राहण मला आवडत नाहीं.' ती म्हणायची कुठहि चला. मी तयार आहे. मी म्हणायचा 'मला एकट्यालाच जाऊ दे.' ती म्हणे मग मी कुठ जाऊ ?' तिच्या डोळ्यातील पाणी माझ्या हृदयाचं पाणी पाणी करी. आम्हाला एक मुलगा झाला. किती रमणीय होत त्याच रूप सागू ! परतु तो मुलगा माझ मन स्थिर करूं शकला नाहीं. उडून जाण्याचे विचार अधिकच जोरानें येऊ लागले. मीं एके दिवशीं पत्नीला म्हटल, 'मीं तुला एक सुंदर मुलगा दिला आहे. तुझं जीवन सफळ केल आहे. तुला मातृपदावर मीं बसवलं आहे. आता मला मुक्त कर.' ती म्हणाली, 'एकदा गाठी पडल्या म्हणजे जन्मोजन्मीं त्या सुटत नाहींत. आम्हाला सोडून का जाता ? बाळाला घेऊन मी एकटी कुठ जाऊ ?' मग मी रागान म्हणे 'मी उद्या मेलों तर काय करशील ?' ती म्हणे 'तुमचं स्मरण करीत बाळाला वाढवीन व एके

दिवशीं तुमची भेट घेण्यासाठी निघून येईन.' मी म्हणे 'मग मी मेलों असं समज व माझं स्मरण करीत रहा.' ती रडे 'मी तुमच्यासाठीं माझं घर सोडल, आईबाप सोडले. तुमच प्रेम हें माझं जीवन. तुम्हीहि का माझा त्याग करणार ?' असं ती म्हणे. असं नेहमी चाले.

परतु एके दिवशी मी तिचा त्या लहान मुलाचा त्याग केला जगाचे अनुभव घेण्याच मी ठरविल. मी एका नाटक कपनींत राहिलों. सुदर आवाज व सुदर रूप यामुळ मालक मजवर खूष होता. परतु त्या मालकाची पत्नी माझ्या सौंदर्यान वेडी झाली. ती मला जेवायला बोलवायची, मला विडा करून द्यायची. 'तुम्हाला रात्रीचीं जागरण. इथच निजत जा' असं म्हणायची. शेवटीं व्हायच तें झाल. आम्हीं दोघानीं शेण खाल्ल. मालकान मला काढून लावलं. मी पुन्हा निघालो. सुदरपुर नावाच्या शहरी गेलो. तिथ एक रसिक व उदार गृहस्थ होते. त्याच्याशीं खूप मैत्री जमली. परतु तिथहि वाईट प्रकार घडला. त्याची पत्नी फार भोळी. तिच्या बोलण्यावरून वाटाव, कीं तिच आपल्यावर प्रेम आहे माझहि तिच्यावर प्रेम बसल मी आजारी होतों, ती विचारी 'तुमचे पाय चेपू' माझ्या प्रेमाला अशा शब्दानीं पल्लव फुटत. एके दिवशीं त्या सतीचा मीं हात धरला. ती मला साप म्हणाली. एकूण तिच प्रेम नव्हत मजवर तर! माझा अहकार दुखवला गेला. तिचा नवरा माझ्या मुठीतला. मी त्याचे कान तिच्याविषयीच्या विषानें भरले. त्याची पत्नी माहेरीं गेली. मी त्या मित्राच्या पैशावर चैन केली. त्याला घेऊन मी मुबईस जात असे. त्यालाहि विलासात रमवू लागलों. परतु एका खादीधाऱ्यान त्याला माझ्या पाशातून सोडविलं. मी गाणारा व सुदर ! एका वेश्येच माझ्यावर प्रेम बसल. मी श्रीमंत नव्हतों. पैशासाठीं तिला दुसऱ्याचीहि सेवा करावी लागे. मी तिच्याकडे पडलेला असे. तिचा मी पोपट होतों. परतु तिच्या सौंदर्यावर लुब्ध झालेल्या एकाला तिच माझ्यावर प्रेम आहे हें कळून आल. त्यान आम्हा दोघास जगातून नष्ट करण्याच कारस्थान केलं. त्या सुदर वेश्येचा खून झाला. त्या प्रकरणात मीहि पकडलों गेलों. मला ७ वर्षांची शिक्षा झाली. विषयविलासात बुडालेला किडा तुरुंगात खडी फोडू लागला, चक्की पिसू लागला. रोज मी रडे. माझ्या जीवनाचा विचार मी करू लागलो. माझ फुलपाखरी जीवन आठवून मला लाज वाटे, माझा पुनर्जन्म होऊं लागला. माझ ग्रहण सुटू लागलं. एका भगिनीन अकस्मात्

मला भेट देऊन मला आश्रमभजनावलि दिली ती भक्तिमय पद मी गाऊ लागलों. जेलरला माझा ळळा लागला. माझ्या भक्तीमुळ तोहि द्रवला सत्याग्रह बाहेर जोगत सुरू होता. तुरुग भरून गेले. काही गुन्हेगार कैदी सोडण्याच सरकारन ठरविल. राजकीय कैद्याना जागा व्हावी म्हणून चोर सोडण्यात आले. त्यात मीहि सुटलों. महात्माजीच्या आश्रमभजनावलीन माझा उद्धार केला. मी राष्ट्रोद्धाराच्या त्याच्या चळवळीत पडण्याच ठरविल सत्याग्रहीना आम्हाला मुक्त केल होत मीं सत्याग्रही व्हायच मनात योजल. आणि आज तुमच्यासमोर आहे ”

“ अद्भुत आहे तुमची जीवनकथा ! तुमची पत्नी कुठ असेल, मुलगा कुठ असेल.” एकाने विचारलें.

“ मला काय माहीत ? परतु हृदय सागत आहे सार गोड होईल ” दाढीवाला म्हणाला.

मुबई इलाख्यातील सर्व स्त्री राजकीय कैदी धुळें तुरुगात आणण्याचें ठरलें. त्याप्रमाणें त्या आल्या. त्याना धान्य निवडणें, भाजी चिरणें वगैरे कामें दिलीं गेलीं. आनदी, तारा वगैरेच्या तेथें भेटी झाल्या. तारेनें आनदीला आनद व जीवन याची हकीकत सागितली

एके दिवशी हवालदारानें आनदाला खटल्यावर आणलें होतें. जेलरसाहेबासमोर तो उभा होता.

“ हा पोरगा ऐकत नाही. सारखी गाणी गातों. कुऊ करतो त्याला म्हटलें, की हा तुरुग आहे तर म्हणे हें घर आहे ! माझी आई इथ आहे. दुसरी आई इथ आहे ! ” हवालदार आनदाचे अपराध सागू लागला.

“ काय रे, हें खर का ? ” जेलरनें विचारलें.

“ हो. हें माझ घर आहे.” आनदा म्हणाला.

इतक्यात आनदी कार्ड मागण्यासाठी कारकुनाकडे जात होती. ती आनदाला पाहून तेथें आली व तिनें आनदाला पोटाशीं धरलें.

“ आई ! ही बघा माझी आई ! ” आनदा म्हणाला.

“ अहो, हा तुरुग आहे ” जेलर आनदीला म्हणाला.

“ मायलेकराना का तुम्ही भेटू देणार नाहीं ? ” तिनें विचारलें.

“ हा म्हणतो माझी दुसरी एक आई आहे.” जेलर हसून म्हणाला.

" ती तारा, तिचीहि भेट करवा हो याच्याशी. तिच फार प्रेम या पोरा-बर." आनदी म्हणाली

जेलरने तारेला बोलावणें पाठविलें

इतक्यात दुसरा एक हवालदार दाढीवाल्याला खटल्यावर घेऊन आला. आनदी व आनंद तेथें उभी होती

" साब, हा दाढीवाला छोकराफाइलकडे चोरून जात होता. म्हणे माझा मुलगा आहे तिकडे. मला भेटू दे ऐकेना " हवालदार म्हणाला

" काय रे, दडाबिडी पाहिजे ? " जेलरनें विचारलें.

परतु हें काय, दाढीवाला एकदम पुढें गेला व आनदींचे पाया पडला.

" क्षमा म्हणा, मग मी उठेन मी साप गोविंदराव, तुम्ही प्रेमान पोसलेला साप आज निष्पाप झाला आहे " सद्गदित वाणीनें कैदी म्हणाला.

" कोण गोविंदराव ! उठा. क्षमा आहे, उठा हो." ती म्हणाली, तिकडून तारा आली

" माझी दुसरी आई ! " आनदा म्हणाला

दाढीवाला तारेकडे पाहू लागला तो एकदम तिच्याहि पाया पडला. तो उठेना तिचे पाय तो सोडीना

" तारे, तुझा पापी पति नरकाचे अनुभव घेऊन शुद्ध होऊन आलेला पति. मला पदरात घे पुन्हा प्रेम दे " गोविंदराव म्हणाला

" किती वर्षांनी भेटलेत उठा हें काय ? मला तुमचे पाय धरू दे. मीहि थोडी घसरलें होतें परतु बाळ आनदान सावरल त्याच्या आजारीपणान मला पडण्यापासून वाचवल. मलाहि क्षमा करा " तारा स्फुदत म्हणाली.

" ये बाळ, तू भेट, ही तुझी खरी आई, मी तुझा खरा बाप, भेट. आईला आई म्हणून भेट, पित्याला पिता म्हणून भेट " गोविंदराव म्हणाले.

" हें काय आहे सार गौडबगाल ? ही काय रडारड ? " जेलरनें विचारलें.

" हा मुलगा माझा नव्हे. हा आमच्या एका मित्राला आगगाडींत मिळाला. तेव्हा तो दोन वर्षांचा होता. मी त्याला वाढवला. मला मूलबाळ नव्हतच." आनदी म्हणाली

" मीं मनोहराजवळ हा बाळ दिला. नतर मरून जाण्याचे प्रयत्न केले.

मला मरण्याचा धीर झाला नाहीं. आज हा सोन्याचा दिवस यावयाचा होता.” तारा म्हणाली

“ मी सर्वांचा होईन भाऊचा पण, याचा पण आई तुझाहि, आणि तुझाहि.” आनदा म्हणाला

“ आनद सर्वांनाच हवा ” गोविंदराव म्हणाले.

“ मी आज कार्ड लिहिणार होतें जेलरसाहेब, कार्डाऐवजी मला पाकीट द्याल का ? या साऱ्या भेटी पत्रात लिहून मी कळवीन.” आनदी म्हणाली.

“ घ्या, पाकीट घ्या. तुमच्या आनदात मीहि भागीदार आहे तुरुग सर्वांची ताटातूट करतो इथ तर ताटातूट झालेल्याची भेट झाली पतीला पत्नी भेटली पत्नीला पति परत मिळाला. आईबापास मुलगा भेटला. मुलाला खरे मायबाप भेटले देवाची लीला ” जेलर म्हणाले

“ तुरुग म्हणजे महान् समेलनाचें स्थान भारतीय ऐक्याची जागा. नाना प्रातातले, नाना जातीचे लोक सरकारनें एकत्र आणले इथ भारताचा आत्मा आम्हीं पाहिला. स्वराज्याची प्रभाहि येथून दिसत आहे ” गोविंदराव म्हणाले.

“ काय आनद ? तू इथ बाबाजवळ राहणार का आईजवळ ? ” जेलरनें हसून विचारलें

“ मी आपला मुलातच राहीन तिथ गमत असते मधून मधून आईला व याना भेटेन.” आनद म्हणाला

“ याना म्हणजे कोणाला ? ” जेलरनें मुद्दाम प्रश्न केला.

“ याना म्हणजे बाबाना.” आनदा म्हणाला

“ बर जा आता सारी. तुमची मधून मधून भेट करवीत जाईन.” जेलर म्हणाले

सारी मडळी गेली आनदीनें तारेला हात धरून नेलें. तारेचे अश्रु थाबत ना. ते सुखाचे होते कीं दुःखाचे ? गतस्मृतीचे की भावी स्वप्नाचे ?

“ तारे, का रडतेस ? ” आनदीनें विचारलें.

“ मलाच समजत नाही. हृदय कस थरथरत आहे. डोळे भरत आहेत. का हा पाऊस, मलाहि माहीत नाही ! ” ती म्हणाली.

“ नवीन सृष्टि निर्माण करणारा पाऊस, नवजीवन देणारा पाऊस.” आनंदी म्हणाली.

---

# नवीन बाळ

## १६

त्या दिवशी आनदी जरा सचिंत बसली होती. सर्वांना त्याचें आश्चर्य वाटत होतें वास्तविक ती हसायची, खेळायची, गमतीचें बोलायची. परतु असें काय झालें होतें, की तिचा आनद अस्तास गेला ? असें काय झाले होतें की तिचा चेहरा खिन्न दिसावा ?

परतु काही असलें तरी हें जीवन आहे. सकाळी, सायकाळीं आकाशात अनंत रगाचें काव्य फुलते. ते रग नेहमीं का आनददायीच असतात ? ते रग नेहमींच का हृदयाला विसावा देतात, हृदयाला स्फूर्ति देतात ! नाही. कधीं कधी ते रग भयाण व भेसूर वाटतात. ते पाहून निराशा व खिन्नता वाटते. ते पाहून मरणाचे विचार मनात दाटतात. विविधता म्हणजे जीवन. एकता म्हणजे मरण.

आनदीच्या प्रसन्न हृदयाकाशात आज अभ्रें आलीं होती. ती बोलेना, हसेना. तारेला त्यामुळें वाईट वाटलें. ती विचार करू लागली. आनदाला त्याचे खरे आईबाप मिळाले म्हणून तर आनदी दुःखी नसेल ना ? यानीं त्याला तळहातच्या फोडाप्रमाणें वाढविलें. लहानाचा त्याला मोठा केला आणि

आम्ही एकदम येऊन त्या मुलाचा आता ताबा घेणार? का नाही आनदीला वाईट वाटणार? शिवाय त्याना मूलबाळ नाही आनदच त्याचा जणू मुलगा झाला होता ही कठोर निराशा आता आनदीला कशी सहन होणार? आपण वाढवलेलें झाड दुसऱ्यानें उपटून नेलेलें पाहून कोणाला वाईट वाटणार नाही?

तारा आनदीजवळ गेली व प्रेमळपणे म्हणाली, "तुमच दु:ख मला सागा. काही दुखत-खुपत का? की काही मानसिक दुःख आहे? कशाची आठवण झाली?"

"आज सहजच जरा कससच वाटत आहे. मनाला एक प्रकारची हुरहुर वाटत आहे. थोडी काळजी वाटत आहे" आनदीनें उत्तर दिलें.

"कशाची हुरहुर, कशाची काळजी?" तारेने विचारलें.

"मीं एक स्वप्न पाहिल त्या स्वप्नान मला सचित केल आहे. माझ्या पेटीत मी एक रत्न ठेवल आहे. रोज तें पाहतें हात लावून पाहतें तें रत्न वाढत असत. त्याची प्रभा, त्याचा आकार वाढत असतो तें रत्न पेटीत मावतनास होत ते जगाला दिसत तें रत्न ओढायला लोक धावतात. ते म्हणतात. "हें तुमच नाहीं." मी सागतें की "माझच आहे या रत्नाची किती दिवस मी वाट पाहत होतें एके दिवशी तें मला मोठ्या कष्टान मिळाल. मी त्याला वाढविल आणि आता तुम्ही नेणार? ते माझ्याकडे रागान पाहतात. परतु इतक्यात मुरली वाजते. ते लोक सारे नाहीसे होतात. रत्न माझ्या हातात हसत असत अस तें स्वप्न. काय आहे याचा अर्थ?" आनदी म्हणाली.

"मी सागू का? तुम्हाला वाईट नका वाटून देऊ परतु आनदाला त्याचे खरे मायबाप भेटले. तुम्ही हें रत्न वाढवलत, त्याची प्रभा फाकवलीत, आणि आता आम्ही येऊन म्हणणार हे आमच. आम्ही म्हणणार, 'जन्म देणाऱ्याचा हक्क' तुम्ही म्हणणार 'वाढवणाऱ्याचा हक्क.' आनदाला आम्ही घेऊन जाऊ हा विचार तुमच्या मनात सारखा असेल. तुम्हाला याच वाईट वाटण साहजिक आहे. या स्वप्नाचा हाच अर्थ दिसतो. मी सागू का, आनद तुमच्या कुशीतून आम्ही ओढून नेणार नाही. आम्हीं कृतघ्न होणार नाही. आणि देवाच्या दयेन आता आणखी आनद फुलतील व जगाला मिळतील. माझी जीवनबाग फुलवणारा माळी पुन्हा मला मिळाला आहे. अधिक पवित्र होऊन तो माळी परत आला आहे. अधिकच सुदर, अधिकच

पवित्र अशीं रोप तो आता लावील नाहीं? माझ्या माडीवर नवीन बाळ खेळतील. आनद तुमच्याजवळच असू दे." तारा म्हणाली.

"तारे, आनदाला तुम्ही न्याल म्हणून नाहीं मला वाईट वाटल. मुलाचे खरे आईबाप भेटले याचा मला किती तरी आनद झाला. त्यामुळ मी का दु:खी होऊ? आईबापापासून त्याचा मुलगा का दूर ठेवू? माझ्या मनात तस नाहीं आल या स्वप्नातील रत्न म्हणजे आनद नव्हे. तारे, याचा दुसरा अर्थ असावा" आनदी म्हणाली

"कोणता अर्थ?" तिनें उत्सुकतेनें विचारलें.

"तारे, तू सूतिका आहेस. माझ्यात तुला काही फरक नाहीं दिसत?" आनदीनें विचारलें.

"कोणता फरक? दिवसेंदिवस तुमच तोंड अधिक सात्त्विक, अधिक प्रेमळ दिसत होत काही भगिनींनी तस बोलूनहि दाखवल. आणि म्हणून तर तुमची खिन्नता अधिक लक्षात आली" तारा म्हणाली.

"का माझ्या तोंडावर सात्त्विकता होती?" तिनें प्रश्न केला.

"काय सागाव? जीवनाची कृतार्थता वाटून" तारा म्हणाली,

"स्त्रियाच्या जीवनाची कृतार्थता कशात आहे?" आनदीनें विचारलें.

"पतिपत्नींच्या एकरूपतेंत" तारा म्हणाली.

"तारे, स्त्रियाच्या जीवनाची कृतार्थता माता होण्यात आहे. ती कृतार्थता मला मिळणार आहे. मी तुरुगात येताना मला काही दिवस गेले होते ते म्हणाले, 'तू तुरुगात जाऊ नकोस' किती तरी दिवसानीं आमच जीवन सफळ होणार होत ते पकडले जाण्याच्या आदल्याच रात्री त्यानी किती हळुवारपणें मला सागितल. 'नको जाऊ तुरुगात' परतु मी ऐकल नाही. तुरुगात कस होईल याची भीति वाटत आहे. हें रत्न माझ्या पोटाच्या पेटींत दिवसेंदिवस वाढत आहे. त्याची सात्त्विक प्रभा माझ्या तोंडावर तुम्हाला दिसते. त्याच तेज सौम्य होऊन बाहेर माझ्या शरीरावर नाचत. तें रत्न का कोणी नेणार? माझी प्रसूति नीट नाही का होणार? मृत्यु का येणार? तुझ रत्न नाही अस मला कोण सागणार? माझ्या पोटीं रत्न ठेवण्यात देव का चुकला! तारे, असे हे विचार मनात येऊन मी कावरीबावरी झालें आहे. स्वप्नात रमणारीं माणस वेडी. स्वप्नाना फाजील अर्थ देऊ नये हेंहि खर. तरी मन हें मोठ चमत्कारिक

आहे. तें लहानशा गोष्टीन दचकत, लहानशा गोष्टीन रडत, लहानशा गोष्टीनं हसत." आनदी सागत होती.

तरीच तुम्हाला मधूनमधून वात्या होतात. अन्नावर वासना नाही. मला शका थोडी आली होती, परतु शक्यता वाटली नाही." तारा म्हणाली.

"माझ्याजवळून देव आनद नेणार, परतु मला दुसरा आनद देणार देव दयाळु आहे. परतु काहीं तरी वेडवाकड मनात येत." आनदी म्हणाली.

"वेडवाकड मनात आणू नका. तुम्ही दुसऱ्याच्या मुलाला प्रेमान वाढवल. ही प्रेमसेवा पाहून प्रसन्न होऊन देवान तुम्हाला ही दिव्य देणगी दिली आहे." तारा म्हणाली.

"आनदाची मी खरोखरीची माता झालें होतें परतु ते का उपकार होते? आनदाला वाढवण्यात माझ समाधान असे. माझी मातृवासना तृप्त होत होती. आई होण्याच सुख मी अनुभवित होतें" आनदी म्हणाली.

"देवान आता खरखुर मातृसुख तुम्हाला दिल आहे. सपूर्ण अनुभव तो तुम्हाला देत आहे. प्रसूतिवेदनेशिवाय खरा अनुभव नाही खर मातृसुख नाही. खर मातृवैभव नाहीं—" तारा म्हणाली.

"खर आहे तुमच म्हणण. त्या वेदना आता मला होतील. त्या वेदनातून जी वत्सलता उत्पन्न होईल ती खरी वत्सलता." आनदी म्हणाली

"तुम्ही चिंता नका करू. मी आहे जवळ—" तारा म्हणाली.

"तुमचा हात यशस्वी आहे तो माझ रत्न नीट साभाळील" आनदी म्हणाली.

हळूहळू सर्व सत्याग्रही-भगिनींत ती वार्ता पसरली. सर्वांच्या कौतुकाचा तो विषय झाला.

"तुरुगात श्रीकृष्ण जन्मला. तुरुगात तुम्हाला बाळ होणार! किती छान!" स्त्रिया म्हणत.

"हें स्वातन्त्र्य पोटीं येत आहे, म्हणून हें तोंडावर तेज" कोणी म्हणत.

"तुम्हाला काय होतात डोहाळे सागा. आम्ही पुरवू. आम्हाला साधी शिक्षा आहे. जेलरच्या पाठीस लागू" काहीं भगिनी म्हणाल्या.

आनदी स्वच्छतेची भोक्ती. ती कोठें घाण पडू द्यायची नाहीं. केरसुणी हातात घेऊन नेहमीं ती झाडी. एके दिवशीं एक भगिनी म्हणाली, "आनदी-

ताई, तुम्ही झाडीत नका जाऊ, नाहीं तर बाळ झाडूवाला होईल." आनदी म्हणाली, "वाईट काय ? जगात स्वच्छता निर्मील. घाण घालणारे जगात पुष्कळ आहेत. घाण काढणाऱ्याचीच वाण आहे." एक इतिहासज्ञ बाई म्हणाली, "आनदीबाई, तुमच नाव बदला. नाहीं तर दुसरा बाजीराव पोटीं यायचा" आनदी हसून म्हणाली, "नावाप्रमाणं मुल होतीं तर सुभद्राच्या पोटी सारे अभिमान्यु येते, सीताच्या पोटीं लवाकुश येते. गगाच्या पोटी भीष्म येते पार्वतीच्या पोटी कार्तिकस्वामी येते. तस ज्या अर्थी दिसत नाही, त्या अर्थी मला भीति नाही व तुम्हालाहि भीति नाही आणि दुसरा बाजीराव स्वराज्यात जन्मला आज स्वराज्य कुठ आहे ? स्वराज्यातील आनदी दुसरा बाजीराव प्रसवते, पारतत्र्यातील आनदी पहिला बाजीराव प्रसवेल ? ती भगिनी टाळ्या वाजवून म्हणाली 'चागल दिलत उत्तर !' आनदीताई की जय."

तारा मधूनमधून आनदीस तपासीत असे. तिला धीर देत असे आनदी एकटीच विचार करीत बसायची. तारा तिच्याजवळ जाऊन गप्पा गोष्टी करी.

"तुम्ही तुरुगात आहात हें भाग्य. देवाचीच ही दया इथ आपोआप सयम आहे आहारविहार मर्यादित आहेत. वेळच्या वेळीं झोपण, वेळच्या वेळीं उठण ठराविक मर्यादित काम. बाहेर इतका समय, इतका व्यवस्थेशीरपणा राहत नाही—" तारा म्हणाली.

"खर आहे तुमच म्हणण. मीं एकदा तुम्हाला म्हटल होत, कीं आमचा अजून सयमी आश्रम नसून गृहस्थाश्रमच आहे आठवत तुम्हाला ?" आनदीनें विचारलें.

"हो आठवत तें वाक्य. त्या वाक्याचा अर्थाहि माझ्या ध्यानी आला होता. परतु तुमच जीवन इतक अव्यवस्थित नसेल आनदीताई, मी सूतिका आहे. पुष्कळ स्त्रियापासून मी माहिती विचारीत असतें त्या विश्वासान मला सागतात. रडतात हो काही काही भगिनी सागताना सात महिने झालेले. तरीहि पति पत्नीला विश्राति देत नाहीं. एका स्त्रिन सागितल कीं पति तिला भीति घालायचा. "तू आहेस की नाहीं तयार की बाहेर जाऊ—" अस निर्लज्जपण म्हणावयाचा काय करतील बिचाऱ्या अशामुळ सुलभप्रसूति होत नाहीं. पतीला कुठ आहे त्याची चिंता ? वेदना पत्नीला भोगाव्या लागतील. ती मेली तर त्याला दुसरी नवी मिळेल. याच काय जात ? कठीण आहे

स्त्रियाच जीवन. पुरुषाची अब्रू आपल्या प्राणाच मोल देऊन आपल्या आरोग्याच बलिदान करून स्त्रिया साभाळीत असतात---" तारा म्हणाली.

" मन्यादादा म्हणत असतो, आपण अद्याप माणस नाही हेंच खर." आनदी म्हणाली.

" आपणापेक्षा पशु अधिक सयमी असतात माणसाना नेहमीच जसा माद. माणसाना काय म्हणाव तेंच समजत नाहीं." तारा म्हणाली.

" माणूस पशुहूनहि पशु होतो, परतु मनात आणील तर तो देवहि होऊ शकतो. म्हणून माणसाची थोरवी—" आनदी म्हणाली.

" मन्यादादानी मला एकदा पत्रात लिहिल होत 'ज्याला मृयुजय व्हायच आहे, शिवशकर व्हायच आहे, त्यान पशुपति झाल पाहिजे' हृदयातील विकाराचे पशु ताब्यात घेतल्याशिवाय अमृतत्व नाही. आनद नाही. स्वतःच वा इतराच कल्याण नाही. किती छान होत तें पत्र " तारा म्हणाली

" मन्यादादा नेहमी लिही का पत्र ? " आनदीनें विचारलें.

" मी खर सागू का, मन्यादादावर माझ प्रेम बसल होत मन्यादादान माझा पति व्हाव अस मी इच्छीत होतें. परतु ते प्रम नसून मोह होता. आम्ही दोघानीं एकमेकास सावरल त्यानाहि माझ्याबद्दल तस काहीं वाटे, परतु त्यानी प्रतिज्ञा केलेली. ते मला कधी पत्र लिहीत व मला शातवीत, मन्यादादाशीं माझे हात जोडले गेले असते, तर आज केवढा घोटाळा झाला असता ! देवाला दया ! " तारा म्हणाली.

" तुम्ही पुनर्विवाह का करीत नाहीं अस मीं तुम्हाला विचारल होत. माझ्याहि मनात येई, की तुमचा व मन्यादादाचा ससार एकत्र व्हावा." आनदी म्हणाली.

सुपरिटेंडेंटसाहेबाजवळ एके दिवशीं तारेन सारी हकीकत सागितली.

" बाहेरच्या दवाखान्यात व्यवस्था नाही होणार ? " तारेनें विचारलें.

" मला वर लिहिल पाहिजे." तो म्हणाला.

" लवकर लिहा. परवानगी द्याल तर त्याच्याबरोबर मीहि दवाखान्यात राहीन. मला अनुभव आहे या कामाचा." तारा म्हणाली.

" मला भीति वाटते." आनदी म्हणाली.

"मी करतों व्यवस्था, आम्हालाहि काही माणुसकी आहे—" साहेब म्हणाला.

आनदीची बाहेरच्या दवाखान्यात रवानगी झाली. पोलिसाचा पहारा असे. प्रसूतिवेदना सुरू झाल्यावर ताराहि तेथें गेली तिला नेण्यात आलें होतें. पहाटेची वेळ झाली होती. कळ्या फुलत होत्या. तिकडे पूर्व दिशेलाहि प्रसूतिवेदना होत होत्या आनदीला मुलगा झाला.

दहा दिवसानी तारा व आनदी तुरुगात आली. पुत्रवती आनदीचें सत्याग्रही भगिनींनी स्वागत केलें. त्या बाळावर त्यानीं फुलें उधळली झाडाला खादीच्या शालीचा पाळणा टागून बायानीं बाळाला झोंके दिले

हलवा ग सयानो । हलवा ग बायानो

वगैरे गाणीं म्हटली त्या बाळाचें भाग्य, की नाना प्रातातील स्त्रियानीं त्याचें कौतुक केलें. त्याला आशीर्वाद दिले भारतीय ऐक्य त्या नव पिढीच्या वारसदाराजवळ उभें होतें तेथें गुजराथी भगिनी होत्या, कर्नाटकी होत्या, शीख भगिनी होत्या, दोन मुसलमान माताहि तेथें होत्या. त्या सर्व मातानीं या नव बाळाला धन्यवाद दिले

मुलाचें नाव 'भारत' ठेवण्यात आलें त्या मुलाला पाहताच सर्व हिंदुस्थान आठवला पाहिजे. त्याला हाक मारताच सर्व हिदुस्थान डोळ्यासमोर आला पाहिजे. मोठा झाल्यावर त्या मुलालाहि सर्व भारत अहोरात्र जागृतीं—स्वप्नीं दिसला पाहिजे असा त्या नावात अर्थ होता. तें नवीन बाळ म्हणजे भारतीय ऐक्याची मूर्ति होती. म्हणजेच भारतीय मोक्षाची मूर्ति होती. म्हणजेच मानवजातीच्या मोक्षाची मूर्ति होती

दिव्य स्तव्य बाळा ! हें स्वतत्र नवभारता
तुला अनत भक्तिप्रेममय प्रणाम.

---

# समारोप

## १७

राष्ट्रीय सभेची शक्ति सरकारच्या अनुभवास आली. जागृत जनतेचा आत्मा सरकारनें ओळखला. महात्मा गांधींजवळ सरकारनें मिळतें घेतलें. साम्राज्यशाही वाकली. भारताची वाकलेली मान सरळ झाली. सारे राजकीय कैदी सुटले. घरोघर आनंद झाला. प्रत्येक सत्याग्रही कैद्याचें घर तुरुंगच झालें होतें. तुरुंगात ७० हजार सत्याग्रही होते परंतु ७ लाख गेल्याप्रमाणें होते कारण घरची आप्तेष्ट मंडळी गोड खात नसत, सण करीत नसत. तुरुंगातील सत्याग्रहींपेक्षा घरच्यांच मंडळींस अधिक दुःख अधिक चिंता त्यांचे डोळे आठवणीनें भरून येत.

आईबापास मुलें भेटलीं. मुलास आईबाप भेटले. बहिणींना भाऊ भेटले, भावास बहिणी भेटल्या. पतिपत्नींच्या भेटी झाल्या, मित्रामित्राच्या भेटी झाल्या. तो अपूर्व आनंदाचा दिवस होता. घरोघर तिरंगी झेंडे उभारले गेले होते. ती दिवाळी होती. तो दसरा होता. तो गुढीपाडवा होता ! त्या दिवशीं सारें मांगल्य होतें.

भाऊराव, मन्यादादा हे फुलगावला आधीं आले. निरनिराळ्या तुरुंगातून मंडळी सुटून येत होती. त्यांचें स्वागत होत होतें. एके दिवशीं जीवन आला,